सत्कार्योत्तेजक सभा—धुळें.

श्री

# रामदास आणि रामदासी

## भाग दुसरा

# श्रीसमर्थांचीं दोन जुनीं चरित्रें

एक, शिरगांवमठपति भीमस्वामीकृत भक्तलीला-
मृतग्रन्थांतर्गत तद्ग्रन्थासह शके १७१९
तील व दुसरें, खुद्द श्रीसमर्थशिष्य
तंजावरमठपति शहापुरकर
भीमस्वामीकृत शके
१६०३ तील

जगांत रामदास रे। तया पदींच वास रे।
निमग्न देवदास रे। विरोन देहभास रे॥

धुळें—आत्माराम छापखान्यांत छापिलीं.

दासनवमी १८२८.

# अनुक्रमणिका

श्रीराम

# १

# रामदासी सांप्रदायाची पुनरावृत्ति

मुख्य येल विचाराचा।
त्यावरी बोलणें बरें।
चालणें सत्य नेमाचें।
नीति न्याय चुकों नये॥

श्रीरामदास.

**श्रीसमर्थां**च्या वेळचा रामदासी सांप्रदाय क्षणभर बाजूला ठेवून आज महाराष्ट्रांत आपणांस काय दिसत आहे याचा विचार केल्यास, गेल्या पांच पन्नास वर्षांत आपल्या महाराष्ट्रांत पांच पंचवीस नवीन सांप्रदाय उदयास आले होते, असें आढळून येईल. पैकीं कांहींचा उदय आणि अस्त एकाच काळीं झाला. कांहीं, कांहीं काळ रेंगाळत राहून, लयास गेले व कांहीं लयाला जाण्याची हल्लीं वाट पाहात आहेत. कायमचें बीजारोपण असें फक्त तीनच सांप्रदायांचें झालेलें दिसतें. वारकरी सांप्रदाय, रामदासी सांप्रदाय इत्यादि लहान मोठे जुने सांप्रदाय आहेतच. ह्या जुन्या सांप्रदायांचें स्वरूप पूर्वी इतकेंच निर्मल, शुद्ध आणि कार्यक्षम राहिलें आहे किंवा कसें याविषयीं शंका आहे. अथवा शंका आहे असें तरी संदिग्ध कां ह्मणावें? कोणाला नांवें ठेवावीं, किंवा कोणाचा गौण पक्ष विनाकारण चवाठ्यावर आणावा अशी मनांत कल्पना हि जर नाहीं, किंवा या प्रस्तावनेच्या द्वारें आपल्या घरचीं गाऱ्हाणीं कोणा तिऱ्हाइतांना सांगावयाचीं आहेत असें हि जर नाहीं, तर स्पष्टपणें असें ह्मणण्यास काय हरकत असावी कीं, आमच्यांत जे जुने सांप्रदाय होते, ते जरी आज कसाबसा जीव धरून असले तरी, त्यांचें मूळ स्वरूप पालटलेलें आहे इतकेंच नव्हे, तर त्याची आज ओळख हि

बुजलेली आढळते. असें होणें अत्यन्त अनिष्ट होय. अजून ते सांप्रदाय आहेत तोंच त्यांचें यथार्थ ज्ञान सार्वत्रिक करण्याविषयीं सांप्रदायिकांनीं प्रयत्न केला पाहिजे. ह्या जुन्या सांप्रदायांचें ज्ञान नव्या सांप्रदायिकांना हि आवश्यक आहे. जुन्यांच्या आश्रयानें आणि मदतीनें नवीन सांप्रदाय चालतील तर त्यांना त्वरित यश येण्याचा संभव आहे.

हे जे नवीन तीन सांप्रदाय ह्मणून मी ह्मणतों ते येणें प्रमाणें:—

(१) प्राचीन विद्या आणि नीति यांचें ज्ञान करून देणारा पहिला सांप्रदाय.

(२) झालेलें ज्ञान कृतींत उतरविणारा दुसरा सांप्रदाय.

(३) ती कृति कां आणि कोणासाठीं करावयाची हें शिकविणारा तिसरा सांप्रदाय.

असे हे तीन सांप्रदाय आहेत. त्यांना त्यांच्या स्वरूपावरून नांवें ठेवावयाचीं ह्मटल्यास, जिज्ञासु, चिकीर्षु आणि ऐतिहासिक सांप्रदाय अशीं तिघांस तीन नांवें अनुक्रमें शोभतील असें वाटतें. ह्या तिन्ही सांप्रदायाचें स्वरूप आज अत्यन्त अस्पष्ट आहे, पण महाराष्ट्राच्या विद्यमान स्थितीचा सूक्ष्म विचार करणारास तें दिसल्यावांचून राहाणार नाहीं, असा भरंवसा आहे. याचा थोडासा खुलासा करूं.

या देशाची वेदकालीन स्थिति कशी होती, रामायणमहाभारताच्या काळीं कशा प्रकारची होती, हे दोन राष्ट्रीय ग्रंथ काय शिकवितात, या देशांत बौद्धधर्माचा प्रसार कसा आणि कितपत झाला, श्रीशंकराचार्यांनीं सनातन धर्माची पुन्हा प्रतिष्ठा कशी केली, ज्ञानेश्वरमहाराजांपासून तों तुकाराममहाराजांपर्यंत जे असंख्य साधुसंत होऊन गेले त्यांनीं महाराष्ट्रास कोणती नीति शिकविली, श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराज यांनीं महाराष्ट्रास कोणतें वळण लाविलें, इत्यादि ज्ञान आपणांस झालें पाहिजे, ह्या थोर विभूतींचीं चरित्रें आपण अवगत करून घेतलीं पाहिजेत, अशी इच्छा धारण करणारा "जिज्ञासु" सांप्रदाय होय. आत्मविद्या आणि सामाजिक नीति यांचें

ज्ञान, हा सांप्रदाय करून देतो. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांना हा सांप्रदाय त्यांचे त्यांचे गुणकर्म शिकवितो. महाराष्ट्रांतील साधुसंतांच्या ठिकाणीं असलेल्या प्रेमाचें, निष्ठेचें आणि निरहंकाराचें शिक्षण या सांप्रदायांत मिळतें. सारांश, हा सांप्रदाय विचार करण्यास प्रवृत्त करितो. श्रीमत् दासबोधांत काय आणि इतरत्र काय, 'विचार, विवेक' यावर श्रीसमर्थांचा फार भर आहे; आणि तें खरेंच आहे. कोणता हि समाज विचारानें चालेल तर किती तरी अनर्थ टळतील. प्रत्येक मनुष्य विचार करूं लागेल तर चहाडी कोण करील, स्वजनद्रोहाचें पातक कोणाच्या माथीं बसेल, यःकश्चित् स्वार्थासाठीं देशबुडवेपणा कोण पतकरील, परनिंदा करण्याचा धंदा कसा चालेल, दुराचाराला थारा कोण देईल, चैनींत काळ कोणाचा जाईल, स्वदेशबांधव दुःखसागरांत बुडत असतां हि स्वस्थ कोण बसेल, स्वतःच्या मानापमानाचें गाठोडें उराशीं बाळगून व्यवहारांत व राजकारणांत अभिष्टाप्रमाणें कोण आचरण करील, सारांश परावलंबन दृढ करण्याला कोण परोपरीनें मदत करील ?

असा हा पहिला सांप्रदाय आहे. या सांप्रदायांतील मनुष्य विचार करूं लागतो आणि नीतीची ओळख करून घेतो. शोध लावतां येईल इतक्या पूर्व काळापासून तों सर्वस्वाला मुकून परक्यांचें केवळ कौतुक करण्याची वेळ येईपर्यंत या देशांत जी विद्या होती तिचें संशोधन करून ती प्राप्त करून घेण्याचीं साधनें महाराष्ट्राला सुलभ करून देणें, हें या सांप्रदायाचें प्रमुख कर्तव्य होय.

नुसतें ज्ञान व्यर्थ होय. प्रसंगीं जें उपयोगीं पडत नाहीं, तें ज्ञान नव्हे. ज्ञानाची बडबड करतां आली ह्मणजे ज्ञान झालें असें मानणें चुकीचें होईल. शाब्दिक ज्ञान हाडामासांत मुरून सहजगत्या तदनुरूप आचरण घडूं लागेल, तरच खरें ज्ञान झालें ह्मणून समजावें. वेदकाळापासून तों मराठ्यांच्या काळापर्यंतचें सारें ज्ञान झालें, पण त्यापासून जो धडा शिकावयाचा तो जर शिकला गेला नाहीं, तर हें असेल वरपंगी ज्ञान, होऊन न होऊन सारखेंच नव्हे काय ? आत्मा अमर आहे, जग नश्वर आहे, कसलें घर आणि दार घेऊन बसलात, जन्मोजन्मीं आईबाप, बहिणभाऊ, कन्यापुत्र आहेतच, तेव्हां आतां कोणाकोणाची काळजी करावी, पंचभूतात्मक देहावर ममता कोणी करावी,

देहादि प्राणाचा । लोभची सोडावा । तेव्हांची जोडावा । पांडुरंग ।। इत्यादि वेदांताच्या गप्पा मारतां आल्या, पण कमरेची एक दिडकी सुटतांना प्राण व्याकुळ होतो, द्रव्य आणि दारा याशिवाय चिंतन किंवा कीर्तन नाहीं, आणि प्राणाची आहुती देण्याचा प्रसंग तर लांबच राहो, पण परहितार्थ देह थोडासा देखील झिजत नाहीं, किंवा एकादें क्षुल्लक संकट आलें तरी देखील उरांत भरलेली धडकी सहसा निवत नाहीं, तर मग ह्या असल्या वेदांत्यांची कोणी टवाळकी केल्यास त्यांत काय वरें दोष आहे? विकट प्रसंगाला लट-पटणारें ज्ञान काय कामाचें? कृतींत उतरेल तेंच ज्ञान. फार काय, पण ज्ञान ह्मणजेच कृति करणें. यः क्रियावान् सः पण्डितः । ज्ञानी मनुष्याची परीक्षा त्याच्या भाषणावरून करण्यापेक्षां कृतीवरून केली पाहिजे. परहितार्थ देह झिजविण्यास मनुष्य तयार झाला तरच पंचभूतात्मक देहाची काय मात-ब्बरी आहे, हें ज्ञान त्यास होऊन त्याची देहममता सुटली असें समजलें पाहिजे. कसें हि मोठें संकट आलें तरी त्याला धैर्यानें पाठ देऊन, युक्ति-प्रयुक्तीनें जो समाजहित साधतो, तो ज्ञानी. हीं "चिकीर्षु" सांप्रदायाचीं लक्षणें होत. आत्मज्ञानाचें यथार्थ स्वरूप समजलें तर या दुसऱ्या सांप्रदा-यांतील लोकांना संकटाची पर्वा वाटणार नाहीं, अनर्थपरंपरा ओढवली तरी त्यांची शांति ढळणार नाहीं, त्यांचें मन गोंधळणार नाहीं व कालांतराच्या योगानें राष्ट्राचें जें स्थित्यंतर झालेलें असतें, त्याचा फायदा घेतां येईल तितका घेऊन ते आपला डाव अखेर साधतील. पहिल्या सांप्रदायापासून खरोखर ज्ञान झालें कां नाहीं, याची कसोटी या सांप्रदायांत लागते. बोलण्याप्रमाणें चालण्यास हा सांप्रदाय शिकवितो. विचाराला जी गोष्ट पटली आणि मु-खावाटे जी उच्चारली गेली, तदनुरूप वर्तन करण्यास हा सांप्रदाय भाग पाडतो.

प्राचीन नीति समजून ती आचरणांत उतरली ह्मणजे, तें आचरण कोणासाठीं आणि कशासाठीं करावयाचें, हें इतिहास शिकवितो. इतिहा-साच्या वाचनानें स्वदेश आणि स्वबांधव यांवर प्रेम जडतें. वैभवशाली पूर्वजांच्या पराक्रमाचे, धैर्याचे, स्वदेशनिष्ठेचे प्रसंग पाहून त्यांच्या विषयीं स्वाभाविक अभिमान वाटूं लागतो; आणि असें झालें ह्मणजे, देह जो झिज-वावयाचा तो कां आणि कोणासाठीं, याचा प्रकाश प्रत्येकाच्या अंतःकरणांत

पडतो. प्राचीन वैभवाची आठवण ठेवणारें राष्ट्र आपलें वैभव गमावीत नाहीं. प्राचीन गतवैभवाची आठवण झालेलें राष्ट्र तें वैभव पुनरपि प्राप्त करून घेतल्याशिवाय स्वस्थ राहात नाहीं. असा जगाचा अनुभव आहे. आठवण असते तोंवर वैभव असतें. आठवण बुजते तेव्हां वैभव जातें, आठवण होते तेव्हां वैभव परततें. सारांश, प्राचीन वैभवाची आठवण ठेवणें हें राष्ट्रीय कर्तव्य होय. ज्या राष्ट्राची ही आठवण बुजली असेल त्याला ती करून देणें, हें इतिहासाचें काम आहे आणि ह्मणून या सांप्रदायाला "ऐतिहासिक" ह्मटलें आहे. महाराष्ट्राच्या इतिहासाचीं साधनें शहरोशहरीं, खेडोंखेडीं, क्षेत्रांच्या ठिकाणीं, जुन्या मठांतून, जुन्या घराण्यांतून लोळत पडलीं आहेत. त्यांची किंमत वाटावी तितकी अजून महाराष्ट्राला वाटूं लागली नाहीं, हें आश्चर्य आहे. हीं साधनें नाहींशीं होणें किंवा असून अंधारांत पडणें ह्मणजे महाराष्ट्राचा इतिहास नाहींसा होणें होय. आणि ज्या राष्ट्राला इतिहास नाहीं त्यानें पराक्रम केल्याचें एकादें तरी उदाहरण आहे काय? नाहीं; तर मग इतिहास हा राष्ट्राचा प्राण होय, असा याचा अर्थ होतो. त्या राष्ट्रीय प्राणाची आपण घ्यावी तितकी काळजी खरोखर घेत आहोंत काय? महाराष्ट्राच्या इतिहासाचीं साधनें गोळा करून उजेडांत आणण्याचें काम महाराष्ट्रानें किती तरी आतुरतेनें करावयास पाहिजे. राष्ट्रावर कोसळणाऱ्या पारतंत्र्याला कांहीं काळ थोपवून धरणाऱ्या श्रीमंत नाना फडणिसांचीं हजारों दप्तरें मेणवलीस धूळ खात पडलीं आहेत, ही गोष्ट आज कमींत कमी दहा पंधरा वर्षें महाराष्ट्राच्या कानावर आली असून हि त्यासंबंधानें महाराष्ट्रानें कांहीं एक केलें नाहीं, ह्या एकाच उदाहरणावरून महाराष्ट्रांत कितपत जागृती झाली आहे, याचा अंदाज होतो. राष्ट्राचें पुनरुज्जीवन करण्याचें सामर्थ्य या सांप्रदायांत आहे. आपले विचार आणि आचार राष्ट्रदेवतेच्या चरणीं अर्पण करण्यास हा सांप्रदाय शिकवितो. या सांप्रदायाची दीक्षा घेणाराच्या अंतःकरणांत "महाराष्ट्र" हीं चार अक्षरें अढळ पद मिळवितात; आणि ह्मणून या सांप्रदायाचीं तत्त्वें महाराष्ट्रसमाजांतील अगदीं खालच्या थरापर्यंत जाऊन पोंचलीं पाहिजेत. ज्याला स्वदेश नाहीं किंवा स्वदेश असून हि ज्याला त्याची कल्पना नाहीं, असा आचारविचारवान् मनुष्य स्वदेशाच्या हिताविरुद्ध तिऱ्हाइताला साह्यकर्ता झाला, तर त्यांत काय नवल आहे? परंतु या सांप्रदायाच्या योगानें महाराष्ट्राच्या प्राचीन उज्वल

स्वरूपाचा प्रकाश अंत:करणांत पडल्यावर कोणता तरुण देशद्रोह करण्यास धजावेल? महाराष्ट्रासाठीं महाराष्ट्रांत वारंवार जन्म घेण्याची स्फूर्ति तरुणांच्या अंत:करणांत हा सांप्रदाय उत्पन्न करील. महाराष्ट्राच्या विद्यमान स्थितीचें चित्र सर्वांच्या डोळ्यांपुढें प्रत्यक्ष आहेच, परंतु प्राचीन स्थितीचें चित्र एकदां तरुणांच्या अंत:करणांत ठसलें गेलें, तर मग त्यांच्या नेत्रांतून वाहणाऱ्या अश्रुधारा वाया जावयाच्या नाहींत. ह्या सांप्रदायाचा अभ्यास करितांना तरुणांना भावी स्थितीचीं स्वप्नें पडूं लागतील व त्यांची इच्छा पवित्र असल्यामुळें ती पूर्ण करणें ईश्वराला भाग पडेल.

असे हे तीन सांप्रदाय महाराष्ट्रांत स्थिर झालेले दिसत आहेत. बाकीचे सांप्रदाय, एक तर लयाला गेले किंवा जाण्याच्या पंथांत आहेत किंवा याच तीन सांप्रदायांत अंतर्धान पावले आहेत. हल्लीं महाराष्ट्रांत ज्या संस्था, चळवळी किंवा उत्सव अस्तित्वांत आहेत, ते सर्व वरील सांप्रदायांपैकीं कोणत्याना कोणत्या एका किंवा अनेक सांप्रदायांत मोडतात, असें विचारान्तीं आढळून येणार आहे. ह्या सांप्रदायांत परस्पराविषयीं वैमनस्य नाहीं इतकेंच नव्हे, तर ते एकमेकाला पोषक असे आहेत. त्यांच्यांत परस्परविरोध नाहीं; किंबहुना तिन्ही सांप्रदाय एकाच व्यक्तीच्या ठिकाणीं एकवटल्याशिवाय त्यास " मराठा " हें नांव धारणच करतां यावयाचें नाहीं. मराठा ह्मणजे जो स्वधर्म आणि स्वदेश यांना ओळखतो व त्यांची एकनिष्ठ सेवा करितो, तो. पहिल्या सांप्रदायांत स्वधर्माचें शिक्षण मिळतें, तिसऱ्याच्या योगानें स्वदेशावर प्रेम जडतें, व दुसऱ्या सांप्रदायानें स्वधर्म–स्वदेश यांची सेवा हातून घडते. पहिल्या सांप्रदायांत जें नैतिक शिक्षण मिळतें, तें दुसऱ्यांत आचरणांत उतरतें. पहिल्या सांप्रदायांतील शिक्षणापासून मन शुद्ध झालें, अंत:करण प्रेमळ बनलें, प्राणिमात्राविषयीं दया उत्पन्न झाली, शरीरावरचें प्रेम उडालें, आंगीं धैर्य आलें, संकटांची पर्वा वाटेनाशी झाली, परोपकार करावा असें वाटूं लागलें ह्मणजे मुमुक्षु दुसऱ्या सांप्रदायांत शिरण्याला अधिकारी झाला ह्मणून समजावें. आणि या सर्व नैतिक आचरणाचें पर्यवसान, तिसऱ्या सांप्रदायाच्या शिकवणीनें, स्वदेशसेवेंत होतें. सारांश, पहिला सांप्रदाय ज्ञानाचा, दुसरा कृतीचा, व तिसरा देशसेवेचा होय. अशा ह्या तीन सांप्रदायांपैकीं एका किंवा अनेक सांप्रदायाची दीक्षा प्रत्येक विचारी

महाराष्ट्रियानें घेतलीच पाहिजे. ह्या सांप्रदायांत प्रवेश करून घेण्याचा सर्व महाराष्ट्रियांना सारखा हक्क आहे. या तीन सांप्रदायावांचून महाराष्ट्राला अन्य गति नाहीं. तेव्हां यांतून कोणा हि महाराष्ट्रियाची सुटका होण्याला मार्ग नाहीं.

आजमित्तीस हे सांप्रदाय बाल्यावस्थेंत आहेत. त्यांचा पुढें प्रचंड प्रवाह व्हावयाचा असेल तेव्हां होवो, पण आज तर ते नदीच्या उगमाप्रमाणें लहान आहेत. अगदीं तुरळक अशा स्वतंत्र विचाराच्या माणसांच्या अंतः-करणांत आज त्यांना स्थळ मिळालेलें आहे. अशीं माणसें त्यांचें संगोपन नाना तऱ्हेच्या हालअपेष्टा सोसून करीत आहेत. त्यांचा पुढील मार्ग अगदीं बिनधोक आहे असें हि दिसत नाहीं, तरी पण हे प्रवाह बंद पडणें आतां शक्य नाहीं. पाण्याच्या जिवंत झऱ्याप्रमाणें ते अखंड वाहतच जाणार, मग वाटेंत डोंगराळ मुलूख लागो किंवा कांहीं हि होवो, ते आपला मार्ग काढीत सारखे पुढेंच जाणार.

आजचे हे तीन सांप्रदाय मिळून पूर्वीचा श्रीसमर्थांचा रामदासी सांप्रदाय होय. श्रीसमर्थांनीं रामदासी सांप्रदायाचें जें लक्षण दिलेलें आहे तें वाचकांस आठवतच असेल. त्या लक्षणाचा केव्हां हि विसर पडतां कामा नये, ह्मणून फिरून एकवार तें येथें देऊं.

**मुख्य हरिकथानिरूपण । दुसरें तें राजकारण ।**
**तिसरें तें सावधपण । सर्वविषईं ॥ ११।५।४**

हाच अनुक्रम आणखी दोन ठिकाणीं आहे.

**हरिकथानिरूपण । नेमस्तपणें राजकारण ।**
**वर्तायाचें लक्षण । तेंही असावें ॥ ११।६।४**
**हरिकथानिरूपण । बरेंपणें राजकारण ।**
**प्रसंग पाहिल्याविण । सकळ खोटें ॥ १२।२।२९**

ह्या लक्षणावरून रामदासी सांप्रदायाचीं तीन अंगें कोणतीं तीं स्पष्ट दिसत आहेत.

१ हरिकथानिरूपण

२ राजकारण

३ वर्तायाचें लक्षण

आणि आजमित्तीला महाराष्ट्रांत जे तीन सांप्रदाय दिसत आहेत ते

१ प्राचीन विद्या, नीति यांच्या संशोधनाचा ह्मणजे हरिकथानिरूपणाचा.

२ स्वावलंबनाचा, कृतीचा ह्मणजे वर्तायाचा.

३ स्वदेशसेवेचा ह्मणजे राजकारणाचा.

हे होत. आज जे तीन सांप्रदाय नवीन ह्मणून दिसत आहेत ते जुनेच आहेत, असें यावरून उघड होत आहे. याचा अर्थ असा होतो कीं, महाराष्ट्रास महाराष्ट्रधर्माची ओळख पटत चालली आहे. किंवा ओळख पटून असो किंवा न कळत असो, पण महाराष्ट्र आज पुनरपि रामदासी सांप्रदायाचाच आश्रय करूं पाहात आहे, हें खचित. महाराष्ट्राचा तो धर्मच आहे, तेव्हां, केव्हां ना केव्हां त्यास त्याची ओळख पुन्हां झालीच पाहिजे. जातिस्वभाव दुरतिक्रम आहे. हाच न्याय राष्ट्राला लागू. मनुष्याचा मूळ स्वभाव अजिबात बदलणें जसें शक्य नाहीं, तसेंच राष्ट्राचा धर्म अजिबात लोपवून टाकणें शक्य नाहीं. हा डाव फार तर कांहीं काळ साधतो, पण असला विपरीत प्रयत्न करणाराचें केव्हांना केव्हां तरी दांत पडल्यावांचून राहात नाहींत, इतकी गोष्ट खरी.

महाराष्ट्रांत राहून महाराष्ट्रधर्मांत येत नाहीं, असा कोण मराठा असूं शकेल? महाराष्ट्रियांचा—मराठ्यांचा—धर्म ह्मणजेच महाराष्ट्रधर्म. महाराष्ट्रभूमीवर नांदणाऱ्या मनुष्याला मी महाराष्ट्रांत नाहीं असें जसें ह्मणतां यावयाचें नाहीं, तद्वत् महाराष्ट्रधर्म ह्मणजे रामदासी सांप्रदाय हा कोणास नाकारतां यावयाचा नाहीं.

रामदासी सांप्रदायाचीं तिन्हीं अंगें देशकालानुसार नवीन स्वरूपें धारण करून महाराष्ट्रांत बीजरूपानें उद्भूत झालीं आहेत ही अभिनंदनीय गोष्ट होय. तीं प्रबळतर होऊन त्यांचीं गोड फळें महाराष्ट्रास चाखावयास मिळतील तेव्हां खरीं. असा दिवस उगवणार हें भाकित करण्यास ज्योतिषशास्त्राचा फारसा अभ्यास नको आहे. दिवस उगवणार, पण तो लवकर किंवा उशिरा उगवणें हें सांप्रदायिकांच्या निस्सीम व एकनिष्ठ भक्तीवर अवलंबून आहे.

अशी एकनिष्ठ भक्ति या नवीन सांप्रदायिकांच्या ठिकाणीं कशी प्रादुर्भूत व्हावी? असें होण्यास, जुन्या वारकरी सांप्रदायापासून कळकळ, प्रेम, निष्ठा, भाव इत्यादि सद्गुण शिकावे व श्रीसमर्थसांप्रदायापासून परिभ्रमण, विवेक, कष्ट, मरणाविषयीं बेफिकीरपणा, कीर्तीची चाड, वैराग्य, निस्पृहता, मृदु वचन, सहिष्णुता, परोपकारबुद्धि आणि उत्कटता या अकरा गुणांची त्यांत भर घालावी. असें झालें ह्मणजे साहसप्रियता, धैर्य, शांति, द्रव्यद्वेष, व्यक्तिप्रपंचपराङ्मुखता, राष्ट्रहितैकपरता, इत्यादि अनेक राष्ट्रीय गुण नवीन सांप्रदायिकांच्या अंतःकरणांत उद्भवल्यावांचून राहणार नाहींत. यच्चावत् पौर्वात्य राष्ट्रांप्रमाणें, महाराष्ट्रमातेचीं हि लेकरें निसर्गतः पुराणप्रिय आहेत. जुन्या वळणावर नवीन मार्ग त्यांना कोणी दाखविला तर त्या मार्गानें जाण्यास त्यांची ना नसते; परंतु अजिबात नवीन पंथ स्वीकारण्याचें त्यांच्या जिवावर येतें. स्वदेशाभिमान हा शद्ब नवीन असेल, पण ती भावना महाराष्ट्रास नवीन नाहीं. स्वदेशाभिमान ह्मणजे काय हें ऐकण्याला महाराष्ट्रसमाज तयार नसेल, पण महाराष्ट्रधर्म ह्मणजे काय हें ज्ञान करून घेण्याची जिज्ञासा व तदनुरूप आचरण करण्याची बुद्धि साऱ्या महाराष्ट्रास आहे. अशा प्रकारचें धोरण ठेवून नवीन सांप्रदायिकांनीं आपल्या मतांचा प्रसार करण्याचा प्रयत्न केल्यास त्यांना यश आल्यावांचून राहाणार नाहीं. जुन्या सांप्रदायांची कास धरून नवीनांनीं आपल्या प्रयत्नांची दिशा ठरविली पाहिजे. जुन्यांतूनच नवीन सांप्रदाय निघाल्यासारखे दिसले पाहिजेत, नव्हे-- निघाले पाहिजेत. जुन्याला सोडून नवीन सांप्रदायांत जोम येणार नाहीं. आमच्या हलगर्जीपणामुळें जुने सांप्रदाय दुर्बळ झाले आहेतच, तरी पण त्यांना सोडून नवीन सांप्रदाय चालतील तर ते हि सबळ होण्याचा

संभव नाहीं. आमच्या समाजाची रचनाच अशी आहे; किंबहुना एकंदर पौर्वात्य राष्ट्रांची हीच परंपरागत चाल दिसते. कोणी कांहीं हि ह्मणोत, पण आज वैभवसंपन्न असलेल्या पौर्वात्य राष्ट्रांनीं याच मार्गाचा अवलंब केला होता. पायापासून नवीन इमारत उभारण्याचा प्रयत्न या हि देशांत पूर्वी कधीं सफल झाला नाहीं व पुढें होणार नाहीं. हाच अनुभव आजपर्यंतचा इतिहास शिकवितो तेव्हां जुन्या पायावर नवीन इमारत उठविणें श्रेयस्कर होय.

हा जुना पाया बुजूं न देतां, महाराष्ट्रभूला अक्षयी मनोरम वाटणारें त्याचें यथार्थ स्वरूप लोकनिदर्शनास आणून देण्याच्या कामीं आपण थोडासा हातभार लावावा असा सभेचा हेतु आहे. धर्मसंमूढचेत महाराष्ट्राला ज्या सांप्रदायानें एकवार श्रेयस्कर असा महाराष्ट्रधर्म शिकवून कर्तव्याची ओळख करून दिली त्या सांप्रदायाचें स्वरूप कसें होतें, याची थोडी फार माहिती नवीन सांप्रदायिकांना करून देतां आली तर पाहावें, अशी सभेची इच्छा आहे व तदनुरूप तिनें चालविलेला प्रस्तुतचा प्रयत्न जुन्या व नव्या सांप्रदायिकांना सारखाच मान्य होवो, अशी प्रार्थना आहे.

---

श्रीराम

# २

# श्रीसमर्थांचीं चरित्रें

**जगांत रामदास रे । तया पदींच वास रे ।**
**निमग्न देवदास रे । विरोन देहभास रे ॥**

देवदास.

**श्रीसमर्थां**चें यापुढें आतां एकादें नवीन चरित्र लिहावयाचें ह्मणजे तें सर्व अंगांनीं विश्वसनीय व विस्तृत होईल तरच लिहिलें

पाहिजे. असें चरित्र लिहिलें जावें अशी सभेची फार इच्छा आहे, पण तें लिहिण्याची अजून वेळ आली नाहीं. ती वेळ येण्यापूर्वी त्यांच्या चरित्राचीं सर्व साधनें उपलब्ध होऊन प्रकाशित झालीं पाहिजेत. हीं साधनें तीन प्रकारचीं आहेत:—

(१) त्यांच्या वेळचीं व नंतरचीं त्यांच्या संबंधानें कागदपत्रें वगैरे (२) त्यांची कविता आणि (३) आजवर लिहिलीं गेलेलीं त्यांचीं चरित्रें.

त्यांच्या वेळचा किंवा नंतरचा पत्रव्यवहार अजून मुळींच प्रकाशित नाहीं ह्मटलें तरी चालेल. जो कांहीं उपलब्ध झाला आहे तो अगदीं थोडा आहे. त्याच्या शंभरपट जास्त उपलब्ध झाला पाहिजे. त्यांची कविता हि अजून अर्धीअधिक अप्रकाशितच आहे; तथापि ती बहुतेक सर्व उपलब्ध झाली आहे, ही भाग्याची गोष्ट होय.

आजवर लिहिल्या गेलेल्या समर्थांच्या चरित्रांना अंत नाहीं. खुद्द श्रीसमर्थांचे हजारो शिष्य होते, सात आठशे तर नुसते मठच होते. ह्या शिष्यांपैकीं व मठाधिपतींपैकीं कित्येकांनीं तरी त्यांचीं चरित्रें मोठ्या प्रेमानें, आदरानें आणि विस्तारानें गायिलीं असलीं पाहिजेत. त्यांपैकीं आज कितीशीं उपलब्ध आहेत! ह्या दिशेनें सभेनें आतांपर्यंत केलेल्या प्रयत्नाचा विचार केला ह्मणजे समाधान मानण्याला मुळींच अवकाश मिळत नाहीं. आतांपर्यंत प्रकाशित, अप्रकाशित परंतु उपलब्ध आणि अनुपलब्ध पण ज्ञात अशीं श्रीसमर्थांचीं चरित्रें येणें प्रमाणें होत:—

| | | |
|---|---|---|
| १ | कल्याणस्वामीकृत | अनुपलब्ध |
| २ | उद्धवस्वामीकृत | ,, |
| ३ | भिमाजीबाबाकृत | या भागांत शेवटीं छापलेलें |
| ४ | वासुदेवगोसावीकृत | अनुपलब्ध |
| ५ | मौनीगोसावीकृत | ,, |
| ६ | दिवाकरभटगोसावीकृत | ,, |
| ७ | अंताजीगोसावीकृत | ,, |
| ८ | कुडाळकर देशपांडेकृत | ,, |

९ वेणीस्वामीकृत "श्रीसमर्थप्रताप" ग्रंथ. अगदीं थोडा भाग उपलब्ध, अप्रकाशित

१० सहापुरकर कुळकर्णी यांचें घरीं जुनी लिहिलेली बखर, १६३० अनुपलब्ध

११ गंगाधरमहाराजकृत, १६४०, अनुपलब्ध

१२ परळीवर असलेली चाळीसवंदांची बखर, १६४५, अनुपलब्ध

१३ मेरुस्वामीकृत अनुपलब्ध

१४ उद्धवसुतकृत, १६९६ चे पूर्वी, प्रकाशित

१५ महिपतिकृत १६८४ तें १६९६ "

१६ हनुमंतस्वामीकृत १७१५ "

१७ भिमाजीबावाकृत, १७१९, या भागांत आरंभीं छापलेलें.

१८ लक्ष्मणबावाकृत "श्रीसद्गुरुस्तवराज," १७२० चे सुमारास, उप,० अप्र०

१९ राजारामप्रासादिकृत "भक्तमंजरीमाला," १७५६, उप०, अप्र०

२० आत्मारामबावाकृत, १७८९, प्रकाशित

२१ गंगाधरबावाकृत, १७९२, उप०, अप्र०

२२ गंगाधर नारायण खानवलकरकृत, १७९८, उप०, अप्र०

२३ निनांवी, किरकोळ, कांहीं उप०, अप्र०

पैकीं अनुक्रम संख्या १ ते १३ यांचा उल्लेख हनुमंतस्वामी आपल्या बखरींतच करितात. दुर्दैव असें आहे कीं, हनुमंतस्वामींनीं लिहिलेली श्रीसमर्थांची बखर जी प्रकाशित आहे ती देखलि शुद्ध छापलेली नाहीं. तेव्हां छापलेल्या प्रतींत १ ते १३ या सर्वांचा उल्लेख जरी नाहीं तरी आह्मांस चाफळ मठांत व इतरत्र ज्या बखरी उपलब्ध झालेल्या आहेत त्यांच्या आधारानें वरील संख्या दिली आहे. १ ते ९ पर्यंतचे श्रीसमर्थांचे प्रत्यक्ष शिष्य आहेत, तेव्हां त्यांनीं श्रीसमर्थांविषयीं लिहिलेली एक ओळ देखील किती तरी महत्वाची असली पाहिजे. परंतु अनुक्रम ३ खेरीजकरून बाकींच्यांनीं लिहिलेलीं चरित्रें अजून उपलब्ध नाहींत. १४ ते २३ पर्यंतचीं चरित्रें सर्व उपलब्ध असून १४, १५, १६ व २० प्रकाशित आहेत व १७ वें या भागांत

प्रसिद्ध होत आहे. १९, २१ व २२ हे फार मोठाले ग्रंथ आहेत व ते जरी परंपरेतीलच माणसांनीं लिहिलेले आहेत तरी पण ते अलीकडचे असल्यामुळें कधीं काळीं छापून निघतील किंवा नाहीं याविषयीं शंकाच आहे. सारांश, अत्यंत महत्वाचीं व बहुमोल अशीं जीं १ ते १३ पर्यंतचीं चरित्रें तीं, ३ खेरीजकरून, उपलब्ध नाहींत. ३ रें अर्धवट उपलब्ध आहे. चाफळापासून पांच कोसावर मसुर गांव आहे व तेथून एक कोसावर शहापुर आहे. भिमाजीबावा हे तेथील राहाणारे, समर्थाज्ञेवरून शिवाजीमहाराजांबरोबर शके १५९७ त तंजावरास गेले होते व तेथेंच मठ स्थापून होते. त्यांचा जन्म १५६४ त झाला होता व १६६३ त त्यांनीं आपला देह ठेवला. त्यांनीं लिहून ठेविलेलें श्रीसमर्थांचें चरित्र प्रस्तुत भागांत दिलें आहे. समर्थ निजधामास गेल्यानंतर तिसऱ्या दिवशीं भीमस्वामी तंजावराहून गडावर येऊन पोचले. "समर्थ परधामास गेल्याचें सविस्तर वर्तमानाबद्दल भिमाजीबावा यांनीं ५० ओव्या लिहिल्या आहेत" असें हनुमंतस्वामी ह्मणतात. त्या ओव्या १० ते ४४ ह्या भागांत आहेत. आरंभीच्या ९ व शेवटच्या ६ ओव्या, आरंभीचे ५ कडके, शिवाय आरंभीचीं व शेवटचीं कांहीं पदें असतीलच, इतकीं गहाळ आहेत, त्याला इलाज नाहीं. चरित्र लहान खरें, पण फार महत्वाचें आहे. आतांपर्यंत जीं प्रकाशित चरित्रें आहेत तीं सर्व श्रीसमर्थांच्या पश्चात् नव्वद वर्षांनंतर लिहिलीं गेलेलीं आहेत. श्रीसमर्थांना ज्यांनीं प्रत्यक्ष पाहिले होते, त्यांचा अनुग्रह घेतला होता, त्यांच्या आज्ञेवरून मठ स्थापन करून जे महंत बनले होते, अशा कोणी समर्थशिष्यानें लिहिलेलें चरित्र अजून दुसरें प्रकाशित नाहीं. या दृष्टीनें पाहातां तंजावरमठपति समर्थशिष्य शहापुरकर भीमस्वामी यांनीं लिहिलेलें प्रस्तुतचें त्रोटक चरित्र विशेष महत्वाचें होय. अशा चरित्रांत मिळणारी माहिती पुष्कळ अंशीं विश्वसनीय असली पाहिजे व तिजपासून निघणारीं अनुमानें अर्थात् बहुमोल होत. या लहानशा पण सर्वस्वीं प्रमाणभूत चरित्रापासून उपलब्ध होणारी माहिती आणि अनुमानें येथें एकत्र करणें गैर होणार नाहीं. तीं येणेंप्रमाणें:—

१ समर्थांचें लग्न सप्त घटिकांचें ठरलें होतें.

२ एक नेसलेलें धोतर व एक पांघरलेलें उपरणें अशा दोन वस्त्रांसह लग्नसमारंभांतून समर्थ निसटले.

३ तों थेट गंगातीर गांठलें ( जांब गांवापासून दोन तीन कोसावर ) व गंगेंत उडी मारून पैलतीरास गेले.

४ तेथें श्रीरामचंद्राचें दर्शन घडलें.

५ सात दिवस अन्नपानशयन यांचें स्मरण नव्हतें.

६ हा कोणी तरी वेडा आहे असें लोकांस प्रथम वाटे, पण मागाहून त्यांच्यावर लोकांची पूर्ण भक्ति जडे.

७ लहान मुलांत मिसळून त्यांच्या बरोबर खेळण्याफिरण्याची त्यांना फार आवड असे.

८ शहापुरकर सतीबाईची अनुग्रहापूर्वीची जी गोष्ट हनुमंतस्वामींनीं दिली आहे तिचा उल्लेख भीमस्वामींनीं केलेला नाहीं.

९ सतीबाईच्या बापाचें नांव विसाजीपंत व नवऱ्याचें नांव कमळाजीपंत. हनुमंतस्वामींनीं बापाचें नांव अबाजीपंत व नवऱ्याचें नांव बाजीपंत दिलें आहे.

१० गोपाळ कोण? सतीबाईचा मुलगा दिसतो.

११ भीम कोण? प्रस्तुत चरित्रांत त्यांचें नातें दिलेलें नाहीं, पण हनुमंतस्वामी ह्मणतात कीं, बाईनें या मुलाला पुत्राप्रमाणें वाढविला होता. सतीबाईच्या चुलत भावाचा मुलगा भीम असें भक्तमंजरीमालेंत ह्मटलें आहे.

१२ विश्वनाथसुत कोण? भीम तर नव्हे?

१३ अंबाजी, मुरारीबा, आपाजी, गोविंद हे कोण होते याचा शोध लावला पाहिजे.

१४ समर्थांनीं सतीबाईचा पुष्कळ छळ करून त्यांची निष्ठा परीक्षून पाहिली व मग अनुग्रह केला.

१५ शहापुरास श्रीसमर्थांचें भजन चाले तेव्हां पुष्कळ लोक श्रवणास येत. भीमानें त्यांच्या चरणावर मस्तक ठेविलें. भीमस्वामींच्या अनुग्रहाची जी गोष्ट हनुमंतस्वामींनीं सांगितली आहे तिचा उल्लेख स्वतः भीमस्वामींनीं केलेला नाहीं.

१६ शहापुराहून श्रीसमर्थ चंद्रगिरीस रहावयास गेले. ( चरेगांवच्या मागचा डोंगर तोच चंद्रगिरीचा उर्फ चांदोबाचा डोंगर. त्या डोंगरांतील समर्थांची गुहा अजून पाहावयास मिळते. )

१७ चाफळास रामनवमीच्या उत्सवांत प्रतिपदेचा मान शहापुरकरांचा असे.

१८ चाफळास उत्सवांत श्रीसमर्थ भजन, निरूपण करीत.

१९ शिवाजीमहाराजांच्या आग्रहावरून समर्थ सज्जनगडीं राहावयास आले.

२० संभाजीमहाराज गादीवर बसल्यानंतर समर्थांस भेटावयास आले होते.

२१ समर्थ केव्हां केव्हां गुहेंत जाऊन बसत व पंधरा पंधरा दिवस बाहेर येत नसत. महत्त्वाच्या कामाशिवाय कोणास आंत हि येऊं देत नसत.

२२ भीमस्वामींचें समर्थांस पत्र व समर्थांकडून त्याचें गेलेलें उत्तर हीं वाचलीं ह्मणजे गुरुशिष्यांच्या परस्परप्रेमाचें कौतुक वाटतें.

२३ प्रवत्तीसी पाहिजे राजकारण ।
निवृत्तीसी पाहिजे विवरण ॥

२४ धन्य आत्मज्ञानी नर ।
सार्थक केला संसार ।
त्यासी आह्मांसी अंतर । कांहींच नाहीं ॥

२५ भीमस्वामी विवाहित होते.

असो; १४ ते २३ पर्यंतचीं चरित्रें श्रीसमर्थांच्या पश्चात् निर्माण झालेलीं आहेत. लेखकांना प्रत्यक्ष माहिती नव्हती. प्रत्यक्ष ज्ञान असणें व परंपरेनें श्रवण करणें यांत महदंतर आहे. फार काय सांगावें, १६ वे चरित्रकार श्रीहनुमंतस्वामी हे खुद्द चाफळमठाचे अधिपति होत व १७ वे चरित्रकार भिमाजीबावा हे चाफळापासून दोन कोसांच्या अंतरावर असलेल्या शिरगांवमठाचे अधिपति होत. दोघे हि सांप्रदायी इतकेंच नव्हे, तर एक खुद्द श्रीसमर्थांच्या बंधूंचे व दुसरे कल्याणस्वामींच्या बंधूचे वंशज होत. चाफळ व शिरगांव यांच्यांत एकच डोंगर काय तो आडवा आहे. असें असून उभयतांनीं लिहिलेल्या चरित्रांत कमींत कमी ३० । ४० महत्वाचे फरक पडले आहेत. पिंकदाणीची गोष्ट भोळारामबावासंबंधानें घडली ह्मणून हनुमंतस्वामी सांगतात, तर तिचा संबंध एकनाथजनार्दन यांच्यांशीं होता ह्मणून भीमस्वामी वर्णन करितात. तशीच खांडुकाची गोष्ट. समर्थ व कल्याण यांच्या संबंधानें ती गोष्ट हनुमंतस्वामी देतात, तर भीमस्वामी तिचा संबंध जनार्दनएकनाथ यांच्यांशीं जोडतात. हें असें कां व्हावें, समजत नाहीं. एकाच काळीं दोन कोसांच्या अंतरावर इतक्या परस्परविरुद्ध दंतकथा सांप्रदायामध्यें प्रचलित असाव्या, याचें नवल वाटतें. तात्पर्य, श्रीसमर्थांच्या खुद्द शिष्यांनीं लिहिलेलीं त्यांचीं कांहीं चरित्रें उपलब्ध होण्याच्या पूर्वीं त्यांचें नवीन चरित्र लिहिणें इष्ट नव्हे.

श्रीसमर्थांचे चरित्रकार ह्मणून वर जीं त्यांच्या शिष्यांचीं नांवें दिलीं आहेत, त्यांखेरीज आपणांस आतांपर्यंत अज्ञात आणि अनुपलब्ध अशीं त्यांचीं किती तरी चरित्रें असतील, तीं एका परमेश्वरासच माहीत. शिवाय समर्थांचे बंधु श्रेष्ठ, समकालीन साधु तुकाराममहाराज, पंचायतनांपैकीं रंगनाथस्वामी, केशवस्वामी, जयरामस्वामी, आनंदमूर्ति व सां-

प्रदायी वामनपंडित, रघुनाथपंडित, उद्धवचिद्धन, आनंदतनय, अनंत-गोसावी, वेणीस्वामी, देवदास, शिवाजीमहाराज, वगैरे शिष्यांनीं कोणीं अभंग, कोणीं पदें, कोणीं श्लोक, इत्यादि प्रकारांनीं श्रीसमर्थांची लीला वर्णिली आहे. पैकीं फक्त वेणीस्वामी आणि देवदास यांनीं केलेलीं वर्णनें अप्रकाशित आहेत, बाकीच्यांनीं केलेलीं कांहीं कांहीं वर्णनें कोठें कोठें प्रकाशित आहेत.

गिरि, गिरीबाळ, गिरिधर, किंवा वेणी, वेणीस्वामी, निवृत्तीवेणी, किंवा वेणिगिरधर अशीं नांवें धारण करून निवृत्तीराम, करुणाराम, संकेत-रामायण, मंगलरामायण, छंदोरामायण, सुंदररामायण, कौल, गुरुदेव-नमन, काशीयात्राकथन, स्फुटप्रकरणें इत्यादि ग्रंथ लिहिलेले बीड प्रांतांत उपलब्ध झालेले आहेत. ह्या ग्रंथांवरून असें दिसतें कीं, हे ग्रंथ लिहिण्याविषयीं शके १५९६ आनंदनाम संवत्सरीं श्रीसमर्थांची आज्ञा जाहली व शके १६४४ पर्यंत तरी निदान हे ग्रंथ यथावकाश लिहिले गेले. अर्थात् आक्काबाई आणि वेणुबाई अशा ज्या दोघी शिष्यिणी होत्या, त्यांपैकीं शके १६०० त समाधिस्त झालेल्या मिरजेच्या राहणाऱ्या ज्या वेणुबाई त्या आणि गोदातीरस्थ वेणीस्वामी ह्या भिन्न व्यक्ती होत; ह्यापेक्षां वेणीस्वामीबद्दल जास्त माहिती आज देतां येत नाहीं. त्यांच्या ग्रंथांचा एक स्वतंत्रच भाग होणार आहे.

निवृत्तीरामग्रन्थाच्या पहिल्या समासाच्या १०९ ओव्यांत श्रीसमर्थ-सद्गुरु आख्यान आहे. हा ग्रन्थ छापला जाईल तेव्हां जावो, तत्पूर्वी वरील समासांतील कांहीं वचनें येथें देतों.

नाना मती भेद नाना । निर्भीड कोणीच बोलेना ।
संशयनिवृत्ति होईना । माया आणी ब्रह्मीची ॥ ३६ ॥
सर्वब्रह्म ह्मणे शाब्दिक ज्ञान जाहालें । भक्तिज्ञानवैराग्य लोपले ।
सकामभजनें जन लागले । कामनेपाठीं प्रत्यक्ष ॥ ३७ ॥
परलोकप्राप्तीचा विचार । कोण पाहातो सारासार ।
तारकब्रह्म राम साचार । मूढ लोकां कळेना ॥ ३८ ॥

ह्मणोनि निर्भीड वीतरागी । धगधगीत ज्ञानशक्ति आंगीं ।
ऐसा अवतार कलयुगीं । समर्थवेषें प्रगटला ॥ ३९ ॥
सावधान ह्मणतां सावधान । अंत्रपाटीं निघाले ॥ ४० ॥
द्वादशवर्षीं विख्यात कीर्ति । संत देखोनी निवाले ॥ ४२ ॥
संग कोणाचा न साहे । नि:संग वनीं विचरताहे ।
जगदोत्धार करीताहे । धर्मस्थापक सर्वोत्तमु ॥ ४३ ॥
भक्तजन जेथें जेथें भाविती । तेथें तेथें दर्शन होती ॥ ४५ ॥
गिरिकंदरीं करी वास ॥ ४६ ॥
दत्तात्रेय देखिले नयनीं । करवीरक्षेत्रीं समर्थें ॥ ४७ ॥
चंद्रगिरीवरी निवास । पंचाननेशी अखंड वास ॥ ४९ ॥
समुद्रेश्वर हिमाल्य कुंडीं । देहपाती समर्थ धरिले भुजादंडी ।
श्रीराम लक्ष्मण सवे अखंडी । समर्थतनु रक्षावया ॥ ५० ॥
पृथ्वी आप तेज वायु आकाश । त्रिगुण माया दृश्यभास ।
बाधों न लाहती समर्थास । ईश्वरतनु ह्मणोनि ॥ ५१ ॥
जनस्थानीं अनुष्ठान । पंचवटिके श्रीरामदर्शन ॥ ५२ ॥
ऐका कृष्णातीरीं बाहुक्षेत्रीं । कृष्णावेण्या द्विधामात्रीं ।
श्रीरामलिंगीं कौनेत्रीं । अप्रमेय देखिलें ॥ ६० ॥
कृष्णेमध्यें भीमकुंड । त्यांत बलभीममूर्ति महा प्रचंड ।
समर्थें बुडी देऊनि अखंड । कळा वितंड काढिली ॥ ६१ ॥
पंचक्रोशी कृष्णातीरीं । चांफळनाम विख्यात पुरी ।
भोंवते दाटले उदंड गिरि । तेथें अधिष्ठान प्रभूचें ॥ ७५ ॥
समाधीस्थळ समर्थांचें । सह्याद्रिशिखरीं विख्यात साचे ॥ ७६ ॥
तेथें नांदती समर्थस्वामी ॥ ७७ ॥
ठाईं ठाईं मूर्तिस्छापना । स्छळोस्छळीं महोत्साव नाना ॥ ८६ ॥
समर्थें सांगोन दिधला नेम । आनंदनाम संवत्सरीं ॥ ९९ ॥

आनंदसंवत्सरीं जन्म गिरि । संप्रदाई कृष्णातीरीं
षोडशवर्षीं ग्रन्थांतरीं । दासबोधीं अद्वैत विवरेल ॥ १० ॥

ह्या शेवटच्या ओवीच्या काय अर्थ बरें? दासबोधग्रन्थ झाल्यावर सोळा वर्षांनीं दासबोधग्रन्थांतील अद्वैताचें विवरण निवृत्तीराम ग्रन्थांतरीं आनंदसंवत्सरीं ह्मणजे १५९६ त कृष्णातीरीं होईल, असा जर ह्या ओवीचा भावार्थ असेल तर दासबोधग्रन्थरचनेचा आपण जो १५८० । १५८१ हा काल ठरविला आहे त्याला ह्या ओवीनें प्रत्यंतर पुरावा मिळतो.

श्रीसमर्थांचें चरित्र लिहितांना ह्या समासाचा कांहीं ना कांहीं उपयोग झाल्यावांचून राहाणार नाहीं. तथापि आज ह्या ठिकाणीं एका मुद्याचें टांचण करून ठेवावेसें वाटतें. समर्थांच्या अवताराचें प्रयोजन काय, तें ३६ तें ३९ ओव्यांत वर दिलें आहे, त्यावरून असें दिसतें कीं, श्रीसमर्थांच्या वेळेला महाराष्ट्रसमाजांत असा एकादा पंथ प्रबळ झाला असावा कीं, ज्याच्या योगानें, जें आहे तें सारें ब्रह्मच आहे असें मत प्रचलित होऊन समाजांत एकंकार माजून राहिला होता. ह्याच स्थितीचा उल्लेख 'वेणीगिरिश्वर' संकेतरामायणांतहि करितात. संकेतरामायणाच्या बालकांडाच्या तिसऱ्या सर्गांत आरंभीं 'अरूप अदृश्य अचिंत्य' अशा सद्गुरूला नमन करून वेणीगिरिश्वर पुढें ह्मणतातः—

असो ऐसें अचिंत्य तुह्मांसी चिंतिलें । मद्भावनें आणखी येक गमलें ।
जेणें रूपें मजला उपदेशिलें । तेंचि आतां वर्णीन जी ॥ १०
लोकानंद तुं जगद्गुरु । आत्माराम तुं जगदीश्वरु ।
लीलावतारी पूर्णावतारु । कृष्णातीरीं गोचरु देखिलें रूप ॥ ११
तुह्मी वैराग्याचे मुकुटमणी । तापासामाजी शूळपाणी ।
मोक्षश्रीसहित मोक्षपाणी । उदास सेविलीं तुह्मी गिरिकंदरें ॥ १२
तुह्मांसी मायेची भीड नाहीं । कोण्ही बोलों न शके कांहीं ।
मतांतरें नासूनि पाहीं । विमळ ब्रह्म स्थापिलें ॥ १३

तुमचें सर्वब्रह्मी लोकांवरी शासन । तुह्मी येकंकारगजावरी पंचानन ।
नाना युगधर्मावरी रघुनंदन । सत्ययुगीं अवतरलां तुह्मी ॥ १४
सदां उदास गिरिकंदरीं वसतां । शुद्धब्रह्माचा निर्णयो करितां ।
ग्रन्थ करूनि सचराचरीं अंनता । अतीतदीक्षा लाविली तुह्मी ॥
किंवा स्वकीर्ति वाढवावयाकारणें । स्वामी तुह्मा विनविलें रघुनदंनें ।
जगदोद्धार करावा ह्मणोनि पूर्णपणें । परात्परगुरु प्रार्थिलें ॥१६॥
कल्युगीं होईल भ्रष्टाकारु । सर्वब्रह्म येकंकारु ।
ह्मणोनि हनुमानरूपें सर्वेश्वरु । आत्माराम अवतरला ॥ २१ ॥

वगैरे. 'सर्वब्रह्मा'च्या नांवावर 'येकंकारु' करणारे हे 'सर्वब्रह्मी' लोक कोण, कोण जाणे! किंवा समाजाला अवनत स्थिति प्राप्त झाली ह्मणजे आचार आणि विचार यांना फांटा देऊन सर्वच जसे शूद्र बनतात किंवा सर्वच स्वतःस ब्राह्मण ह्मणवूं पाहातात, ह्मणजे कोणीकडून तरी सबगोलंकार करून 'समते'च्या नांवावर राष्ट्राला मूठमाती देण्याच्या उद्योगांत जो तो जसा न कळत चूर झालेला असतो, तशी श्रीसमर्थांच्या वेळीं एकंदरच महाराष्ट्राची स्थिति झाली होती कीं काय नकळे.

"तुह्मी येकंकारगजावरी पंचानन" अशी जो श्रीसमर्थांची स्तुति वेणीगिरिधरांनीं गायिली आहे, तिच्या योगानें श्रीसमर्थांच्या चरित्रांतील कांहीं भागावर प्रकाश पडणार आहे. 'येकंकारा'संबंधानें श्रीमत् दासबोधांत ठिकठिकाणीं जे उल्लेख आले आहेत त्यांचेंहि महत्त्व यावरून कळतें व त्या वेळच्या देशस्थितीची कांहींशी अटकळ होते. "येकंकारगजावरी पंचानन" असें विशेषण श्रीसमर्थांना देतांना श्रीसमर्थांचीं पुढील वचनें तर वेणीगिरिधरांच्या डोळ्यासमोर नव्हती ना? दासबोधाच्या १७ व्या दशकाच्या ४ थ्या समासांत सद्गुरु सांगतातः—

ब्रह्मरूप जालें आघवें । तेथें काय निवडावें ।
अवघी साकरचि टाकावें । काये कोठें ॥ २२ ॥
तैसें सार आणि असार । आवघा जाला येकंकार ।

तेथें बळावला अविचार । विचार कैंचा ॥ २३ ॥
वंद्य निंद्य येक जालें । तेथें काये हाता आलें ।
उन्मत्त द्रव्यें जें भुललें । तें भलतेंच बोले ॥ २४ ॥
तैसा अज्ञानभ्रमें भुलला । सर्वब्रह्म ह्मणोन बैसला ।
माहापापी आणि भला । येकचि मानी ॥ २५ ॥
सर्वसंगपरित्याग । अव्हासवा विषयेभोग ।
दोघे येकचि मानितां मग । काये उरलें ॥ २६ ॥
भेद ईश्वर करून गेला । त्याच्या बाचेन न वचे मोडिला ।
मुखामधें घास घातला । तो अपानीं घालावा ॥ २७ ॥

यासाठीं

आधीं राखावा आचार । मग पाहावा विचार ।
आचारविचारें पैलपार । पाविजेतो ॥ १७।१०।२५

हा श्रीसमर्थांचा उपदेश महाराष्ट्रानें सर्वकाळ मनांत वागविल्यास त्यांत महाराष्ट्राचें हित आहे.

व्यंकटेशस्तोत्र, करुणामृतरस इत्यादि प्रकरणांचे कर्ते देवदास हे श्रीसमर्थांचे शिष्य होत. त्यांचा मठ देगांव येथें आहे. हे समर्थांच्या पश्चात्‌हि होते.

समर्थ रामदास हा । उदास दास तो पहा ।
जनास ना कळे स्थिती । मनासि ना कळे गती ॥ १
प्रपंच वारिला सळें । विवेक लाधला बळें ।
समस्त हेत सारिला । रिपू बळेंचि मारिला ॥ २
कृदांत काय बापुडें । कदां न पाहे वांकडें ।
उदास दास नाचती । नभांत घोष गाजती ॥ ३
भला समर्थदास हा । प्रयोजिलाचि या पहा ।
उदास वृत्ति फारसी । मनांत वृत्ति गाइसी ॥ ३

जनांत रामदास रे । बहूत मान्य त्यास रे ।
तया पदींच वास रे । करीत देवदास रे ॥ ९

इत्यादि रीतीनें त्यांनीं समर्थांचें केलेलें वर्णन अप्रकाशित आहे. असो.

श्रीसमर्थांचीं चरित्रें मिळविण्याकडे शोधकांचें लक्ष लागावें ह्मणून या प्रकरणांत त्यांच्या प्रकाशित, अप्रकाशित पण उपलब्ध व अनुपलब्ध पण ज्ञात अशा चरित्रांचें टांचण केलें आहे.

---

श्रीराम

# ३

# श्रीसमर्थांची कविता

**व्यापिलें हें भूमंडळ । कवित्वकळा तुंबळ ।**
**विवरतां केवळ । मोक्ष लाभे ॥**

कल्याण

**श्रीसमर्थां**च्या चरित्राप्रमाणेंच त्यांच्या कवितेचें विवेचन करण्याची वेळ अजून आली नाहीं. अजमासें एक हजार पृष्ठें होतील इतका मोठा थोरला त्यांच्या कवितेचा संग्रह अजून अप्रकाशित राहिला आहे. तो प्रकाशित होण्यापूर्वी त्यांच्या कवितेच्या स्वरूपाविषयीं लिहिणें बरोबर होणार नाहीं. समर्थांच्या कवितेचा हा जो संग्रह अप्रकाशित राहिला आहे, त्या-संबंधानें एक गोष्ट अशी आहे कीं, त्यापैकीं बहुतेक भाग खुद्द कल्याणस्वामीं-च्या हातचा सभेस उपलब्ध झाला आहे. तेव्हां त्याच्या अस्सलपणाविषयीं किंवा शुद्धतेविषयीं आह्मांस शंका नाहीं व कोणास हि घेणें नको, तरी पण शंका ह्मणून किंवा कौतुक ह्मणून--कल्याणमहाराजांचें हें बाड आहे तरी केवढें मोठें, अक्षर कसें आहे वगैरे हेतु धरून--तें बाड पाहाण्याची कोणाची

इच्छा असल्यास सत्कार्योत्तेजक सभेकडे तें कोणास हि पाहाण्यास मिळेल.*

श्रीसमर्थांची कविता अप्रकाशित राहिली आहे ती येणें प्रमाणें:—

चौदा शतकें:—शंभर शंभर ओव्यांचीं अशीं हीं चवदा शतकें आहेत, पैकीं पांच प्रकाशित असून नऊ अप्रकाशित राहिलीं आहेत.

१ लें शतकः—वैराग्य शतक नांवानें प्रकाशित आहे.

२ रें शतकः—यांत आरंभीं संसाराचे कष्ट देऊन पुढें मायाब्रह्माचें विवरण आहे.

३ रें शतकः— हें ज्ञानशतक नांवानें प्रकाशित आहे.

४ थें शतकः—हें उपदेशशतक ह्मणून प्रकाशित आहे.

५ वें शतकः—यांत नवविधा भक्ति, चत्वार मुक्ति, व पंच प्रळय यांचें विवेचन आहे.

६ वें शतकः—यांत स्वरूपानुसंधान आहे.

७ वें शतकः—ब्रह्मनिरूपण.

८ वें शतकः—सगुणनिर्गुणसंवाद नांवानें प्रकाशित आहे.

९ वें शतकः—सर्वब्रह्मनिरूपण.

१० वें शतकः—यांत सद्गुरूची करुणा फार प्रेमळपणें भाकिली आहे. या शतकांत शि-

---

* मराठी वाङ्मयात्मक किंवा ऐतिहासिक हस्तलिखित संग्रह साऱ्या महाराष्ट्रभर इतका पसरला आहे कीं पुणें, बडोदें, कोल्हापुर, मिरज, सातारा, नाशिक, धुळें या सारख्या एखाद्या ठिकाणीं आनंदाश्रमासारखें एकादें संग्रहालय पाहिजे. श्रीमंत गायकवाडसरकार किंवा श्रीमंत करवीरसरकार किंवा आणखीं कोणी या विषयाचें महत्व जाणणारे श्रीमंत लोक मनावर घेतील तर काय न होईल! महाराष्ट्रभाषेची ही अलौकिक सेवा करण्याचें कोणाच्या नशीबीं परमेश्वरानें लिहिलें आहे, न कळे!

प्याचा हात धरून सद्गुरूनें त्याला ब्रह्मस्वरूपाची ओळख करून दिली आहे.

११ वें शतकः— संसार करीत असतांहि तरून जाणें शक्य आहे.

१२ वें शतकः— प्रारब्ध थोर कां प्रयत्न? प्रयत्न.

१३ वें शतकः— रामचरित्र.

१४ वें शतकः— बालक्रीडा नांवानें प्रसिद्ध आहे.

**स्फुट अभंगः—** अप्रकाशित असे यांत किती तरी अभंग आहेत. करुणाष्टकाप्रमाणें, सांप्रदायासंबंधानें आणि स्वानुभवाचे असे यांत पुष्कळ अभंग आहेत.

**पंचीकरण योगः—** जें पिंडीं तें ब्रह्मांडीं, निर्गुण स्वरूप, आत्मनिवेदनी क्रिया इत्यादि विषयांचें निरूपण यांत आहे.

**चतुर्थ योगमानः—** अंतरात्म्याचें वर्णन, अनिर्वाच्य ब्रह्माचें वर्णन, प्रत्ययज्ञानाचें महत्त्व, मायातीत निरंजनाचें वर्णन इत्यादि विवेचन यांत आहे.

**मानपंचकः—** यांत रामराज्याचा महिमा वर्णिला आहे. मनुष्याचे दास होण्यापेक्षां रामाचे दास होणें बरें, असा यांत उपदेश आहे. रामोपासनेची व्याप्ति यांत दिली आहे. रामोपासना ब्रह्मांडव्यापक आहे. येथल्या येथें याच जगांत स्वदेशबांधवांचें हित केलें ह्मणजे परलोक सहजच साधतो. अरत्र मानतां लोकीं । परत्र सहजीं घडे ॥ इत्यादि विवेचन यांत आहे.

**पंचमानः—** यांत श्रीमत् दासबोधाचा उल्लेख आहे, तेव्हां हा नंतरचा ग्रंथ आहे. यांत अंतरात्मा, सत्संग,

गुरुशिष्यसंबंध इत्यादि विषय आले आहेत. ज्ञानाचें महत्त्व यांत वर्णिलें आहे.

हें ज्ञान रामकृपेनें । धन्य रामउपासना ।
रामदास्य घडे ज्याला । ते सर्वत्र रामदास हो॥

स्फुट प्रकरणें:— यमकावांचून अनुष्टुपछंदांत लिहिलेलीं अशीं हीं स्फुट प्रकरणें किती तरी आहेत. तीं अत्यंत मौल्यवान आहेत, यापेक्षां जास्त वर्णन करितां येत नाहीं.

स्फुट श्लोक:— हजारों आहेत. करुणाष्टकें ह्मणून आठच करुणाष्टकें प्रकाशित आहेत. ही निवड कोणीं आणि केव्हां केली ईश्वर जाणे. करुणापर अशीं यांत शेंकडों प्रकरणें आहेत व त्यांतच हल्लींची प्रसिद्ध आठ करुणाष्टकें आहेत.

हीं इतकीं प्रकरणें व याशिवाय प्रकाशित असलेलें श्रीसमर्थांचें रामायण उणें किष्किंधाकांड, मनाचे श्लोक २०५ व षड्रिपूंचें वर्णन इतकीं सर्व प्रकरणें एका बाडांत आहेत, तेव्हां तें बाड केवढें मोठें आहे याची कल्पन करावी. ह्या बाडाचें विशेष महत्त्व असें आहे कीं, तें सबंध कल्याणस्वामींच्या हातचें आहे. पाठीला बराचसा मोठा चट्टा बसून तें एकदां अग्निमुखांतून निसटलेलें आहे. अशा ह्या पवित्र बाडाचें दर्शन—नव्हे—लाभ महाराष्ट्राला पुन्हां अडीचशें वर्षांनीं व्हावा हें महाराष्ट्राचें भाग्य होय.

वर नमूद केलेल्या प्रकरणांशिवाय रामगीता, कृतनिर्वाह, चतु:समासी, सप्तसमासी, अक्षरपदसंज्ञा, रामकृष्णस्तव, दासप्रबोध, किरकोळ अभंग, आरत्या, भूपाळ्या वगैरे इतकीं प्रकरणें सभेला उपलब्ध झालेलीं आहेत. यावरून श्रीसमर्थांचा "कवितासमुद्र" केवढा मोठा आहे व त्यापैकीं किती थोड्या भागाचें आजवर महाराष्ट्रानें मंथन केलें आहे, याची कल्पना होते. हा अप्रकाशित संग्रह लवकरच प्रकाशित करावा असा हेतु आहे, परंतु तत्पूर्वी त्याची कांहींशी कल्पना व्हावी ह्मणून कांहीं निवडक वेंचे येथें देण्याचें योजिलें आहे.

श्रीसमर्थसांप्रदायाचीं लक्षणें ज्यांत एका ठिकाणीं आणलीं आहेत असा एकादा उतारा आरंभीं देणें योग्य होय.

प्रथम लिहिणें दुसरें वाचणें । तिसरें सांगणें अर्थांतर ॥ १ ॥
आंशकानिवृत्ति ऐसी चौथी स्छिती । पांचवी प्रचीती अनुभवें ॥२॥
साहावें तें गाणें सातवें नाचणें । ताळि वाजवणें आठवें तें ॥ ३ ॥
नवां अर्थभेद दाहावा प्रबंद । आक्रावा प्रबोध प्रचीतीसीं ॥ ४ ॥
बारावें वैराग्य तेरावा विवेक । चौदावा तो लोक राजी राखे ॥५॥
पंध्रावें लक्षण तें राजकारण । सोळावें तें जाण अवेग्रता ॥ ६ ॥
प्रसंग जाणावा हा गुण सत्रावा । काळ समजावा सर्वां ठाईं ॥७॥
आठ्रावें लक्षण वृत्ती उदासीन । लोलंगता जाण तेथें नाहिं ॥ ८ ॥
येकोणीसावें चिन्ह सर्वांसी समान । राखे समाधान ज्याचें त्याचें ॥९॥
विसावें लक्षण रामउपासना । वेध लावी जना भक्तीरंगें ॥ १० ॥
भक्तीरंगें देव देवाल्यें सीखरें । वोटे मनोहरें वृंदावनें ॥ ११ ॥
बावी पोखरणी रम्य सरोवरें । मंडप वीवरें धर्मशाळा ॥ १२ ॥
धर्मशाळा नाना नाना दीपमाळा । तेथें रावेकुळा वाखाणावें ॥१३॥
तरुवर पुष्पवाटीका जीवनें । पावनें भुवनें होमशाळा ॥ १४ ॥
उदंड ब्राह्मण ब्रह्मसंतर्पण । पुराण श्रवण आध्यात्मीक ॥ १५ ॥
जन्मासी येउनी आध्यात्म साधावें । नित्य वीवरावें सारासार ॥१६॥
असार संसार येणें साधे सार । पाविजेतो पार भवसिंधु ॥ १७ ॥
आयुष्य हें थोडें फार आटाआटी । कठीण सेवटीं वृधपण ॥ १८ ॥
येकलेंची यात्रें येकलेंची जावें । मधेंची स्वभावें मायाजाळ ॥१९॥
मायाजाळ तुटे तरी देव भेटे । दास ह्मणे खोटे भक्तीहीन ॥२०॥

ह्मणजे लिहिणें, वाचणें, अर्थ सांगणें, शंकानिवृत्ति करणें, स्वतः अनुभवणें, अशा प्रथम आत्मोन्नतीच्या पांच पायऱ्या दाखवून पुढें गाणें, नाचणें, टाळी वाजवणें, निरनिराळे अर्थ सांगणें, कविता करणें व ऐकणारा प्रसन्न होऊन त्यास प्रबोध होईल अशा तऱ्हेचें विवेकवैराग्ययुक्त निरूपण करणें, अशीं

हरिकथानिरूपणाचीं नऊ लक्षणें सांगितलीं आहेत. पांच आणि नऊ चवदा.

पुढें राजकारणाचा पंधराव्या ठिकाणीं स्पष्ट उल्लेख करून प्रपंचपरमार्थाविषयीं अव्यग्रता असणें, काळ प्रसंग जाणणें, सर्व कांहीं उपाधी करित असूनहि उदासीन असणें आणि प्राणीमात्राविषयीं समबुद्धि बाळगणें, अशीं उदाहरणार्थ चार लक्षणें देऊन सावधपणाची सामान्य दिशा दर्शविली आहे. ह्मणजे

**मुख्य हरिकथानिरूपण । दुसरें तें राजकारण ।**
**तिसरें तें सावधपण । सर्वविषईं ॥ ११-५-४**

हा जो श्रीमत् दासबोधांत संप्रदाय घालून दिला आहे, त्याचें स्पष्टीकरण या उताऱ्यांत केलें आहे. या उताऱ्यांत रामदासी संप्रदायाचीं लक्षणें इतकीं स्पष्टपणें नमूद केलेलीं आहेत कीं, रामदासी संप्रदाय ह्मणजे काय याची यापुढें कोणासच शंका राहू नये. असा उतारा मुखोद्गत असावा असें कोणाहि रामदासीयाला वाटणार आहे. रामोपासना मात्र शेवटीं घातली आहे. संप्रदायाची ती विशिष्ट उपासना आहे, तथापि उपासना कोणतीहि असली तरी हरकत नाहीं, परंतु पहिलीं एकोणीस लक्षणें मात्र सर्वांच्याच ठिकाणीं पाहिजेत. हीं एकोणीस लक्षणें सर्वमान्य आहेत ह्मणून त्यांचा उल्लेख आधीं केला आहे किंवा रामोपासनेंत विसावा मिळतो ह्मणून तिला विसावें स्थान दिलें आहे किंवा कसें, तें कांहीं सांगतां येत नाहीं. आपणांस फार तर इतकेंच ह्मणतां येईल कीं, रामोपासनेच्या सूत्रांत बाकीचीं सर्व लक्षणें ओवावयाचीं आहेत असें दर्शविण्यासाठीं सर्वव्यापी रामोपासना शेवटीं सांगितली असावी. ह्या रामोपासनेचा महिमा दर्शविणारा एकादा उतारा घेऊं.

सप्रचीत वेल्ही[1] मिथ्या कोण करी । धन्य तो विवरी विवेकानें ॥ १
विवेकाचे जन भेटतां संकटें[2] । ज्याची खटपट सुखरूप ॥ २
सुखरूप संत सत्यसाभिमानी । तयासीच मानी येरा नाहिं ॥ ३
येरां नाहिं गती सत्यावांचुनीया । असत्याच्या पायां कोण पडे ॥ ४

---

१ संजीवनी वल्ली. २ विवेकी जन भेटणें दुरापास्त होय.

कोण पडे आतां संदेह्याचे डोहीं । कोणाविण नाहिं चाड आह्मा ॥५
आह्मा नाहिं चाड ते कोणींयेकाची । दृढ राघवाची कास धरूं ॥ ६
कास धरूं जेणें पावनची केलें । तेथें माझें जालें समाधान ॥ ७
समाधान जालें प्रत्ययासी आलें । धन्य तें पाउलें राघवाचीं ॥ ८
राघवाचीं पदें मानसीं धरीन । विश्व उधरीन हेळामात्रें [1] ॥ ९
हेळामात्रें मुक्त करीन या जना । तरीच पावना राघवाचा ॥ १०
राघवाचा दास मी जालों पावन । पतित तों कोण उरों शके ॥११
उरों शके ऐसें कल्पांतीं घडेना । जो कोण्ही पुसेना त्यासी उणें[2] ॥१२
उणें नसगतां[3] माझ्या सूर्यवौशा । कोण्हाची दुराशा नाहिं आह्मा १३
आह्मा नाहिं उणें राघवाच्या गुणें । ब्रीदची राखणें पावनाचें ॥ १४
पावनाचें ब्रीद आह्मा प्राप्त जालें । प्रचीतीस आलें कीतीयेक॥ १५
कीतीयेक जन ज्ञानें उधरीले । कृत्याकृत्य जाले तत्काळची ॥ १६
तत्काळची मोक्ष हें ब्रीद रामाचें । होत आहे साचें येणें काळें ॥१७
येणें काळें मोक्ष जरी मी देईना । दास ह्मणविना राघवाचा ॥ १८
राघवाचा वर पावलों सत्वर । जनाचा उधार करावया ॥ १९

* * *

प्रेमयुक्त अंतःकरणानें हा उतारा वाचल्यावर तो पाठ करावा असें मनांत नाहीं येत? श्रीसद्गुरु समर्थांचें समाधान कशानें झालें, तें या उताऱ्यावरून

---

१ हेल ह्मणजे क्षण असा मूळ अर्थ. जें क्षणमात्रें करितां येतें ती लीला झाली ह्मणावयाची, ह्मणून हेलामात्रें याचा लीलेनें असा अर्थ रूढ झाला आहे.

२ पतित कोणी राहणार नाहीं हें खरें, पण जो कोणी या मार्गाकडेच वळणार नाहीं, जवळ येणार नाहीं, विचारणार नाहीं, तो पतितच राहणार !

३ कोणता शब्द नकळे. 'नसतां' शब्द असतां तर आपणांस अर्थ करतां आला असता. 'माझ्या सूर्यवौशा गतां उणें नस' ह्मणजे सूर्यवंशोद्भव माझ्या रामाला कांहीं उणें नसे असा एक अर्थ सुचवितों.

व्यक्त होत आहे. समर्थांच्या अवताराचा हेतु सहज रीतीनें त्यांत आला आहे "जगाचा उद्धार करीन, सर्वांना मुक्त करीन, आतांचे आतां मुक्त करीन, पतित कोणालाच राहूं देणार नाहीं, तरच मी रामाचा खरा दास" ही केवढी घोर प्रतिज्ञा! ही घोर प्रतिज्ञा तडीस नेण्याचें सामर्थ्य आल्यावरच ती केलेली आहे. श्रीरामाची भक्ति करून स्वतःचें समाधान झाल्यावर दुसऱ्याचें समाधान करण्याचा विश्वास वाटून "हेळामात्रें मुक्त करीन या जना" अशी प्रतिज्ञा केली आणि ती तडीस नेली. श्रीसमर्थांच्या चरित्रांत अशी एक कथा आहे कीं, ते टांकळीस पुरश्चरण करीत असतांनाच त्यांना कृष्णातटाकीं जाण्याची आज्ञा झाली. परंतु लोकांना आचार शिकवावा व मार्ग दाखवावा ह्मणून त्यांनीं तसेंच पुरश्चरण पुरें केलें व पुढें बारा वर्षें तीर्थयात्रा केल्या. तीर्थयात्रा करीत असतां पुन्हां तीच जगदुद्धाराची आज्ञा झाली. ही कथा आणि

**राघवाचा वर पावलों सत्वर ।**
**जनाचा उधार करावया ॥**

ही ओवी, यांचा मेळ किती तंतोतंत बसतो. असे मुक्तिदाते श्रीमसर्थ रामाचे दास जे श्रीसमर्थ रामदास ते ज्या काळीं होते त्या काळीं महाराष्ट्रांतून बद्धदशेची उचलबांगडी व्हावी यांत काय नवल आहे? हें सगळें कशाचें फळ? रामकृपेचें तर खरेंच, पण ती कृपा संपादण्यास आरंभीं जो अचाट प्रयत्न करावा लागला त्याचें. श्रीसमर्थांना शिष्यांनीं एकदां प्रश्न केला कीं, महाराज आपण नेहमीं 'प्रयत्न करावा' असें सांगता, तो यत्न तरी कसा करावा? त्यावर श्रीसमर्थांनीं दिलेल्या उत्तराचा आतां एकादादुसरा उतारा घेऊं.

भाग्यासी काय उणें रे । येत्नावांचुनि राहिलें ।
येत्न तो करावा कैसा । हेंचो आधीं कळेचिना ॥ १ ॥
मुख्य येत्न विचाराचा । त्यावरी बोलणें बरें ।
चालणें सत्य नेमाचें । नीति न्याय चुकों नये ॥ २ ॥
गलबला[1] बुधी नासीतो । नाना निश्चय सांगतो ।

१ मतामतांचा गलबला।

ऐकावें कोणकोणाचें । बोलताहे बहुचकी ॥ ३ ॥
सांगोंचि जाणती सर्वै । कर्ता कोण्ही दिसेचिना ।
जाणते नेणते सांगों । स्वभाव लागला जनीं ॥ ४ ॥
शास्त्र हो लोक हो कोण्ही । नीति हो न्याय हो न हो ।
दाटुनी सांगती वेडे । आदरें हो अनादरें ॥ ५ ॥
मिथ्याच सांगती वार्ता । नेटें[1] पाटें[2] बळाविती ।
ऐसे हे लोक सृष्टीचे । प्रवाहीं पडिले पहा ॥ ६ ॥
करंटे मिळाले सर्वै । जो तो बुधीच सांगतो ।
सांगावें तें आपणाला । आपणु करितां बरें ॥ ७ ॥

* * *

हल्लींच्या वाक्पांडित्याच्या काळीं या उताऱ्याचा उपयोग झाला तर पहावें. कोणीं कोणाला सांगूं नये असें नाहीं, परंतु स्वतः कांहीं न करतां, आपण जें दुसऱ्याला सांगतों त्याचा स्वतःला अनुभव नसतां किंवा आपण जें सांगतों त्याच्या उलट स्वतः वर्तन करित असतां, दुसऱ्याला शहाणपण शिकविणाराला येथें करंटा ह्मटलें आहे. स्वतःला ठाऊक असो वा नसो, जो तो दुसऱ्यानें काय करावें हेंच सांगत सुटला आहे, आपण स्वतः काय करावें याचा कोणीच आपल्याशीं विचार करित नाहीं व कार्यकर्ता हि कोणी दिसत नाहीं. समर्थ ह्मणतात भाग्याला काय कमी आहे? पण यत्न कोण करितो? काय पाहिजे असेल तें यत्नानें साध्य करितां येईल. ज्या मानानें यत्न त्या मानानें त्याचें फळ. टिटवीच्या प्रयत्नानें समुद्र आटत नसतो. यत्न नाहीं ह्मणून भाग्य नाहीं, वैभव नाहीं आणि कांहींच नाहीं. एके ठिकाणीं तर यत्न ह्मणजेच देव असें श्रीसमर्थ सांगत आहेत.

वन्ही तो चेतवावा रे । चेतवितांच चेततो ।
विवेक जाणिजे तैसा । वाढवितांच वाढतो ॥ १ ॥
संग तो साक्षपी याचा । धरितां साक्षपु घडे ।

---

१ नेटें = आग्रहानें. २ पाटें = अधिकारानें किंवा प्रयत्नांतरानें (प्राचीन कोश)

साक्षपें साक्षपु वाढे । पुरती मनकामना ॥ २ ॥
कष्टतां सौख्य मानावें । कष्टीं फळची पाविजे ।
आळसें सुख वाटे तें । दुखब्रह्मांड भोगवी ॥ ३ ॥
केल्यानें होत आहे रे । आधीं केलें चि पाहिजे ।
येत्न तो देव जाणावा । अंतरीं धरितां बरें ॥ ४ ॥

असा यत्नाचा महिमा आहे. श्रीसमर्थांनी तो वारंवार वर्णिला आहे. यत्न करणारीं माणसेंहि तशींच धीराचीं असावयास पाहिजेत. नाहीं पेक्षां संकट आलें नाहीं तोंवर आकाश पाताळ एक करून सोडावयाचें व संकट येतांच गर्भगळित होऊन जावयाचें! पण श्रीसमर्थांचीच भाषा उतरून घेणें बरें.

खेलेलें[1] खेकटीं[2] खत्रीं[3] । खलखलो[4] खेंखरे[5] खेरें[6] ।
खबर्दारी खुसी खासा । जेथें तेथें विटेचिना[7] ॥ १ ॥
धीर्धरा धीर्धरा तकवा । हडबडूं गडबडूं नका ।
काळ देखोनि वर्तावें । सांडावें भय पोटीचें ॥ २ ॥
धरावा धीर तो मोठा । विचारें पाहतां बरें ।
अधीर माणसें खोटीं । काम कांहीं कळेचिना ॥ ३ ॥
धाकेंची चळ्चळा कांपे । भेणेंची फळ्फळा मुते ।
बोबडी पडीली तोंडीं । घाबिरे चांचरे पडे ॥ ४ ॥
खादाड आळसी मंदु । सुचना ते कळेचिना ।
प्रसंगीं चळ्चळा कांपे । तो प्राणी आत्मघातकी ॥ ५ ॥

असो, या प्रकरणांत पांच प्रकारचे उतारे देण्याचा माझा विचार आहे. पैकीं सांप्रदायाचीं लक्षणें, रामोपासना व प्रयत्न याविषयीं उतारे दिले. आतां आणखी दोन उतारे देणें आहेत. एक प्रस्ताविक व दुसरा अध्यात्मपर. प्रस्ताविक कविता ह्मणजे वाचकांस प्रस्तावा, पश्चात्ताप व्हावा असा हेतु धरून

---

१ उद्दाम. २ त्रासदायक. ३ गर्विष्ट. ४ त्रस्त. ५ दुःखदायक. ६ कठोर. ७ उद्दाम त्रासदायक, गर्विष्ट, त्रस्त, दुःखदायक, कठोर, (असें नसावें). सावध, समाधानी, प्रसन्नचित्त, अवीट ( असें असावें ).

लिहिलेली कविता. अशी कविता केव्हांहि धांदलीधांदलीनें वाचूं नये, अशी सद्गुरूंची आज्ञा असते. ज्या वेळीं चित्त स्वस्थ असेल अशा वेळीं, शांत ठिकाणीं, प्रेमयुक्त अंतःकरणानें, स्वतःच्या गुणदोषाची आठवण करून अशी कविता वाचावी.

संसार करावा जीवें सर्व भावें । तुज विसंभावें[1] अंतरंगा ।। १
एसें मज नको करूं रे रावणा । माझा सावा[2] धावा[3] तूंचि येक ।। २
स्वयें माहापापी पापची वर्तावें । सज्जना निंदावें सावकास ।। ३
दोष राहाटणें या पोटाकारणें । सज्जनाचें उणें काढूं पाहे ।। ४
कर्म करवेना धारणा धरवेना । भक्ती उपासना अंतरली ।। ५
विषयाचें ध्यान लागलें अंतरीं । दंभ लोकाचारी खटाटोप ।। ६
निष्ठा भ्रष्ट जाली स्नानसंध्या गेली । दुराशा लागली कांचनाची ।।७
देव धर्म घडे ते ठाईं वेचीना[4] । पुण्य तें सांचीना कदाकाळीं ।। ८
स्वधर्म बुडाला परिग्रहें[5] नेला । वेवादि[6] दादुला[7] भंडरूपी ।। ९
अशक्त दुर्जन पाहे परन्यून । अभिळासीं मन गुंतलेसें ।। १०
कीर्तनीं बैसला पाहे परनारी । परद्रव्यावरी मन गेलें ।। ११
न दिसे अंतरीं देवाची आवडी । पापरूपी जोडी पापरासी ।। १२
काम क्रोध दंभ लोभ मोहो माया । कीर्तनाच्या ठाया समागमें ।।१३
घातला उदकीं न भिजे पाषाण । हृदय कठीण तयापरी ।। १४
स्वयें नेणे हित श्रवणीं दुश्चीत । चंचळ हें चित्त स्थीर नाहीं ।।१५
तुझीये रंगणीं[10] राहे अभिमान । नाहीं समाधान दास ह्मणे ।। १६

---

१ विसरावें, उपेक्षावें. २ सावा = साहाय्य. ३ धावा = रक्षक. ४ खर्च करीना. ५ परिवारें. ६ वितंडवादी. ७ घरधणी, गृहपती. ८ भांडकुदळ. ९ कीर्तनाला गेला तरी षड्रिपु बरोबर आहेतच. १० रंगण = सभा. कीर्तनाचें ठिकाण हीच देवाची सभा, त्या सभेंत देखील माझा अभिमान मला सोडीत नाहीं.

अशी कविता एकाग्र चित्तानें वाचली ह्मणजे मनुष्यास स्वतःचे दोष दिसूं लागतात, तत्संबंधीं तो विचार करूं लागतो, त्याला पश्चात्ताप होतो व ते दोष आपल्यांतून काढून टाकण्याची त्याला प्रवृत्ति होते.

सरतेशेवटीं एक अध्यात्मपर उतारा देऊन हें प्रकरण संपवूं. पुढील उतारा मोठा आहे पण तो सबंधच देणें इष्ट वाटतें. तो फार गोड आहे. त्यांत अध्यात्माचें सार आहे आणि ह्मणून अध्यात्मसार असें त्याला श्रीसमर्थांनींच नांव दिलेलें आहे. अध्यात्म ह्मणजे काय यासंबंधानें आपल्यांत ज्या कल्पना रूढ आहेत त्यांत ह्या उताऱ्यानें कांहीं फरक पडला किंवा भर पडली तर पहावें.

### अध्यात्मसार.

दुखदारिद्रउद्वेगें । लोक सर्वत्र पीडिले ।
मुळींची कुळदेव्या हे । संकटीं राक्षिते बळें ॥ १ ॥
रामउपासना माझी । त्रयलोक्य सुख पावलें ।
सोडीले देव इंद्रादी । तोडीलीं बंधनें बळें ॥ २ ॥
कीर्तीसी तुळणा नाहिं । प्रतापें आगळा बहु[1] ।
न्याय नेमस्त हे लीळा । न भूतो न भविष्यति ॥ ३ ॥
उन्मत्त रावणें येणें । त्रैलोक्य पीडीलें बळें ।
देव ते घातले बंदीं । कैपक्षी[2] राम पावला ॥ ४ ॥
रावणें चोरिली सीता । मावकापट्यें[3] साधिलें ।
धुंडितां धुंडितां सीता । शुधी कोठें न संपडे ॥ ५ ॥
रामसौमित्र हे बंधु । उदास धाकुटे वयें ।
श्रीमंत लक्षणें मोठीं । दिसती मुख्य देवसे ॥ ६ ॥
मूर्ख ते नेणती चिन्हें । जाणत्यां वेदु लागला ।
दिसती थोर सामर्थें । श्रीहरी भगवान् ते ॥ ७ ॥
फिरती थोर आरण्यें । कर्कशें गिरिकंदरें ।

---

१ अधिक, विशेष. २ कैवारी. ३ मायेचें कपट.

कपाटें विवरें झांडी । झोतांवे दर्कुटे कडे ॥ ८ ॥
आरण्य हिंडतां तेथें । कुमारी देखिली वनीं ।
कुमारी बाळलीळा ते । दिसे त्रैलोक्यजननी ॥ ९ ॥
रूप तें नेटकी बाळा । लावण्य बाणलें असे ।
देदिप्य खेचरी लीळा । पार्वती लक्षुमी जशी ॥ १० ॥
यक्षिणी अप्सरा देव्या । शेषगंधर्वकुमरी ।
काये कीं कोण कीं आहे । कांहीं केल्यां कळेचिना ॥ ११ ॥
चंचळा चमके नेटें । मोहनी मनमोहनी ।
ते सूर्यवौंशीचे राजे । विख्यात भुवनत्रंई ॥ १२ ॥
नेमस्त न्याय नीतीचे । करिती धर्मस्थापना ।
परस्त्री नाणिती दृष्टी । ब्रह्मचारी फणीवरु ॥ १३ ॥
येकांतीं त्या वनामधें । देखिले त्या कुमारीनें ।
कुमारी देखिली त्यानीं । बोलती ते परस्परें ॥ १४ ॥
कैंची तूं कोण तूं काई । नाम तें कोण तें तुझें ।
ह्मणे रे मीच तुकाई । जा तुह्मा व्ररु दीधला ॥ १५ ॥
मनाच्या कामना होती । सीताशुधी करा तुह्मी ।
सूर्यवौंशी माहां राजे । बोलती ते कुमारीसी ॥ १६ ॥
वरु तां दिधला आह्मा । सत्य कैसेनि जाणिजे ।
येथून दाविसी लंका । तरीच वरु हा खरा ॥ १७ ॥
वृक्षारूढें सुमित्रानें । लंका तों देखिली पुढें ।
झळकले कळस लंकेचे । हारीनें गोपुरें किती ॥ १८ ॥
झरोंके उंच माड्यांचे । झर्झर नभ रेखिले ।
मार्तंडमंडळा ऐसीं । दयदेपे देखिली पुढें ॥ १९ ॥

---

१ गुहा. २ गुहा. ३ पाण्याचे लोट, धबधबे किंवा धबधब्याच्या खालील तुटलेले कडे. ४ पर्वताचे तट. ५ भूतप्रेतादिक गगनसंचारी प्राण्याप्रमाणें. ६ लक्ष्मण. ७ त्यां.

झांपडी पडिली नेत्रीं । उंदो उदो ह्मणे फणी ।
रामराजा माहां राजा । वरु हा दिधला तया ॥ २० ॥
जननि रामवरदानी । तधीपासुनी बोलिजे ।
उदंड ऐकिलें होतें । प्रचीत मजला नसे ॥ २१ ॥
प्रतापगिरीचे ठाईं । आदिशक्ती विराजते ।
कामना पुरती तेथें । प्रचीती रोकड्या जनीं ॥ २२ ॥
तुळजापुरींची माता । प्रतापेंचि प्रगटली ।
आदिशक्ती माहंमाया । कुळींची कुळस्वामिणी ॥ २३ ॥
कुळंची पाळिलें आज्ञा । रक्षिलें बहुतांपरीं ।
बाळकु काय मातेचें । उत्तीर्ण होऊं पाहतें ॥ २४ ॥
तैसा मी किंकरु तीचा । विचारें ठावही नसे ।
तीची ते वैष्णवी माया । तारिते मारिते जनीं ॥ २५ ॥
शक्तीनें पावतीं सुखें । शक्ती नस्तां विटंबना ।
शक्तीनें नेटका प्राणी । वैभवें भोगितां दिसे ॥ २६ ॥
कोण पुसे अशक्ताला । रोगीसे बराडी दिसे ।
कळा नाहिं कांती नाहीं । युक्ती बुधी दुरावली ॥ २७ ॥
साजिरी शक्ती तों काया । काया मायाची वाढवी ।
शक्ती तों सर्वही सुखें । शक्ती आनंद भोगवी ॥ २८ ॥
सार संसार शक्तीनें । शक्तीनें शक्ती भोगिजे ।
शक्त तो सर्वही भोगी । शक्तीवीण दरिद्रता ॥ २९ ॥
शक्तीनें मिळतीं राज्यें । युक्तीनें यत्न होतसे ।
शक्ती युक्ती जये ठाईं । तेथें श्रीमंत धांवती ॥ ३० ॥
युक्ती ते जाड कळा । विशक्तीसी तुळणा नसे ।
अचूक चुकेना कोठें । त्याचीं राज्यें समस्तही ॥ ३१ ॥
युक्तीनें चालती सेना । युक्तीनें युक्ती वाढवी ।

---

१ उदय. २ लक्ष्मण.

संकटीं आपणा रक्षी । रक्षी सेना परोपरी ॥ ३२ ॥
उदंड खस्तीचीं कामें । मर्द मारुनि जातसे ।
नामर्द काय तें लंडी । सदा दुश्चीत लालची ॥ ३३ ॥
फितव्यानें बुडती राज्यें । खबर्दारी असेचिना ।
युक्ती ना शक्ती ना वेगीं[1] । लोक राजी असेचिना ॥ ३४ ॥
बेदादि[2] बेकैद[3] सेना । कारबारीच चोरटे ।
धण्यासी राखणें राजी । कदा काळीं घडेचिना ॥ ३५ ॥
चोरटीं होरटीं[4] तुंदें[5] । नासकें लांच इछिती ।
लौंढीचे दुरी घालावे । मारावे राजकारणें ॥ ३६ ॥
सेवकां आवरूं नेणे । तो राजा मूर्ख जाणिजे ।
मूर्खाचें राज्य राहेना । कोणाचें कोण ऐकतो ॥ ३७ ॥
लोकांसी राखणें राजी । तें राज्य प्रबळे बळें ।
बंद बेबंद जाणावें । ताबे[6] ताबे परोपरी ॥ ३८ ॥
खळ[7] खोचर काढावें । तंदुलासारिखे खडे ।
खरें तें आदरें घ्यावें । खोटें सर्वत्र टाकिती ॥ ३९ ॥
सगट सारिखें जेथें । तेथें होते बराबरी ।
सार[8] गार कळेना कीं । जाणते नेणते जनीं ॥ ४० ॥
कांहीं येक परीक्षावें । शोधावें बहुतांपरीं ।
नेटकें कार्य साधावें । रोधावें कुटिळा जना ॥ ४१ ॥
असो हें बोलणें जालें । युक्तीवीण कामा नये ।
युक्तीला पाहिजे शक्ती । तस्मात शक्ती प्रमाण हे ॥ ४२ ॥
मुक्त केल्या देवकोडी । सर्वहि शक्तीच्या बळें ।
समर्थ भवानि माता । समर्थां वरु दीधला ॥ ४३ ॥

---

१ वेळेला. २ दाद नाहीं अशी. ३ शिस्त नाहीं अशी. ४ हटवादी. ५ गर्विष्ठ लब्धप्रतिष्ठ. ६ समुदाय. ७ खरळ खोंचर = छिद्रें, दोष. ८ सारगार = खरें खोटें.

मला तों प्रत्ययो नाहिं । मानेना याच कारणें ।
मानेना अनुमानेना । काय कैसें कळेचिना ॥ ४४ ॥
अंतरीं कल्पना केली । येकांतीं बोलिलों बहु ।
रक्षिता देव देवांचा । त्याचा उछाव इछिला ॥ ४५ ॥
इछा पूर्ण करी माता । वाढवी बहुतांपरीं ।
दयाळु मयाळु माता । स्वभावें जाणती कळा ॥ ४६ ॥
जीवींचा पुरला हेतु । कामना मनकामना ।
घमंड जाहालें मोठें । घबाड साधलें बळें ॥ ४७ ॥
रामवरदायनी माता । दासें धुंडुन काढिली ।
वोळखी पाडितां ठाईं । भिन्न भेद असेचिना ॥ ४८ ॥
तुझा मी मी तुझा माते । ऐसें हें बोलणें नव्हे ।
तुझी तुं तुं तुझी माता । जगजोती कृपाळुवे ॥ ४९ ॥
उदो उदो तुझा उदो । जाहला सचराचरीं ।
गोंधळु घातला देवीं । ब्रह्माविष्णुमहेश्वरीं ॥ ५० ॥
सख्य हें जाहालें मोठें । आवडी सांगतां नये ।
असो हें जीवीचें जीवीं । सुखानंद चहुंकडे ॥ ५१ ॥
वोळतां भवानी माता । महींद्र दास्य इछिती ।
बोलणें हें प्रचीतीचें । अन्यथा वाउगें नव्हे ॥ ५२ ॥
भक्त ते पावती खुणे । माता सर्वांस वाढवी ।
वाढवी आपल्या लोभें । मायाजाळें परोपरीं ॥ ५३ ॥
मुलांची लाज मातेला । सीकवि सरसें करी ।
लोभें लोभेंचि शृंगारी । आपुलीं भूषणें तया ॥ ५४ ॥
जीव त्या बाळकापासीं । आखंड लाविला असे
स्वहीत कळेना त्याला । सीकवीते बहु बहु ॥ ५५ ॥
मातेसी काय चोरावें । सर्वहि ठाउकें तिला ।
उतीर्ण व्हावया नाहीं । तेचि ते सचराचरीं ॥ ५६ ॥

बोलणें चालणें तीचें । देखणें चाखणें सदा ।
आखंड खेळते आंगीं । प्राणीमात्रांचिये पाहा ॥ ५७ ॥

॥ इतिश्री अध्यात्मसार ॥

श्रीसमर्थांची कविता ज्या वेळीं जी वाचावी ती गोड लागते, पुनःपुन्हां वाचावीशी वाटते व असें वाटतें कीं, इतकी गोड कविता दुसरी क्वचितच असेल. दुसऱ्या दिवशीं दुसरी एखादी कविता आढळते व तिचेंच वेड लागतें. सारांश, समर्थांची सर्वच कविता गोड आहे, तिच्यांत निवडानिवड नाहीं. पण, ह्या क्षणाला मात्र ह्या अध्यात्मसाराइतकें दुसरें कांहींच गोड लागत नाहीं. ह्यापेक्षां त्याविषयीं एक शब्द जास्त लिहिण्यास मी असमर्थ आहे. निष्ठावंत मुलांनीं तें पाठ करावें! त्याचा साक्षात्कार होण्याचें भाग्य कोणाचें आहे! महाराष्ट्रसद्गुरूंच्या मुखांतून निघालेलें हें अध्यात्मसार महाराष्ट्रांतील तरुणांच्या हृदयांत विंबून ते खरे वेदांती बनावेत अशी प्रार्थना करून हा भाग संपवितों.

---

श्रीराम

# ४

# श्रीरामदासस्वामी आणि श्रीशिवाजीमहाराज

बोळतां भवानी माता ।
महींद्र दास्य इछिती ।
बोलणें हें प्रचीतीचें ।
अन्यथा वाउगें नव्हे ॥

श्रीरामदास

श्रीसद्गुरुसमर्थ रामदास स्वामी आणि सच्छिष्य श्रीशिवाजीमहाराज यांचा परस्परसंबंध कशा प्रकारचा होता, यासंबंधानें अनेकांचे अनेक

तर्क आहेत; परंतु माझ्या अल्प मतीला असें वाटतें कीं, या दोघां सत्पुरुषां-संबंधानें अजून पुष्कळ कागदपत्रें उपलब्ध व्हावयाचीं आहेत व जीं थोडीं झालीं आहेत तीं अप्रकाशित आहेत, तेव्हां अशा स्थितींत, अर्धवट पुराव्याच्या जोरावर किंवा मुळींच पुरावा नसतां, पूर्वसंस्कारानुरूप मनांत येणाऱ्या आप-आपल्या बऱ्या वाईट कल्पना प्रदर्शित करणें इष्ट नव्हे.

श्रीसमर्थ व श्रीशिवाजीमहाराज यांच्या संबंधाचा पत्रव्यवहार अत्यन्त महत्त्वाचा असला पाहिजे. हा पत्रव्यवहार मिळविण्यासाठीं करावी तितकी खटपट थोडीच होणार आहे. महाराष्ट्राच्या इतिहासांतील अत्यन्त मनोरम असा काळ ह्मटला ह्मणजे श्रीसमर्थ व शिवाजीमहाराज यांचा होय. महा-राष्ट्राला अक्षयी मार्गदर्शक असा हा काळ आहे. कसाहि पडता काळ आला तरी त्यांतून पार पडून पुनरपि डोकें वर कसें काढावें, हें महाराष्ट्रास हा काळ सर्वकाळ शिकवीत राहील. ज्या दिवशीं महाराष्ट्रास ह्या काळाचा विसर पडेल, तो दिवस महाराष्ट्राच्या नाशाचा समजला पाहिजे; आणि जोंवर महाराष्ट्रास त्याची आठवण राहील, तोंवर अभ्युदयाविषयीं निराश होण्याचें त्यास कारण नाहीं.

अशा त्या काळाविषयीं व विशेषतः त्या काळांत जे दोन थोर पुरुष परमेश्वरी कृपेनें व महाराष्ट्राच्या भाग्यानें अवतीर्ण झाले होते, त्यांच्याविष-यीं अजून आपणांस किती तरी माहिती व्हावयाची राहिली आहे. रामदासी सां-प्रदाय, त्या सांप्रदायाची ऐहिक आणि पारमार्थिक कामगिरी, सांप्रदायांतील कर्ते पुरुष, सांप्रदायाची समर्थकालीन व नंतरची स्थिति, याविषयीं अजून कांहींच पुरावा प्रकाशित नाहीं ह्मटलें तरी चालेल. श्रीशिवाजीमहाराजांच्या संबंधानें कांहीं तुरळक कागदपत्रें अलिकडे प्रसिद्ध झालीं आहेत, परंतु महा-राजांचा व सांप्रदायाचा संबंध कितपत होता याविषयीं आपणांस सामान्य क-ल्पनेपलिकडे निश्चित असें अद्यापि कांहींच ज्ञान नाहीं.

हें ज्ञान होणें अगत्य आहे आणि ह्मणून तत्संबंधीं कागदपत्रांचा पुरावा मिळवून प्रसिद्ध करणें महाराष्ट्राचें कर्तव्य होय. ह्या कर्तव्याला स्मरून आ-पल्या हातून सांप्रदायाची कांहीं सेवा घडावी, अशी सभेची उत्कट इच्छा आहे. आतापर्यंत, अशा कागदपत्रांचा थोडा फार संग्रह झाला आहे व आ-

णखी होण्याची सभेला पूर्ण आशा आहे. हा सर्व संग्रह प्रकाशित होईपर्यंत आपआपले अभिप्राय प्रदर्शित करण्यास कोणी उतावीळ होऊं नये, अशी जरी सभेच्या तर्फे माझी नम्र विनंति आहे, तरी मी स्वतः एका बाबतींत जो उतावीळपणा करीत आहे, त्याबद्दल वाचकांनीं क्षमा करावी. श्रीसमर्थकालीन कागदपत्रांचा एक स्वतंत्र भाग आह्मी प्रसिद्ध करणार आहोंत; परंतु आतां-पर्यंत उपलब्ध झालेल्या कागदपत्रांतून जें पत्र वारंवार वाचून आह्मांस अत्या-नंद होतो, तें पत्र आणखी दोन चार वर्षे महाराष्ट्रवाचकांपासून लपवून ठेव-ण्याइतका धीर आह्मांस नाहीं. सदरहु पत्राची एक प्रत प्रथम आह्मांस सज्ज-नगडावर मिळाली व नंतर ताडून पाहण्यास सातारा जिल्ह्यांत दोन ठिकाणीं दोन प्रती मिळाल्या. तें पत्र नुसतें वाचण्यास सुद्धां गोड आहेच, पण त्या-पासून जीं कित्येक अनुमानें निघणार आहेत, तीं फार महत्त्वाचीं आहेत. ह्मणून तें पत्र आज येथें वाचकांस प्रेमपूर्वक सादर करितों.

श्री

श्रीरघुपती

श्रीमारुती

**श्रीसद्गुरुवर्य श्रीसकलतीर्थरूप श्रीकैवल्यधाम श्रीमहाराज श्रीस्वामी**

स्वामीचे सेवेसीं

चरणरज शिवाजी राजे यानी चरणावरी मस्तक ठेऊन विज्ञापना जे मजवर कृपा करुनु सनाथ केले आज्ञा केली कीं तुमचा मुख्य धर्म राज्यसा-धन करुनु धर्मस्थापना देवब्राह्मणाची सेवा प्रजेची पीडा दूर करून पाळण रक्षण करावे हें व्रत संपादून त्यांत परमार्थ करावा तुह्मी जें मनीं धराल तें श्री सिद्धीस पाववील त्याजवरून जो जो उद्योग केला व दुष्ट दुराडे लोकाचा नाश करावा विपुल द्रव्य करुनु राज्यपरंपरा अक्षई चालेल ऐशीं स्थळें दुर्घट करावी ऐसें जें जें मनीं धरिले ते ते स्वामीनीं आशिर्वादप्रतापें मनोरथ पूर्ण केले याउपरी राज्य सर्व संपादिलें तें चरणीं अर्पण करुनु सर्व काळ सेवा घडावी ऐसा विचार मनीं आणिला तेव्हां आज्ञा जाहाली कीं तुह्मास पूर्वी धर्म सांगितले तेच करावेस तीच सेवा होय ऐसें आज्ञापिले यावरून निकट वास घडुनु वारंवार दर्शन घडावें श्री ची स्थापना कोठें तरी होऊनु

2265ㄓ7

सांप्रदाय शिष्य व भक्ती दिगंत विस्तीर्ण घडावी ऐसी प्रार्थना केली तेही आसमंतात गिरिगव्हरीं वास करुनु चाफळीं श्री ची स्थापना करुनु सांप्रदाय शिष्य दिगंत विस्तीर्णता घडली त्यास, चाफळीं श्री ची पूजा मोहोछाव ब्राह्मणभोजन अतिथि इमारत सर्व यथासांग घडावे जेथें जेथें श्री च्या मूर्तिस्थापना जाहाली तेथें उछाव पूजा घडावी यास राज्य संपादिले यांतील ग्रामभूमि कोठें काय नेमावी ते आज्ञा व्हावी तेव्हां आज्ञा जाहाली की विशेष उपाधीचें कारण काय तथापि तुमचे मनीं श्री ची सेवा घडावी हा निश्चय जाहाला त्यास येथाअवकाश जेथें जें नेमावेसें वाटेल तें नेमावें व पुढें जसा सांप्रदायाचा व राज्याचा व वंशाचा विस्तार होईल तैसें करीत जावें - याप्रकारें आज्ञा जाहाली यावरुनु देशांतरीं सांप्रदाय व श्री च्या स्थापना जाहाल्या त्यास ग्रामभूमीचीं पत्रें करून पाठविलीं श्री संनिध चाफळीं एकशे एकवीस गांव सर्वमान्य व एकशे एकवीस गांवीं अकरा बिघेप्रमाणें भूमि व अकरा स्थळीं श्री ची स्थापना जाहाली तेथें नैवेद्य पूजेस भूमि अकरा बिघेप्रमाणें नेमिले आहेती ऐसा संकल्प केला आहे तो सिद्धीस नेहण्याविषयीं विनंति केली तेव्हां संकल्प केला तो परंपरेनें सेवटास न्याहावा ऐसी आज्ञा जाहाली त्याजवरून सांप्रत गाऊ व भूमी

नेमिले ........................................................ तपशील

{ येथें तेहतीस गांवें, ४१९ बिघे जमीन, एक कुरण व १२१ खंडी धान्य यांचा सविस्तर तपशील आहे. }

येकूण दरोबस्त सर्वमान्य गांऊ तेहेतीस व जमीन बिघे गाऊगना चारशे येकोणीस व कुर्ण येक व गल्ला खंडी एकशे एकवीस श्री चे पूजा उछाहाबद्दल संकल्पांतील सांप्रत नेमिले व उछाहाचे दिवसास व इमारतीस नक्ती ऐवज व धान्य समयाचे समयास प्रविष्ट करीन येणें करोन अक्षई उछाहादि चालविण्याविषीं आज्ञा असावी राज्याभिषेक ५ कालयुक्ताक्षी नाम संवत्सरे आश्विन शुद्ध १० दशमी बहुत काय लिहिणें हे विज्ञापना

ह्मणजे ह्या बहुमोल पत्रावर श्रीशिवाजीमहाराजांचा शिक्कामोर्तब होऊन आज बरोबर २२८ वर्षे झालीं. किती तरी महत्त्वाचें हें पत्र आहे. श्रीसमर्थ आणि श्रीशिवाजीमहाराज यांचा जो संबंध होता, त्याचा बराचसा उलगडा या पत्रानें होत आहे. कसा तो आपण पाहूं.

प्रथमतः मनांत असें येतें कीं, श्रीशिवाजीमहाराजांची साक्षरता जर सिद्ध असेल, तर हें सबंद पत्र त्यांच्या हातचें असण्याचा संभव फार आहे. अस्सल पत्र उपलब्ध होईल तर केवढी मौज होणार आहे. महाराजांचें स्वदस्तुरचें एक पत्र महाराष्ट्रास आज बिनमोल आहे. " श्रीसद्गुरुवर्य श्रीसकलतीर्थरूप श्रीकैवल्यधाम श्रीमहाराज श्रीस्वामी " हा मायना यापुढें सद्गुरूला पत्र लिहितांना सांप्रदायिकांनीं उपयोगांत आणावा अशी शिफारस आहे. सांप्रदायाला आरंभ झाला त्या काळचा तो मायना आहे. ज्यांच्याकरितां श्रीसमर्थांचा अवतार त्या गोब्राह्मणप्रतिपालक महाराष्ट्रराज्यसंस्थापकांनीं तो योजिलेला आहे. अर्थात् सर्व सांप्रदायिकांनीं त्याचें अनुकरण करणें इष्ट आहे. नुसत्या या मायन्यावरून देखील महाराजांची निष्ठा व्यक्त होत नाहीं काय ?

" चरणरज शिवाजी राजे " हे शब्द काय नुसते पोकळ आहेत ? हल्लींच्या सारखा तो काळ लाङ्गूलचालनाचा, दिखाऊपणाचा किंवा ढोंगाचा नव्हता. तो काळ स्पष्टवक्तेपणाचा, सरळ वर्तनाचा, खऱ्या प्रेमाचा, सत्यनिष्ठेचा, धैर्याचा आणि संतजनसेवेचा होता. हेच गुण महाराष्ट्रधर्म शिकवितो व हेच गुण महाराष्ट्रसमाजाचे स्वाभाविक होत. परिस्थिति पालटल्यामुळें ह्या गुणांची आपणांस आज ओळख राहिली नसेल, आज महाराष्ट्रसमाजाच्या ठिकाणीं विपरीत गुण दिसत असतील, पण तो त्याचा स्वभाव नसून, ते विपरीत गुण कोणी तरी त्या समाजाला चिकटविलेले आहेत ! समाजानें किंचित् शरीर हलविल्यास हे बाहेरून चिकटविलेले गुण गळून पडून त्याचें पूर्व उज्वल स्वरूप त्यास पुनरपि प्राप्त होणार आहे. सांप्रदायिकांनीं या गोष्टीचा विचार केला पाहिजे. सारांश, " चरणरज शिवाजी राजे " ही नुसती लिहिण्याची पद्धत नसून श्रीसमर्थांच्या ठायीं महाराजांची लीनता किती होती ती या शब्दरचनेवरून व्यक्त होत आहे.

प्रस्तुतचें पत्र मननपूर्वक वाचलें ह्मणजे कालक्रमानुसार निरनिराळ्या ठळक अकरा प्रसंगांचा त्यांत उल्लेख आहे, असें दिसतें. किंबहुना, श्रीसमर्थांची भेट झाल्यापासून तों पत्राच्या मित्तीपर्यंतचा वृत्तान्त सारांशरूपानें महाराजांनीं या पत्रांत नमूद केला आहे. ते अकरा प्रसंग येणें प्रमाणें:—

( १ ) **श्रीसमर्थांनीं** महाराजांवर अनुग्रह करून आज्ञा केली कीं, तुमचा मुख्य धर्म राज्यसाधन करुनु धर्मस्थापना, देवब्राह्मणाची सेवा व प्रजेची पीडा दूर करून पाळण रक्षण करणें हा होय. अनुग्रह झाला त्याच वेळीं श्रीसमर्थांनीं आशिर्वाद दिला कीं, तुह्मी जें जें मनीं धराल तें तें श्री सिद्धीस पाववील.

( २ ) **त्याजवरून**, महाराजांनीं जो जो उद्योग केला त्यांत त्यांना यश येऊन त्यांचे सर्व मनोरथ स्वामींच्या आशिर्वादप्रतापेंकरून पूर्ण झाले.

( ३ ) **याउपरी**, महाराजांनीं श्रीसमर्थचरणीं संपादिलेलें राज्य अर्पण करून सर्व काळ सद्गुरुसेवा घडावी ह्मणून इच्छा प्रदर्शित केली.

( ४ ) **तेव्हां**, पूर्वीं सांगितलेल्या धर्माप्रमाणें वर्तन करणें हीच सेवा होय, अशी श्रीसमर्थांची आज्ञा जाहली.

( ५ ) **यावरून**, निदान मग कोठें तरी निकट वास घडुनु सद्गुरूचें वारंवार दर्शन घडावें व श्रीची स्थापना कोठें तरी होउनु सांप्रदाय दिगंत वाढावा अशी महाराजांनीं प्रार्थना केली.

( ६ ) **तेही**, स्वतः आसमंतात गिरिगव्हरीं वास करुनु श्रीसमर्थांनीं चाफळीं श्रीची स्थापना केली व सांप्रदाय दिगंत वाढला.

( ७ ) **त्यास**, चाफळीं श्रीची पूजा, महोत्सव इत्यादि धर्मकृत्यें यथासांग चालावीं व श्रीमारुतीच्या मूर्ति जेथें जेथें स्थापन झाल्या होत्या तेथें तेथें नित्यपूजा व उत्सव व्हावा यासाठीं ग्रामभूमि कोठें काय नेमावी ह्मणून आज्ञा व्हावी, अशी महाराजांनीं प्रार्थना केली.

( ८ ) **तेव्हां**, श्रीसमर्थांची आज्ञा जाहाली कीं, विशेष उपाधीचें कारण नाहीं, तथापि श्रीची सेवा घडावी हा तुमचा कृतनिश्चय असल्यामुळें

यथावकाश जेथें जें नेमावेसें वाटेल तें नेमावें व पुढें जसा सांप्रदायाचा, राज्याचा व वंशाचा विस्तार होईल तैसें करीत जावें.

( ९ ) **यावरुनु,** देशांतरीं सांप्रदाय व श्रीमारुतीच्या स्थापना जाहाल्या त्यास ग्रामभूमीचीं पत्रें करून महाराजांनीं पाठविलीं व चाफळास श्रीसंनिध १२१ गांव सर्वमान्य व १२१ गांवीं ८११ बिघेप्रमाणें भूमि व ११ गांवीं श्रीमारुतीकडे ८११ बिघेप्रमाणें भूमि नेमण्याचा आपण केलेला संकल्प कळवून तो सिद्धीस नेण्याविषयीं विनंति केली.

( १० ) **तेव्हां,** केलेला संकल्प परंपरेनें शेवटास न्यावा ह्मणून श्रीसमर्थांची आज्ञा जाहाली.

( ११ ) **त्याजवरून,** सांप्रत ह्मणजे शके १६०० आश्विन शुद्ध दशमीस संकल्पित १२१ गांवांपैकीं ३३ गांव सर्वमान्य व १४५२ बिघ्यांपैकीं ४१९ बिघे भूमि, शिवाय एक कुरण व १२१ खंडी धान्य नेमण्यांत आलें, त्याचा तपशील देऊन, शिवाय उत्सवप्रसंगीं व इमारतीकडे नक्त ऐवज व धान्य समयाचे समयास पाठवीत जाईन. असें अभिवचन देऊन अक्षयी उत्सवादि चालविण्याविषयीं महाराजांनीं श्रीसद्गुरूची आज्ञा मागितली.

सारांश, हें पत्र ह्मणजे श्रीसमर्थ व श्रीशिवाजीमहाराज यांचा जो परस्परसंबंध त्याचा संक्षिप्त इतिहास होय. **त्याजवरून, याउपरी, तेव्हां, यावरून, तेही, त्यास** इत्यादि प्रकारें अकराहि प्रसंगांचा संबंध कसा जोडला गेला आहे व त्यावरून कालानुक्रमाची मी केलेली कल्पना बरोबर आहे किंवा नाहीं याचा निर्णय वाचकांनीं करावा. माझ्या समजुतीनें या पत्रावरून पुढील गोष्टी सिद्ध होतात :—

( १ ) श्रीशिवाजीमहाराजांस श्रीसमर्थांचा अनुग्रह होता.

( २ ) राज्यसाधन करण्याचा कानमंत्र समर्थांनीं महाराजांना सांगितला. राज्यसाधन कशासाठीं करावयाचें ? धर्मस्थापना, देवब्राह्मणसेवा व प्रजापालन होण्यासाठीं. ह्मणजे धर्मस्थापना, देवब्राह्मणसेवा व प्रजेच्या दुःखाचें निवारण या गोष्टी होण्यास स्वराज्य पाहिजे. त्याशिवाय बाकी व्यर्थ,

( ३ ) राज्यसाधन करून या गोष्टी साधणें हाच महाराजांचा मुख्य धर्म होय, असा श्रीसमर्थांचा त्यांना उपदेश होता. क्षत्रियाचा परमार्थ हाच.

( ४ ) तुमचे सर्व मनोरथ श्रीरघुपति पूर्ण करील असा शिवाजीमहाराजांना श्रीसमर्थांचा आशिर्वाद होता. केवढी पुण्याई ! श्रीसमर्थांसारिखे आपले पाठिराखे आहेत, याचा महाराजांना केवढा तरी आधार वाटला असला पाहिजे.

( ५ ) आपल्या एकंदर उद्योगाला यश आलें, दुष्ट दुरात्मे लोकांचा नाश झाला, विपुल द्रव्य मिळून राज्यास बळकटी आणणारे गड, कोट, किल्ले बांधले गेले, इत्यादि आपले सर्व मनोरथ पूर्ण झाले, हा स्वामींच्या चरणाचा प्रताप होय, असा महाराजांचा पूर्ण विश्वास होता.

( ६ ) अशा सद्गुरूच्या चरणीं सर्व राज्य अर्पण करून अखंड सद्गुरुसेवा घडावी, राज्यापायीं सद्गुरुचरण अंतरतील तर नको तें राज्य, अशी वैराग्यवृत्ति महाराजांच्या ठिकाणीं उद्भवली होती.

( ७ ) अशा वेळीं समर्थांनीं महाराजांना राजनीतिपर बोध करून क्षात्रधर्म सांगितला व तदनुरूप वर्तन करणें हीच आपली सेवा होय, अशी आज्ञा केली.

( ८ ) राज्य सद्गुरुचरणीं अर्पण केलें असतां, सद्गुरु तें पतकरीत नाहींत व स्वतः राज्यसाधन करीत असावें तर अखंड सेवा घडत नाहीं, तेव्हां मग निदान वारंवार दर्शन घडावें, ह्मणून श्रीरघुपतीची कोठें तरी स्थापना होऊन संप्रदाय दिगंत वाढावा, अशी महाराजांनीं समर्थांची करुणा भाकिली आणि त्यावरून मग श्रीसमर्थांनीं चाफळास श्रीरघुपतीची स्थापना केली.

( ९ ) ह्मणजे चाफळास श्रीरघुपतीची स्थापना होण्यापूर्वी श्रीरामदासस्वामी व छत्रपतिशिवाजीमहाराज यांची भेट झाली होती, ही गोष्ट निर्विवाद होय. किंबहुना, राज्यसंपादन करण्यापूर्वीच महाराजांनीं श्रीसमर्थचरणांचा आश्रय केला होता, असें वरील सर्व कलमांचा साकल्यानें विचार केला तर दिसतें. राज्यसाधन करण्याची स्फूर्ति महाराजांच्या ठिकाणीं समर्थांनीं उत्पन्न केली, असेंहि अनुमान काढण्यास अस्पष्ट आधार या पत्रांत मिळत आहे.

( १० ) श्रीसमर्थ उपाधींचा विस्तार करीत, परंतु त्यांत स्वतः सांपडत नसत. चाफळास श्रीरामाची स्थापना झाली तरी ते स्वतः गिरिगव्हरींच वास करीत.

( ११ ) समर्थांनीं स्थापन केलेले असे अकराच मारुती होत.

श्रीसमर्थांची व महाराजांची प्रथम भेट केव्हां झाली, या वादग्रस्त प्रश्नाचा निकाल लावण्यास वरील पत्राची बरीच मदत होईल. किंबहुना, या पत्रावरून या प्रश्नाचा कायम निकाल लागतो, असें ह्मटल्यास हरकत नाहीं. महाराजांना सनाथ करून समर्थांनीं त्यांना पहिली आज्ञा केली कीं, " तुमचा मुख्य धर्म राज्यसाधन करुनु धर्मस्थापना, देवब्राह्मणाची सेवा, प्रजेची पीडा दूर करून पाळण रक्षण करावें, हें व्रत संपादून त्यांत परमार्थ करावा. " यावरून राज्यसाधन करण्याची मूळ शिक्षा महाराजांसारख्या सच्छिष्याला श्रीसमर्थांनीं लावली कीं काय, असें नुसतें मनांत येतें. परंतु ही कल्पना खरी ठरण्यास, यापेक्षां आणखी जास्त आधार पाहिजे, हें उघड आहे. " दुष्ट दुराढे लोकाचा नाश करावा, विपुल द्रव्य करुनु राज्यपरंपरा अक्षई चालेल ऐशीं स्थळें दुर्घट करावी, ऐसें जे जे मनीं धरिलें ते ते स्वामीनीं आशिर्वादप्रतापें मनोरथ पूर्ण केले." यांतहि दुष्ट दुराढे व्यक्तींचा उल्लेख नाहीं किंवा दुर्घट स्थळांचा नामनिर्देश नाहीं, त्यामुळें नक्की शक ठरवितां येत नाहीं. पण वरील दोन्हीं वाक्यें एकत्र वाचलीं, ह्मणजे महाराजांच्या राजकारणपर कारकीर्दीच्या अगदीं आरंभीच्या काळाला अनुलक्षून हे उल्लेख असावेत असें मानण्याकडे मनाचा विशेष कल होतो. परंतु ज्या कल्पना या एक दोन वाक्यांवरून नुसत्या मनांत येतात, त्यांचा निर्णय पुढील दोन तीन वाक्यांत कायमचा होत आहे. सद्गुरुचरणीं सर्व राज्य अर्पण करून अखंड सेवा घडावी असा महाराजांचा विचार श्रीसमर्थांनीं खोडून काढल्यावर महाराजांनीं, " निकट वास घडुनु वारंवार दर्शन घडावें, श्रीची स्थापना कोठें तरी होउनु सांप्रदाय, शिष्य व भक्ती दिगंत विस्तीर्ण घडावी, ऐसी प्रार्थना केली. तेही, आसमंतात गिरिगव्हरीं वास करुनु चाफळीं श्रीची स्थापना करुनु सांप्रदाय शिष्य दिगंत विस्तीर्णता घडली." यावरून इतकी गोष्ट निःसंशय ठरते कीं, चाफळास श्रीची स्थापना होण्याच्या पूर्वीं कोठें तरी श्रीची स्थापना व्हावी ह्मणून महाराजांनीं

समर्थांची प्रार्थना केली होती व त्यावरून मग चाफळास श्रीरघुपतीची स्थापना झाली. ती स्थापना कोणत्या सालीं झाली ही गोष्ट कागदपत्रांच्या ,आधारानें ठरली ह्मणजे उभयतांच्या भेटीचा काळ कांहींसा निर्णित होईल. चाफळास श्रीची स्थापना, निदान शके १५८० च्या पूर्वी झाली होती, इतकी गोष्ट खरी. कशी, तें इतक्यांतच पाहूं. पांच, चार उत्सव मसुरेंत जाहल्यानंतर शके १५७० त चाफळास श्रीची स्थापना होऊन उत्सव सुरू झाला, असें हनुमंतस्वामी सांगतात. हा शक बरोबर नाहीं असें मानण्याला कांहींच जागा नाहीं. तो बरोबर असेल तर शके १५७० च्या पूर्वीच किंवा सुमारास उभयतांची भेट झाली, असें ठरतें.

पण मग, श्रीमत् दासबोधाच्या प्रस्तावनेंत सामान्य विचिकित्सा करितांना, फाल्गुन शु. २ शके १५८० चें भास्करगोसावी यांचें दिवाकरगोसावी याप्रती जें पत्र दिलें आहे, त्याची वाट काय ? तसेंच रा. रा. गोविंद काशीनाथ चांदोरकर यांनीं ज्येष्ठ व. १३ शके १८२८ रोजीं "केसरी" पत्रांत एक पत्र प्रसिद्ध करून एका अस्सल पत्राच्या आधारें असें सिद्ध केलें होतें कीं, शके १५९४ त महाराजांची व समर्थांची प्रथम भेट झाली. तेव्हां हा काय घोटाळा आहे ?

हा घोटाळा इतःपर राहूं नये ह्मणून हीं दोन्ही पत्रें प्रथम येथें उतरून घेऊं व नंतर त्यांचा अर्थ कसा करावयाचा तें पाहूं.

श्रीराम

रघुवीर

श्रीगुरु भक्तपरायण मोक्षश्रिया विराजित दिवाकर गोसावि याप्रती भास्कर गोसावि नमस्कार विनंती उपरि श्री चे उछाहास होंनु पन्नास भिक्षेस मिळाले ते भानजीगोसाविबराबर पाठविले पावतील शिवाजी राजे यांच्याकडे भिक्षेस गेलों त्यानी विचारिले तुह्मी कोठील कोण कोणा ठिकाणी असता त्यावरून अह्मी बोललो की अह्मी रामदासी श्रीसमर्थांचे शिष्य चाफळास राहतो मग ते बोलले की ते कोठे राहतात व मूळ गांव कोण त्याजवरून मीं सांगितले की गंगातीरीचे जांबेचे राहणार प्रस्तुत चाफळास मठ करून श्री देवाची स्थापना करून

उत्साह मोहोत्साव चालु करून आह्मा सर्वत्रास आज्ञा की तुह्मी भीक्षा करुन उत्साह करित जावा ऐसे सांगितल्यावरून अह्मी हिंडत आहो असे बोलतांच राजेश्रीनी दत्ताजीपंत वाकेनिविस यास प्रतिवर्षि श्री
चे उत्साहास दोनशे होंनु देत जाणे ह्मणुन पत्र पाठविले ते होंनु समयास येतील कळावें फाल्गुन शुद्ध २ शके १५८० हे विनंती

असें हें एक पत्र आहे व तें श्रीमत दासबोधाच्या प्रस्तावनेंत नकलेवरुन दिलें होतें. ती नकल आह्मांस दिवाकर गोसावी यांचे वंशज चाफळास होते त्यांचेकडून मिळाली होती. पुढें रा. चांदोरकर यांनीं दिवाकरांचे आणखी एक वंशज मालेगांवाकडे आहेत त्यांचेकडून कांहीं पत्रें मिळविलीं, त्यांत अस्सल ह्मणून वरील पत्र होतें, त्यावरून तें वर देण्यांत आलें आहे. दुसरें पत्र हि रा. चांदोरकर यांनीं मिळविलेल्या पत्रांतच आहे. तें पत्र जसेच्या तसें उतरून घेतों.

**श्रीराम**

श्रीरामदासस्वामी

श्रीगुरुभक्तपरायण राजमान्य राजेश्री दिवाकर गोसावि यासी
प्रतिपूर्वक केशव गोसावि नमस्कार उपरी येथलि कुशल आपण पत्र पाठविले ते पावले मजकुर समजला राजेश्री शीवराजे भोसले हे समर्थाचे भेटीस येणार ह्मणोन लिहीले ते समजले मी येणार होतो परंतु माझी प्रकृती फार बीघडली येणे होत नाही मी इकडुन अकास येणेसाठी लिहीले परंतु अकाचेही येणे व्हावयाचे नाहीं गावी भानजी गोसावी तेथे असतील राजे यांची पाहिलीच भेटी आहे वाडीचे लोकास खटपटेस अणावे उपयोग होईल झाडी बहुत आहे इकडुन उदईक त्रिंबक गो॥ व विठ्ठल गो॥ व दत्तात्रय गो॥ उदइक पाठउन देतो श्री चे उत्सा-
बास भीक्षेचे धान्य जे मिळाले ते अश्वत्थभट मसुरकर यासमागमे पाठविले दत्ताजीपंताकडुन दोनशे होंनु उत्सावास पाठविले ते अले असतील लोभ करावा मीती चैत्र व॥ १ शेक १५९४ हे विज्ञति.

अशीं हीं दोन पत्रें आहेत. पैकीं वरील दुसरें पत्र अस्सल असावें असें वाटत नाहीं. पत्रांतील चुकांवरूनच ती नकल असावी असें दिसत

आहे. केशव गोसावी यांनीं तें दिवाकर गोसाव्यांना लिहिलेलें आहे. केशव गोसावी हे कल्याणमहाराजांचे शिष्य असून उंब्रज मठाचे अधिपति होत. बेणीस्वामीकृत सीतास्वयंवर काव्याची एक सुंदर प्रत केशव गोसावी यांच्या हातची मजजवळ आहे. शिवाय त्यांच्या हातच्या दासबोधाच्या दोन पोथ्या, एक शके १६१८ तील व दुसरी शके १६२४ तील, माझ्या पाहण्यांत आहेत. १६१८ तील प्रत डोमगावीं मठांत व १६२४ तील उंब्रजेस मठांत आहे. तें अक्षर व या पत्राचें अक्षर अगदीं निराळें आहे. पत्रांतील शकापैकीं ९ चा आंकडा संदिग्ध आहे. तथापि हीं दोन्हीं पत्रें अस्सल असोत किंवा नसोत, तीं खरीं आहेत असें मानून आपण त्यांचा अर्थ केला पाहिजे.

या प्रकरणांत अगदीं आरंभीं सादर केलेलें पत्र श्रीशिवाजीमहाराजांनीं श्रीसमर्थांस लिहिलेलें आहे. त्यांत जी हकीकत खुद्द महाराज लिहित आहेत, ती अन्यथा असण्याचा लवमात्र संभव नाहीं. त्यांत जो कार्यकारणभाव स्पष्टपणें दर्शित होत आहे, तो ओढाताण करून उडवितां येत नाहीं. सारांश, महाराजांचें पत्र प्रमाणभूत मानून चालल्याशिवाय गत्यन्तर नाहीं. त्याच्याशीं सकृद्दर्शनीं विरुद्ध भासणारीं पत्रें, एक तर बनावट मानण्यास तयार झालें पाहिजे किंवा त्यांचा अर्थ या पत्राच्या आधारानें लावला पाहिजे.

( १ ) महाराजांच्या पत्रावरून तर असें दिसतें कीं, राज्यस्थापनेच्या आरंभापासूनच त्यांना श्रीसमर्थांकडून सल्लामसलत मिळत असे. निदान इतकी गोष्ट खरी कीं, चाफळास श्रींची स्थापना महाराजांच्या विनंतीवरून झाली.

( २ ) भास्कर गोसाव्यांच्या पत्रावरून चाफळास श्रींची स्थापना शके १५८० चे पूर्वींच झाली होती, ही गोष्ट निर्विवादपणें सिद्ध होत आहे. ह्मणजे १५८० चे पूर्वींच महाराजांची व श्रीसमर्थांची भेट झाली होती पण याच पत्रावरून असा भास होतो कीं, १५८० चे फाल्गुन शुद्ध २ पर्यंत महाराजांच्या कानावर श्रीसमर्थांचें जसें काय नांवहि गेलें नव्हतें. महाराजांचें पत्र उपलब्ध न होतें तर हाच ग्रह दृढ झाला असता. परंतु दासबोधाची प्रस्तावना लिहितांना भास्कर गोसाव्यांच्या पत्रासंबंधानें जो संशय दर्शविला होता तोच आतां खरा ठरूं पाहतो. "न जाणो श्रीशिवाजीमहाराजांनीं भास्कर

गोसावी यांस ओळख दिली नसावी" असा त्या वेळीं मी संशय दर्शविला होता. महाराजांनीं त्यांना ओळख दिली नसावी किंवा भास्कर गोसावी समर्थांचे नवीन शिष्य झाले असून महाराजांचे पूर्वींचे परिचित नसल्यामुळें, महाराजांनीं खात्री करून घेण्यासाठीं त्यांना कांहीं सवाल केले असावेत किंवा खरा प्रकार आणखी कांहीं निराळाच असेल; महाराजांच्या पत्रावरून इतकी गोष्ट निर्विवाद ठरतें कीं, १५८० च्या पूर्वींच महाराजांची व समर्थांची भेट झाली होती आणि ह्मणून भास्कर गोसाव्यांच्या पत्रासंबंधानें कांहीं तरी कल्पनाच बसविली पाहिजे.

( ३ ) केशव गोसाव्यांच्या एकट्या पत्रावरून तर अगदींच अयथार्थ ग्रह होण्याचा संभव होता. शके १५९४ पर्यंत उभयतांची भेट झाली नव्हती, अशी विपरीत कल्पना या पत्रावरून होते. आधीं ही गोष्ट संभवते तरी काय? महाराजांसारखे स्वराज्यसंस्थापक आणि समर्थांसारखे स्वधर्मसंस्थापक एकाच प्रांतांत कित्येक वर्षें प्रयत्न करीत असून हि एकमेकांस भेटल्यावांचून राहते काय? ठिकठिकाणीं श्रीमारुतीची स्थापना व चाफळीं श्रीरघुपतीची स्थापना करून ज्यांचा शिष्यसांप्रदाय दिगंत विस्तीर्ण वाढला होता अशा श्रीसमर्थांची भेट, स्वराज्यस्थापनेच्या कामीं हरएक प्रकारच्या मनुष्याचें सहाय्य घेणारे श्रीशिवछत्रपतिमहाराजांसारखे धोरणी नरवीर यांनीं घेतल्यावांचून पांच पंचवीस वर्षें जाऊं दिलीं असतीं काय? शके १५६६ पासून १५९४ पर्यंत ह्मणजे २८ वर्षें उभयतांचे प्रयत्न एकाच प्रांतांत एकाच अंतिम उद्देशानें सुरू असून परस्परांची भेट मात्र नाहीं, यावर क्षणभर तरी विश्वास बसतो काय? पण प्रस्तुतचें महाराजांचें पत्र जर न मिळतें, तर नुसत्या संभवानें, विश्वासानें किंवा कल्पनेनें केशव गोसाव्यांच्या पत्राचा उलगडा करण्याचा माझा प्रयत्न वाचकांनीं निमूटपणें कबूल केला असतां कीं काय, याची शंका आहे. सारांश, स्थळ, वेळ, प्रसंग, व्यक्ति इत्यादिकांच्या सापेक्षतेनेंच केशव गोसावी यांनीं "प्रथम भेट" ह्या शब्दांचा उपयोग आपल्या पत्रांत केला असला पाहिजे, असे मानल्यावांचून दुसरी तोड नाहीं.

जी कथा या दोन पत्रांची तीच इतर उपलब्ध, अनुपलब्ध पत्रांची होय. अशीं संशयोत्पादक पत्रें आधीं फारशीं नसावयाचींच. जीं असतील त्यांचा अर्थ महाराजांच्या पत्राला धरूनच केला पाहिजे. सारांश महाराजांच्या

पत्रामुळें अनेक मतें व मतांतरें यांचा निकाल लागतो. सदरहु पत्रावरून निर्विवादपणें निष्पन्न होणारे सिद्धान्त अन्यथा मानतां येत नाहींत व यापुढें जो जो कागदपत्रांचा पुरावा उपलब्ध होईल त्यानें या सिद्धांतांचीच पुष्टि होणार आहे असा पूर्ण भरंवसा वाटतो. अजून किती तरी पत्रव्यवहार उपलब्ध व्हावयाचा राहिला आहे व जो झाला आहे तो प्रकाशित व्हावयाचा आहे. श्रीसद्गुरुसमर्थ रामदासस्वामी व शिवाजीमहाराज यांचा संबंध दर्शविणारा एवढाच पुरावा आहे असें नाहीं. आणखी अनेक प्रकारचा पुरावा आहे. त्या सर्वांचें साद्यंत विवेचन पुढें केव्हां तरी करूं.

तूर्त महाराजांच्या या बहुमोल पत्रावरून ज्या कल्पना मनांत आल्या, त्या येथें नमूद केल्या आहेत. त्यांच्या ग्राह्याग्राह्यतेचा विचार करणें वाचकांकडे आहे. श्रीसद्गुरुसमर्थ रामदास स्वामी व श्रीशिवाजीमहाराज यांचा परस्परसंबंध, परस्परप्रेम, सद्गुरूंची निरपेक्षता व सच्छिष्याचा अनन्यभाव इत्यादिकांचा अदमास होण्यास हें प्रकरण अंशतः कारणीभूत झाल्यास आज जो थोडासा उतावीळपणा केला आहे, तो क्षम्य होईल. महाराष्ट्रास त्या काळाचें यथार्थ ज्ञान होऊन त्यास आत्मोन्नतीचा मार्ग सद्गुरुकृपेनें दिसावा अशी प्रार्थना करून हें प्रकरण संपवितों.

---

# उपसंहार

चाफळपासून दोन कोसांवर शिरगांव आहे. तेथील मठांत कांहीं काळ श्रीसमर्थांचा वास होता. कल्याणस्वामी, त्यांचे बंधु दत्तात्रयस्वामी व मातुःश्री असे त्रिवर्ग प्रथम याच मठांत राहत असत. पुढें कल्याणस्वामी डोमगांवीं गेले व दत्तात्रयस्वामी शिरगांवींच राहिले. दत्तात्रयस्वामींची समाधि शिरगांवीं मठांत आहे. या मठांत बरेच कर्ते पुरुष होऊन गेले. उभयता बंधु कल्याणस्वामी व दत्तात्रयस्वामी हे समर्थांचे ग्रन्थ उतरून

घेण्यासाठीं शिरगांवास आणित असत अशी आख्यायिका आहे. तेव्हां अशा मठांत तत्कालीन कागदपत्रें, ग्रन्थ वगैरेंची माहिती घेण्यासाठीं गेलों असतां जो संग्रह मिळाला त्यांतील एका बाडांत असलेला भीमस्वामींचा भक्तलीलामृत ग्रन्थ प्रस्तुत भागांत आरंभीं छापला आहे.

दोघां भावांपैकीं एकानें सर्वस्वीं व दुसऱ्यानें प्रपंच साधून देशकार्य व धर्मकार्य करावें, असा सद्गुरूनींच घालून दिलेला कित्ता कल्याणस्वामी व दत्तात्रयस्वामी यांनीं गिरविला. या उभयतां बंधूपैकीं कल्याणस्वामी ब्रह्मचारी राहिले व दत्तात्रयस्वामी वंशधर झाले. दत्तात्रयस्वामींचे पुत्र राघवस्वामी, राघवस्वामींचे यशवंतस्वामी व यशवंतस्वामींचे पुत्र प्रस्तुत चरित्रकार भीमस्वामी होत. असें दिसतें कीं, नुसतें श्रीसमर्थांचेंच चरित्र लिहिण्याचा भीमस्वामींचा आरंभीं हेतु होता. शके १७१९ त श्रावण वद्य २ ला त्यांनीं समर्थांचें चरित्र संपविलें. परंतु मग पुढें, मनांत येतील त्या साधूंच्या लीला वर्णन करण्यास त्यांनीं सुरवात केली व ग्रन्थ जसा वाढत गेला तसें त्यास "भक्तलीलामृत" असें शेवटीं नांव दिलें. हा शेवट केव्हां केला त्याचा शक दिलेला नाहीं.

श्रीसमर्थखेरीजकरून ३७ भक्तांच्या आख्यायिका भीमस्वामींनीं दिल्या आहेत; शिवाय अनंताची व अर्जुनाची अशा दोन कथा सांगितल्या आहेत. ३७ भक्तांपैकीं दोन स्त्रिया आहेत. ह्या ३७ भक्तांची निवड भीमस्वामींनीं कोणत्या धोरणानें केलेली आहे, हें कळत नाहीं. समर्थकालीन रामदासी सांप्रदायांतील कर्त्या पुरुषांचीं चरित्रें भीमस्वामींनीं वर्णिलीं असतीं तर सांप्रदायाचा इतिहास जाणण्यास आज केवढी तरी मदत झाली असती. शके १८२८ पेक्षां १७२८ चे सुमारास रामदासी संतांचीं चरित्रें वर्णन करण्यास साधनें पुष्कळ असलीं पाहिजेत, व भीमस्वामींनीं त्यांचा उपयोग केला असतां तर सांप्रदायाचें केवढें कार्य झालें असतें. खुद्द कल्याणस्वामी व दत्तात्रयस्वामी यांचीं चरित्रें एक दोन पानांवरच भागविलीं आहेत, याचें वाईट वाटतें. दासपंचायतनापैकीं जयरामस्वामी व रंगनाथस्वामी; श्रीसमर्थांचे मुख्य मुख्य शिष्य; सतीबाई, वेणाबाई, बहिणाबाई, आकाबाई, गिरिबाई वगैरे रामदासांकित स्त्रिया; इत्यादिकांचा उल्लेख भक्तलीलामृत ग्रन्थांत नसावा, हें नवल आहे.

शके १७१९ मध्यें प्रस्तुतचा ग्रन्थ निर्माण होईपर्यंत वारकरी पंथ आणि रामदासी सांप्रदाय यांच्यांत विरोध नव्हता, हें भीमस्वामींनीं जी सरसकट भक्तांची लीला वर्णिली आहे त्यावरून उघड दिसतें. असा विरोध पूर्वी नव्हता व केव्हां हि नसला पाहिजे. समर्थसांप्रदायाचें जें मुख्य अंग हरिकथानिरूपण तें वारकरीपंथाचें सर्वस्व होय. अर्थात वारकरी पंथाचा समावेश रामदासी सांप्रदायांत होऊं शकतो. त्यांच्यांत विरोध संभवत नाहीं व तो उत्पन्न करण्याच्या भरीस कोणी पडूं नये हेंच उत्तम.

प्रस्तुतचा भक्तलीलामृत ग्रन्थ व इतर कांहीं बाडें शिरगांवमठांतील रा. भ. प. रघुनाथबुवा ऊर्फ लक्ष्मण यशवंत यांचे कारभारी रा. रा. गणपतराव ऊर्फ भाऊसाहेब यांनीं आमच्या हवालीं केलीं आहेत. तसेंच रा. भ. प. कृष्णाबुवा यांचेकडून हि कांहीं संग्रह मिळाला आहे. या उभयतांचे आह्मी फार आभारी आहोंत.

तंजावरमठपति श्रीसमर्थशिष्य शहापुरकर भीमस्वामी यांनीं लिहिलेलें श्रीसमर्थांचें चरित्र शेवटीं दिलें आहे. या लहानशा चरित्राचें महत्त्व मागें एकाप्रकरणांत दर्शित केलेंच आहे. श्रीसमर्थांच्या अवतारसमाप्तीनंतर लागलींच हें त्रोटक चरित्र लिहिलें गेलें. हनुमंतस्वामींच्या ह्मणण्याप्रमाणें शके १६०३ च्या माघ वद्य ९ नंतर तिसऱ्या दिवशीं भीमस्वामी तंजावराहून आले, तेव्हां त्यांना श्रीसमर्थांच्या अवतारसमातीची बातमी लागून त्यांनीं बहुत शोक केला. तेव्हांचें हें चरित्र आहे. अशीं दहा पांच चरित्रें उपलब्ध होतील तर आणखी काय पाहिजे ! हें चरित्र चाफळमठांतील असून तें श्रीबापुसाहेबमहाराज यांचेकडून आह्मांस मिळालें. त्यांचे आभार मानावे तितके थोडेच. सभेनें स्वीकारलेल्या प्रस्तुतच्या उद्योगाबद्दल त्यांची पूर्ण सहानुभूति आहे आणि ह्मणूनच सांप्रदायाची थोडी फार सेवा करण्याची सभेस उमेद आहे.

श्रीमत् दासबोधाच्या प्रस्तावनेंत दुसरा भाग श्रेष्ठांच्या ग्रन्थांचा काढूं असें ह्मटलें होतें. परंतु ते ग्रन्थ वेळेवर तयार न झाल्यामुळें मध्यंतरीं हा भाग घेतला. या पुढचा भाग हि श्रेष्ठांच्या ग्रन्थांचा न घेतां वाचकांना ज्याची अत्यन्त उत्सुकता आहे असा श्रीसमर्थांच्या प्रकरणांचा घेऊं. या संबंधाची

एक अडचण वाचकांच्या कानीं घालून ठेवणें बरें. समर्थांच्या एकाच प्रकरणांपैकीं कांहीं भाग छापलेला आणि कांहीं भाग न छापलेला असा असल्यास तें सबंध प्रकरण एकाच भागांत येणें जरूर आहे. शिवाय समर्थांचे इतर सर्वच ग्रन्थ शुद्ध व अस्सलबरहुकुम आपणांस छापणें अ.हेतच. तेव्हां समर्थांच्या इतर ग्रन्थांचें यापुढें जे दोन तीन भाग निघणार आहेत त्यांत प्रकाशित आणि अप्रकाशित असा भेदाभेद करून घोटाळा करण्याच्या ऐवजीं त्यांचे सर्व ग्रन्थ कल्याणस्वामींनीं लिहिलेल्या क्रमानुसार छापण्याचा आमचा विचार आहे, तो वाचकांस पसंत पडेल असा भरंसा आहे. दरम्यान श्रीसमर्थकृत मनाच्या श्लोकांचा एक स्वतंत्र भाग श्रीमत् भगवद्गीतेप्रमाणें छापावा अशी पुष्कळ रामदासीयांची सूचना आहे. खुद्द कल्याण स्वामींच्या हातचे हे श्लोक सभेजवळ आहेत. प्रकाशित श्लोकांशीं ते ताडून पाहिले म्हणजे प्रकाशित श्लोकांत हळुहळु पाठभेद होऊन कशा चुका होत गेल्या, हें समजतें. श्रीमत् दासबोधाची प्रस्तावना लिहितांना त्यावेळीं उपलब्ध झालेल्या संग्रहावरून " रामदास आणि रामदासी " ग्रन्थमालेचे सात भाग योजिले होते, परंतु हल्लीं जो संग्रह झाला आहे व होत आहे, त्यावरून आतां एकंदर किती भाग होतील याचा नक्की अंदाज करितां येत नाहीं. काय घडेल तें खरें ! श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥

धुळें
विजयादशमी १८२८ } सत्कार्योत्तेजक सभा.





श्रीराम

शिरगांवमठपति भीमस्वामीकृत

# भक्तलीलामृत



श्रीराम

अलभ्याचा हा लाभ थोर जाला ।
विश्वजनासी उपेगा आला ।
कीर्तिरूपेंचि विस्तारला ।
दाही दिशा भरोनि पुरवला ॥ १ ॥

गे बाइये स्वामी तो आठवे मनीं ।
नित्य बोलतां चालतां जनीं ।
स्वप्नसुषुप्तिजागृतीमौनी ।
खंड नाहींच अखंड ध्यानीं ॥ ध्रु०

भक्तिप्रेमाचें तारु उतटलें ।
ज्ञानवैराग्यतीरीं लागलें ।
संतसज्जनीं सांठविलें ।
हीनदीनासि तेहिं उधारिलें ॥ २ ॥

ज्याच्या गुणासीं नाहीं गणना ।
ज्याच्या कीर्तीसी नाहीं तुळणा ।
जो स्वयंभ श्रीगुरुराणा ।
ब्रह्मादिकांसी बुधी कळेना ॥ ३ ॥

धर्मस्थापना स्थापियेली ।
न्यायेनीतीनें भक्ति वाढविली ।
संतमंडळी ते निवाली ।
बहु दास ते भूमंडळीं ॥ ४ ॥

जन्मजन्मांतरीं पुण्यकोटी ।
बहु संचित होतें गाठी ।
योगीरायाची जाली ज्यास भेटी ।
त्यास कल्याण होये सृष्टी ॥ ५ ॥

श्रीराम

# श्रीसमर्थांचें अभंगात्मक चरित्र.

॥ **श्रीराम** ॥ नमूं गणपति आणि सरस्वति । सद्गुरुसि चित्तीं आठउनी ॥ १ ॥ श्रीराम जानकी भरत लक्ष्मण । शत्रुघ्न हनुमान नमन त्यासी ॥ २ ॥ रामवरदायेनी ते कुळस्वामिणी । नमन तये चरणीं ग्रन्थारंभीं ॥ ३ ॥ संताचें स्तवनीं जाहाला उल्हास । करावा प्रकाश हृदयामाजी ॥ ४ ॥ मारुती अवतार कलीमाजी जाला । जगदो-द्धार केला बहुसाल ॥ ५ ॥ गंगातीरीं पुण्य क्षेत्र जांब तेथें । रामभक्त होते प्रथमची ॥ ६ ॥ सूर्याजीपंत हें नाम ज्याचें सार । तेथोंचि अवतार घेतें जाले ॥ ७ ॥ गुरुपरंपरा नव्हतीच कांहीं । राममूर्ति नाहीं पूजनांत ॥ ८ ॥ परी रामनवमी उछाह करावा । प्रपंच पाहावा जनका ऐसा ॥ ९ ॥ कीर्तनांत उभे राहावें प्रेमभावें । अपूर्व राघवें केलें तेथें ॥ १० ॥ प्रथम अभंगीं कथा हे उल्हासें । यशवंतदासें गाईयली ॥ ११ ॥ १

॥ **श्रीराम** ॥ गर्भीच डोहळे जाहाले मातेसी । जीवन्मुक्ता ऐसी स्थिती सदा ॥ १ ॥ रामनवमीमध्यें । पाहा अष्टमीस । मध्यरात्रीं त्यास दूत आले ॥ २ ॥ दूत आले पुढें घालोनी निघाले । देवालयां आले भीम जेथें ॥ ३ ॥ तेथें रामचंद्रें देवोनी दर्शन । अनुग्रह पूर्ण केला तया ॥ ४ ॥ मस्तकीं हस्तक ठेवोनिया कानीं । मंत्र हा सांगोनी तेराक्षरी ॥ ५ ॥ हेममूर्ति रम्य पट्टाभि श्रीराम । देवोनिया नेम सांगताती ॥ ६ ॥ उदईक दोन प्रहरांत पुत्र । होईल विचित्र भक्तराज ॥ ७ ॥ सांगोनि ऐसें जाहाले अदृश्य । मनांत उल्हास न समाय ॥ ८ ॥ मूर्तीची प्रतिष्ठा केली आनंदानें । गोसांवी कीर्तन करीत होते ॥ ९ ॥ रामनवमी दोन प्रहरां जन्म । जाहाला उत्तम जगदोद्धारा ॥ १० ॥ द्वितीय अभंगीं जन्म हा स्वामींचा । भीम गाय वाचा आनंदानें ॥ ११ ॥ २

॥ **श्रीराम** ॥ बारावे दिवसीं ठेविलें नामासी । प्रीतीचें उल्हासीं नारायण ॥ १ ॥ उत्पन्नचि[1] योगी बाळदशेअंत[2] । विद्याभ्यास त्याते सर्व जाला ॥ २ ॥ साता वरुषांत मुंजिबंधनासी । केले सोहळ्यासी अत्यंतची ॥ ३ ॥ तेव्हां काळ पडता संकट जाहालें । बापें विचारिलें नारोबासी ॥ ४ ॥ दोन मण गहू आहेत बळतांत । रामनवमी होत कैसी आतां ॥ ५ ॥ तेव्हां हे बोलती राम विश्वपती । रामनवमी प्रीती करील तो ॥ ६ ॥ नारोबासी म्हणती बळंतामध्यें जाई । गहू भरून देई वाळावया ॥ ७ ॥ कणगींत उतरोनि पाव्या भरून देती । माणसेंही घेती वरीच्यावरी ॥ ८ ॥ रामनवमी आणि वर्षाची बेगमी । ऐसी रासी भूमी पडली असे ॥ ९ ॥ घेतां घेतां सर्व श्रमोनि बैसले । तेव्हां हे निघाले बाहेरची ॥ १० ॥ तृतीय अभंगीं कथा जाली ऐसी । गावया भीमासी आनंद हा ॥ ११ ॥ ३

॥ **श्रीराम** ॥ मग रामनवमी आनंदानें केली । काळ गेला जाली । सुभिक्षता ॥ १ ॥ गांवीचा हिसेब हाकीमा देवोनी । पोषाक घेवोनी आले घरा ॥ २ ॥ पुढें पिता शांत होवोनियां जात । ज्येष्ठ बंधु करित प्रपंचासी ॥ ३ ॥ माडीवरी अनुग्रह देती तेथें । हेहि अवचितें गेले होते ॥ ४ ॥ ज्येष्ठ बंधु तया न देतीच येवों । म्हणती आतां जाऊं देवापासीं ॥ ५ ॥ मारुतीच्या देवाल्यांत जातां रामें । भेटोनिया प्रेमें कृपा केली ॥ ६ ॥ आज्ञा केली आतां भक्ति उभारावी । अज्ञाने तारावी भजनमार्गें ॥ ७ ॥ आले जो गृहास प्रपंचीं उदास । लग्नाचा सौरस केला तेव्हां ॥ ८ ॥ लग्नमंडपासी समारंभें नेले । विप्र येक बोले सावधान ॥ ९ ॥ ऐकतांचि शब्द जाले सावधान । केलें पलायन अकस्मात ॥ १० ॥ चतुर्थ अभंगीं कथा हे जाहाली । भीमें हे वर्णिली संकळीत ॥ ११ ॥ ४

---

१ जन्मतःच. २ बाल्यावस्थेंत.

**॥ श्रीराम ॥** जनस्थानीं पंचवटीं तपोवनीं । तप केलें वर्णी कोण ज्याचें ॥ १ ॥ बारा वर्षे होतां तेथोनि निघाले । उत्तरे चालिले तीर्थयात्रे ॥ २ ॥ सर्व तीर्थे करुनी बद्रीकाश्रमासी । दुर्घट मार्गासी पाहाते जाले ॥ ३ ॥ सीत बहुत पडे मार्ग न चालवे । चिंतितां राघवें भेटी दिल्ही ॥ ४ ॥ ह्रुमुंजी वस्त्राची मेखळा गळ्यांत । घालितांची सीत निवारलें ॥ ५ ॥ परीव्राड[1] नामें जाण हो संन्यास । नाम रामदास अजी-हूनी ॥ ६ ॥ पुढें जातां मार्गीं कांहीं वाटे भया । तेथें दत्तात्रेया भेटी जाली ॥ ७ ॥ मैणका[2] येक त्यांनीं बांधिला पायास । भयातीत असे अरण्यांत ॥ ८ ॥ मनीं आले कांहीं हत्यार असावे । गोरक्ष स्वभावें आले तेथें ॥ ९ ॥ तीरकमटा त्यांनीं दिधला हातांत । ऐसीं मार्गीआंत चिन्हें जालीं ॥ १० ॥ पांचवे अभंगीं कथा जाली ऐसी । आवडी भीमासी संतपाई ॥ ११ ॥ ५

**॥ श्रीराम ॥** बद्रिनारायण बद्रि हा केदार । करोनि सत्वर फिरती मागे ॥ १ ॥ हरिद्वार कुरुक्षेत्रही करून । गोकुळ मथुरा जाण तेही केलीं ॥ २ ॥ वृंदावनीं बारा वनें उपवनें । काशी गया जाण करोनियां ॥ ३ ॥ जगन्नाथ करुनी प्रयागीं येवोनी । अयोध्ये जाऊनी सुखी जाले ॥ ४ ॥ निमिष्यारण्यासी जावोनिया मार्गे । द्वारकेसी वेगें जाते जाले ॥ ५ ॥ तेथीलही तीर्थें सर्व करोनिया । आले फिरोनिया डाकूरासी ॥ ६ ॥ गंगातीरा आले क्षेत्र पैठणासी । करितां स्नानासी विप्र आले ॥ ७ ॥ तरुण तरुण मिळोनियां आले । उपहास्य केलें सम-र्थांचें ॥ ८ ॥ म्हणती उडत पक्षी विंधी पाहूं आतां । ऐकतां तत्वता विंधीयला ॥ ९ ॥ पडतांची पक्षी बोलती ब्राह्मण । अभिश्राप पूर्ण तुजवरी ॥ १० ॥ साहव्या अभंगीं कथा जाली ऐसी । आनंद उल्हासी भीम गाये ॥ ११ ॥ ६

---

१ संन्यासी. २ मणी.

॥ **श्रीराम** ॥ ब्राह्मणा म्हणती पावन करावें । तीर्थ देउनी भावें मुक्त केलें ॥ १ ॥ मुक्त जालों कैसा पक्षी न उठला । दोष कैसा गेला सांगा स्वामी ॥ २ ॥ कुरवाळीतां पक्षी गेला गगनासी । ब्राह्मण पायांसी लागताती ॥ ३ ॥ ऐसी कीर्ति तेथें करोनि निघाले । दक्षणे चालिले रामेश्वरा ॥ ४ ॥ दक्षणेचीं तीर्थें करोनि सर्वही । ज्योतर्लिंगें तेही बारा केलीं ॥ ५ ॥ आले कृष्णातीरा करोनिया स्नान । ब्रह्मकर्म पूर्ण सारोनीया ॥ ६ ॥ वृक्षछाया रम्य पाहोनि बैसले । कौतुक जाहले तेथें येक ॥ ७ ॥ भिलवडी गांवीं होता सेखदार । देवाज्ञा सत्वर जाली तया ॥ ८ ॥ त्याची पत्नी छायागमन[1] ध्यावया । जातां गुरुरायां पाहीयलें ॥ ९ ॥ सर्वां विचारूनी गेली नमनासी । सहज कुंकु तीसी लावीयलें ॥ १० ॥ सप्तम अभंग भीम गाय ऐसा । कथेच्या उल्हासा धरोनीयां ॥ ११ ॥ ७

॥ **श्रीराम** ॥ सती बोले स्वामी सौभाग्य दिधलें । परी आहे वेळ सेवटीली ॥ १ ॥ कृष्णातीरीं जंव पाहिलें स्वामीनीं । उठीले गडबडोनी निघावया ॥ २ ॥ दासें हा धन्यासी बोल लावियेला । बोलोनिया बोला ऐशा गेले ॥ ३ ॥ सती फिरे मागें पती आले प्राण । विचित्र विंदान[2] जालें पाहा ॥ ४ ॥ सर्वांनीं आनंदें पिटीले टाळीसी । सतीच्या नेत्रासी अश्रु आले ॥ ५ ॥ समारंभें आले गृहासी तेधवा । जालें वृत्त तेव्हां सांगितलें ॥ ६ ॥ पतिव्रता तेव्हां अन्न वर्जी पाहा । स्वामी येती तेव्हां जेऊं ह्मणे ॥ ७ ॥ ऐसे येक मास होता आले स्वामी । सती ह्मणे आह्मी धन्य अजी ॥ ८ ॥ नमन करोनी नेले गृहाआंत । पूजाविधी स्वस्थ केली त्यांनीं ॥ ९ ॥ उभयां अनुग्रह दिल्हा तये वेळीं । भोजनेंही जालीं यथासांग ॥ १० ॥ अष्टम अभंगीं बोध जाला त्यासी । पुढिल कथेसी भीम सांगे ॥ ११ ॥ ८

---

१ प्रतिकृतीबरोबर सहगमन. २ करणी, चमत्कार

॥ श्रीराम ॥ जोगाईचा अंबा तेथें स्वामी आले । तेथें जें वर्तलें तेही ऐका ॥ १ ॥ अरण्यांत देवालय तेथें आले । तों विप्र पाहिले चौघे तेथें ॥ २ ॥ तया पुसतां ह्मणती दत्तात्रेय भेटी । व्हावे ऐसा पोटीं हेत आहे ॥ ३ ॥ धीर जरी धराल तरी भेटी होईल । बोलोनी बैसले आपणही ॥ ४ ॥ तेव्हां फकीराचा धरोनीया वेष । वृद्ध स्त्री असे हेला सवें ॥ ५ ॥ शडरिपु ते मुरगे सहा समागमें । येवोनी संभ्रमें उतरले ॥ ६ ॥ चुल करोनियां हंडी चढविली । हेला कापूनि घाली तयामध्यें ॥ ७ ॥ न भरितां हंडी साही मुरगे घाली अंत । न भरतां पाहात विप्राकडे ॥ ८ ॥ भयाभीत जाले पळोनिया गेले । हे मात्र राहिले निर्भयत्वें ॥ ९ ॥ यासी मारा ह्मणतां धन्य जालो आजी । तुमचीया काजी लावा यासी ॥ १० ॥ नव्या अभंगांत दिल्ही भेटी तेव्हां । धरोनी सद्भावा भीम गाय ॥ ११ ॥ ९

॥ श्रीराम ॥ आलिंगन भेटी गोष्टी जाल्यावरी । ह्मणती द्यावी बरी भेटी विप्रां ॥ १ ॥ स्वामीच्या भिडेनें स्वप्नांत दर्शना । देवोनी कामना पूर्ण केल्या ॥ २ ॥ येक विप्र जांबेहूनि आला तेणें । सर्व वर्तमान निवेदिलें ॥ ३ ॥ रेणुका मातेस तुमच्या वियोगें । नेत्र गेले वेगें रुदतांना ॥ ४ ॥ ऐकतांचि स्वामी गेले दर्शनासी । पाई मस्तकासी ठेविले ॥ ५ ॥ ओंजळ भरोनी मोहरा देती तये । गळा मिठी माय घाली तेव्हां ॥ ६ ॥ नारोबारे तुज पाहूं कैसी आतां । हात नेत्रावरता फिरवी माझ्या ॥ ७ ॥ लावितांची हात नेत्र दिव्य आले । पूर्णबोधें केले समाधान ॥ ८ ॥ जीवन्मुक्तस्थिती देवोनी मातेसी । आले पंढरीसी आपाढीस ॥ ९ ॥ किर्तनीं अभंग रामध्यान करितां । विठल तत्वता राम जाला ॥ १० ॥ दाहावा अभंग भीम गाय भावें । चरित्रें अभिनवें पुढें ऐका ॥ ११ ॥ १०

॥ श्रीराम ॥ ब्राह्मण स्वामीसी तेव्हां बोलियेले । या स्थानीं विठल ध्यान योग्य ॥ १ ॥ पूजा करोनीयां विज्ञापना केली । पुन्हा मूर्ति

जाली होती तैसी ॥ २ ॥ तेथूनीयां पुन्हां आले जनस्थाना । टाकळीस जाणा मठ केला ॥ ३ ॥ मारुतीची मूर्ति आपुलिया हस्तें । करोनी स्थापीत तये स्थानीं ॥ ४ ॥ पूजेसी ब्राह्मण ठेवोनी निघाले । कृष्णातीरा आले प्रेमभावें ॥ ५ ॥ सहज स्वभावें शहापूर गांव । तेथें गुरुराव येते जाले ॥ ६ ॥ जमेदार विप्र त्या घरीं येवोनी । रघूवीर गर्जोनी बोलीयले ॥ ७ ॥ नमन करोनी विप्रें बैसवीले । भजन आरंभिलें दीर्घ स्वरें ॥ ८ ॥ तो ह्मणे संकटीं ह्मणावें हें नाम । तुह्मा होती श्रम उगे बैसा ॥ ९ ॥ संकटांत तरी स्मरे रामराया । आह्मी जातो कार्या ह्मणूनी गेले ॥ १० ॥ एकादश जाले अभंग समाप्त । यशवंतसुत गाय प्रेमें ॥ ११ ॥ ११

॥ **श्रीराम** ॥ कऱ्हाडांत ठाणें होतें अविंधाचें । तया या गांवाचें स्मरण जालें ॥ १ ॥ पाठवोनी स्वारी धरिले जमेदार । संकट हें थोर जालें तया ॥ २ ॥ तेव्हां तयालागीं जाहालें स्मरण । नवसची जाण केला त्यानीं ॥ ३ ॥ जरी साधु तुह्मी असाल साचार । तरी आह्मा पार करा आतां ॥ ४ ॥ धन्यापासीं नेले दिवाण त्या बोले । कासया आणीले यासी सांगा ॥ ५ ॥ सन्मान करवोन वस्त्रें देववीलीं । गांवीं आल्या केली विचारणा ॥ ६ ॥ स्वामीनीं दर्शन दिल्हें तरी अन्न । खाऊं ह्मणवून नेम केला ॥ ७ ॥ शोध केला तेव्हां वृक्षाचे छायेसी । पाहातां तयापासीं आले सर्व ॥ ८ ॥ सत्कार करोनी शिष्य जाले सर्व । मठही अपूर्व तेथें केला ॥ ९ ॥ मारुती स्थापूनी कथा कीर्तनासी । गांवची भक्तीसी लावीयले ॥ १० ॥ द्वादश अभंग जाले येथोनिया । आनंद गावया भीमालागीं ॥ ११ ॥ १२

॥ **श्रीराम** ॥ भोगुरीं कृष्णाजीपंत कुळकर्णी । भक्तराज आणि उदासीन ॥ १ ॥ पुत्र येक जाला मुंजी लग्न केलें । पुढें स्त्रीचें जालें निधनची ॥ २ ॥ उदास होवोनी गेले महायात्रे । तीर्थेंही पवित्र केलीं सर्व ॥ ३ ॥ कावड घेवोनी गेले रामेश्वरा । फिरोनी करवीरा येते

जाले ॥ ४ ॥ बरवाजीपंतासी होता सुभा तेथें । मित्रत्व अद्भूत यांचें त्यांचें ॥ ५ ॥ लक्ष्मीच्या देवालयांत कावड । ठेवोनी आवड भजनाची ॥ ६ ॥ देवदर्शनासी हेही तेथें आले । पाहातां भेटले येकमेका ॥ ७ ॥ नेवोनी गृहासी सर्व वर्तमान । ऐकतां नयनास जळ जाले ॥ ८ ॥ तयाची भगिनी आली होती लग्ना । यांसी दिल्ही जाणा आग्रहानें ॥ ९ ॥ लग्नाचा सोहळा केला वर्णवेना । मित्रत्व हें जाणा याचें नांव ॥ १० ॥ त्रयोदश जाले अभंग येथून । पुढें कथा गहन भीम सांगे ॥ ११ ॥ १३

॥ **श्रीराम** ॥ आपणासमान राखोनी ठेवीले । तेव्हां पत्नी बोले देवीलागीं ॥ १ ॥ अंबे पुत्र मज देई तुझें नांव । ठेवीन मी भावें आनंदानें ॥ २ ॥ ऐसा नवस केला तेव्हां जाला पुत्र । अंबाजी पवित्र ठेवी नांव ॥ ३ ॥ येक पुत्र काय दुजा व्हावा हेत । दत्तात्रेया करित नवस तेव्हां ॥ ४ ॥ स्वामी मज पुत्र दुजा बाल जरी । तुमचें नांव तरी ठेवीन त्या ॥ ५ ॥ पुत्र होतां नाम ठेवी दत्तात्रेय । पतिव्रता माय निष्ठावंत ॥ ६ ॥ उभयांची मुंजीबंधनेंही जालीं । गांवीं जाया केली विचारणा ॥ ७ ॥ बरवाजीपंतानीं जाऊं दिल्हें नाहीं । मग केलें यांहीं गंतव्यासी ॥ ८ ॥ तेथोनी निघोनी पुन्हां गेले काशी । चतुर्थाश्रमासी संपादिले ॥ ९ ॥ बरवाजीपंतासी होता अनुग्रह । ह्मणे गुरुराय कधीं येती ॥ १० ॥ चतुर्दश जाले अभंग येथून । अल्पमती पूर्ण भीम गाय ॥ ११ ॥ १४

**श्रीराम** ॥ शाहापुरीं मठ करूनी निघाले । करवीरासी आले सहज लीले ॥ १ ॥ बरवाजीपंतानीं स्वामीसी पाहोनी । नमन चरणीं दंडप्राय ॥ २ ॥ समर्थासी नेले आवडी गृहासी । सांगती मुलांसी सेवा करा ॥ ३ ॥ सेवेमाजी मुलें तत्पर पाहोनी । अक्षर हें मनीं पाहों ह्मणती ॥ ४ ॥ सांगतां कठीण अक्षरें त्वरित । अंबाजी लिहित तितुकींही ॥ ५ ॥ तेव्हां अनुग्रह देवोनी उभयांसी । बरवाजीपंतासी

बोलीयले ॥ ६ ॥ गुरु दक्षणेसी द्यावें या बाळासी । ऐकतां वृत्तासी निवेदीले ॥ ७ ॥ मातेनें येवोनी केला नमस्कार । बंधुसी उत्तर बोलीयली ॥ ८ ॥ धन्य भाग्य अमुचें सार्थक जाहालें । द्यावें आम्हा वेहीले स्वामीसवें ॥ ९ ॥ त्रिवर्गासी तेव्हां करुनी अनुग्रह । आनंद न माय ह्रदयामाजी ॥ १० ॥ पंचदश जाले अभंग हे ऐसे । भीमास उल्हास गावयाचा ॥ ११ ॥ १५

॥ **श्रीराम** ॥ त्रिवर्गा घेवोनी आले शाहापुरा । गांवही सामोरा आला तेव्हां ॥ १ ॥ मठीं येवोनीया कीर्तन भजन । होत आनंदानें न वर्णवे ॥ २ ॥ रखमाबाईहातें जेवावे स्वामीनीं । सेवेमाजी दोनी मुलें सदा ॥ ३ ॥ तेथोनी मसुर आहे कोशावरी । ब्रह्मपुरी बरी होती तेथें ॥ ४ ॥ सर्वही ब्राह्मण आणि सर्व जन । येकत्र मिळोन आले तेथें ॥ ५ ॥ स्वामीस घेवोन आले मसुरास । तेथेंही मठास केले पाहा ॥ ६ ॥ आपुलीया हातें मारुती करोनी । सर्व गांव भजनीं लावियला ॥ ७ ॥ इतुक्यांत उछाह आली रामनवमी । रथोछाह स्वामी करिती तेथें ॥ ८ ॥ अंबीयाची ढाळी रथासी आडवी । ह्मणती हे तोडावी ग्रामस्तांसी ॥ ९ ॥ पाछाहाचा बाग आज्ञेवांचोनीया । कैसे तोडावे या ह्मणती स्वामी ॥ १० ॥ षोडश अभंगीं कथा जाली ऐसी । गावया भीमासी आनंद हा ॥ ११ ॥ १६

॥ **श्रीराम** ॥ विजापुरीं सभा भरली घनदाट । तेथेंची प्रगट जाले स्वामी ॥ १ ॥ पाहातांची नमन केलें अविधानें । आज्ञा काय ह्मणे सांगा स्वामी ॥ २ ॥ अंबीयाची ढाळी रथा अडविती । तोडाया निगुती पत्र देई ॥ ३ ॥ लेहोनीया पत्र शाहा तीरा ह्मणे । मसुरासी जाणें त्वरा करा ॥ ४ ॥ स्वामी ह्मणती तया त्वरें जावें तुम्ही । तीर्थें फिरत आह्मी येऊं स्वस्थ ॥ ५ ॥ चाळीसा कोसाची मजल करीत

---

१ त्वरित.

आले । तों स्वामी देखीले अकस्मात ॥ ६ ॥ बोलती स्वामीसी केव्हां आला तुह्मी । ह्मणती आलो आह्मी तेधवाची ॥ ७ ॥ सर्वांसी आश्चर्य जालें तेव्हां मोठें । ह्मणती स्वामी कोठें गेले केव्हां ॥ ८ ॥ ग्रामस्ता आणोनी दिघलें पत्रासी । ह्मणती या ढाळींसी तोडा आतां ॥ ९ ॥ मनुष्याचा कांहीं तोडाया उपाय । नाहीं ह्मणती काय करावें हो ॥१०॥ सप्तदश जाले अभंग हे ऐसे । भीमाचें मानस स्वामीपाई ॥११॥ १७

**॥ श्रीराम ॥** सर्वांचा उपाय राहिला जेधवां । अंबाजीसी तेव्हां आज्ञा केली ॥ १ ॥ चरणावरी तेव्हां मस्तक ठेविलें । शस्त्र तें घेतलें हस्तांमाजी ॥ २ ॥ वळवले वृक्षीं लागले तोडाया । भय नाहीं जया तीळप्राये ॥ ३ ॥ अद्भुतचीं वारा आला तये वेळीं । मोडोनीया ढाळी पडली पाहा ॥ ४ ॥ उसळोनी पाल्यांत पडले अकस्मात । गडबड अद्भुत जाली तेव्हां ॥ ५ ॥ स्वामी तये वेळीं मारिती हाकेस । कल्याण आहेस काय सांग ॥ ६ ॥ कल्याण ह्मणोनी उठिले सत्वर । आनंद हा थोर जाला तेव्हां ॥ ७ ॥ आम्रा मण गुळ आणोनी वाटीत । नाम हें ठेवित कल्याणची ॥ ८ ॥ रामनवमी जाला उछाह ते वेळीं । भक्तीची दिवाळी जाली मोठी ॥ ९ ॥ रखुमाबाई ह्मणे वंशवृद्धी कैसी । होईल मानसीं विचारीत ॥ १० ॥ अष्टादश जाले अभंग हे ऐसे । भीम गात असे मनोल्हासें ॥ ११ ॥ १८

**॥ श्रीराम ॥** स्वामींनीं अंतर जाणोनी सत्वर । लग्नाचा विचार करिते जाले ॥ १ ॥ कल्याण हा ज्येष्ठ वैराग्यें वरिष्ठ । निस्पृहांत श्रेष्ठ प्रतिमा माझी ॥ २ ॥ कनिष्ठासी ह्मणती आमुचें वचन । करी तूं पाळण लग्न करीं ॥ ३ ॥ प्रपंच परमार्थ दोनीही साधीसी । ऐकोनी स्वामीसी विनवीलें ॥ ४ ॥ पुढें वंशीं कोणी होतील विषई । तेव्हां आज्ञा काइ गती सांगा ॥ ५ ॥ स्वामी ह्मणती तुझ्या वंशीं होतील जे । सर्व भक्तराज ऐसें जाण ॥ ६ ॥ ऐसें बोलोनीया केलें लग्न त्यांचें । ह्मणती कुटुंबाचें रामा वोझें ॥ ७ ॥ कुटुंब निर्वाह करील रामराव । वंशीं भक्तराव

बहु होती ॥ ८ ॥ ऐसें करोनीया निघाले तेथोनी । दोघांसी घेवोनी समागमें ॥ ९ ॥ दोघा बंधुवरी अत्यंतची प्रीति । तेथोनीया येती शिरगांवासी ॥ १० ॥ येकोणविंशती अभंगांत ऐसी । कथा हे उल्हासीं भीम गाय ॥ ११ ॥ १९

॥ **श्रीराम** ॥ गांव सर्व आला चरणासी लागला । भावें स्थिरावला गुरुराव ॥ १ ॥ करोनिया मठ तेथेंही राहीले । रामें स्वप्न दिल्हें तये स्थानीं ॥ २ ॥ कवित्वाची आज्ञा केली तये स्थानीं । आरंभ तेथोनी कवनासी ॥ ३ ॥ दासबोध ग्रन्थ वोव्या मुखांतूनी । निघतां लिहिल्या यांनीं वरिच्यावरी ॥ ४ ॥ कल्याण स्वामीनीं लिहिला दासबोध । संख्या हे प्रसिद्ध ऐका किती ॥ ५ ॥ दिवसामाजी सात शत वोव्या ल्याहाव्या । स्वामीनीं पाहाव्या आनंदानें ॥ ६ ॥ रखमाबाईसही आणियले तेथें । ठेविलें उल्हासें समाधानें ॥ ७ ॥ सर्व कवन तेथें लिहिलें उभयांनीं । पुढें कैसी करणी जाली ऐका ॥ ८ ॥ मसुरांत मागे मुसळगोसांवी । भिक्षेलागीं गांवीं गेले होते ॥ ९ ॥ पठाण देखोनी बोलाविला भक्त । ह्मणे करामत दावी मज ॥ १० ॥ विसावे अभंगीं कथा जाली ऐसी । भिमाचे मानसीं संतपाय ॥ ११ ॥ २०

॥ **श्रीराम** ॥ मुसळावरी मूर्ति मारुतीची रम्य । स्कंदीं वाहे प्रेमें सर्वकाळ ॥ १ ॥ तया पुढें तेंचि टाकीयलें क्षीतीं । उचलोनी ह्मणती देई हातीं ॥ २ ॥ तेव्हां तें नुचले दाहापांचालागी । करामत वेगीं थोर देखे ॥ ३ ॥ कांपत थरथरा घाली लोटांगण । पूजन अर्चन केलें तेव्हां ॥ ४ ॥ शिरगांवाहूनी निघाले सद्गुरु । महिमा अपारु न वर्णवे ॥ ५ ॥ उंबरजेअंत स्थापिला मारुती । तेथोनीया जाती शिराळ्यासी ॥ ६ ॥ तेथेंही हनुमंत स्थापोनी निघाले । पारगांवां गेले अकस्मात ॥ ७ ॥ तेथेंही मारुती करोनी निघाले । कोण्या गांवा गेले तेही ऐका ॥ ८ ॥ मनपाडळ्यांत करोनी मारुती । मिरजेलागी जाती सहजात ॥ ९ ॥ भिक्षा मागावया गेले येक्या घरीं । वेणाबाई पुरी

भक्त होती ॥ १० ॥ येकवीस जाले अभंग येथून । पुढील कथन भीम गाय ॥ ११ ॥ २१

॥ **श्रीराम** ॥ वेणाबाई तेव्हां पाहोनी स्वामीसी । लागे चरणासी प्रेमभावें ॥ १ ॥ सत्कार करोनी बैसावे ह्मणती । बैसले हे प्रीति पाहोनीयां ॥ २ ॥ येकनाथी भागवत होती पाहात । स्वामी विचारीत जीवशिव ॥ ३ ॥ याचें कैसें रूप केलें आहे यांत । ह्मणतांची चित्त निर्बुजलें ॥ ४ ॥ वारंवार चरणीं ठेविताहे शीर । दीन मी पामर आहे तारा ॥ ५ ॥ तेव्हां अनुग्रह देवोनी तयेला । बोध पूर्ण केला चळेनासा ॥ ६ ॥ तेथोनिया आले उरुणबाह्यासी । तेथें मारुतीसी केले पाहा ॥ ७ ॥ पुढें माजगांवीं स्थापोनीयां रुद्र । हेत रामचंद्र स्थापनेचा ॥ ८ ॥ पुढें चाफळासी येऊनी पाहिले । अपूर्व देखीलें स्थळ दृष्टीं ॥ ९ ॥ मांडव्य ऋषीनें केला होता यज्ञ । टेकाड गहन होते तेथें ॥ १० ॥ बावीस अभंग जाहाले संपूर्ण । भीम गाय मनें उल्हासानें ॥ ११ ॥ २२

॥ **श्रीराम** ॥ मांडव्या हे गंगा वाहाताहे खालीं । झाडीही पाहिली नीबीडची ॥ १ ॥ कळकीचें बेट अद्भुत पाहोनी । ग्रामस्तां लागोनी बोलीयले ॥ २ ॥ येवढें तुह्मी आह्मा द्यावें तोडोनीया । येथें रामराया स्थापूं मग ॥ ३ ॥ ह्मणती दोन प्रहरां येथें आले कोणी । तात्काळ संळोनी[1] पडताहे ॥ ४ ॥ अंत पाहाती तों पांच शत गुंडे । शेंदुर प्रचेंड चर्चियले ॥ ५ ॥ ऐसें ऐकतांची स्वामी निटोवती[2] । उचलोनी टाकीती गंगेअंत ॥ ६ ॥ सर्वही उचलोनी गंगेंत टाकीले । येक न उचले मुख्य जो तो ॥ ७ ॥ नुचलेसी जरी फोडोन काढीन । श्रीराम स्थापीन याच स्थानीं ॥ ८ ॥ शूद्र येक त्याचे आंगीं आला बोले ।

---

१ छळ होऊन, संबंधाची बाधा होऊन. २ निटावणें=तडक उठून कामास लागणें.

स्वामीपुढें न चले कांहीं माझें ॥ ९ ॥ मज कांहीं मान द्यावा या स्थानीं-चा । तेव्हां स्वामी वाचा बोलीयले ॥ १० ॥ तेवीस अभंग जाले पुढें ऐका । भीम ह्मणे नीका प्रसंग हा ॥ ११ ॥

२३

॥ **श्रीराम** ॥ रथ श्रीरामाचा येईल तुजपासीं । भात नारळासी देऊं तेव्हां ॥ १ ॥ रथ हा रामाचा येईल तेव्हां मागें । हालु जाला वेगें उचलीला ॥ २ ॥ अद्यापी हे साक्ष आहे तये स्थानीं । जाती ते नयनीं पाहातात ॥ ३ ॥ हातीं शस्त्र स्वामी घेवोनी तोडीतां । सर्वही तत्त्वता धाविन्नले ॥ ४ ॥ तोडोनियां बेट साफ केलें सारें । देवाल्यही त्वरें केलें तेथें ॥ ५ ॥ मनांत जें आलें मूर्ती श्रीरामाची । गंडीके सीळेची असावी हे ॥ ६ ॥ तेथोनी निघोनी आले कृष्णातीरा । तेथें डोह पुरा अक्षोभची ॥ ७ ॥ विष्णुपद तेथें शिवालय असे । शिवनाभ ऐसें नाम ज्याचें ॥ ८ ॥ तये स्थानीं स्वामी करितांची निद्रे । तेथें रामचंद्रें स्वप्न दिल्हें ॥ ९ ॥ याचि डोहीं माजी मूर्ति पुरातन । आहे तिची खूण तेही ऐका ॥ १० ॥ चोविसावा जाला अभंग येथून । पुढील कथन भीम गाय ॥ ११ ॥

२४

॥ **श्रीराम** ॥ वारेवरी पेंडी कडव्याची सोडावी । ज्वाळा होतां पाहावी मूर्ती तेथें ॥ १ ॥ पेवोनीयां[1] पेंडी सोडितांचि जळीं । ज्वाळा होतां दिली उडी तेथें ॥ २ ॥ तीन दिवस होते तया जळाअंत । मध्य-रात्रीं मूर्त घेउनी आले ॥ ३ ॥ अकस्मात सुखासन आणि भोई । घालूनि मूर्त पाहीं चालीयले ॥ ४ ॥ आले चांफळासी करोनी स्थापना । आनंद तो जाणा जाला मोठा ॥ ५ ॥ आंगापुर गांवीं कळलें वर्तमान । आमु-च्या डोहांतून मूर्ती नेली ॥ ६ ॥ यश गेलें मूर्ती आणूं चला त्वरें । म्हणोनी तयार जाले सर्व ॥ ७ ॥ आले चाफळासी बोलती स्वामीसी । मूर्ती आमूची कैसी आणिली नेऊं ॥ ८ ॥ सुखें न्या म्हणतां उचला-

1 पोहून, पोहत जाऊन.

वया जाती । उपाय राहाती नुचलतां ॥ ९ ॥ शरण आले म्हणती काहीं द्यावा मान । काठीचें निशाण तुमचें पुढें ॥ १० ॥ संतोष पावोनी गेले ते माघारे । भीमें अल्पमात्र वर्णीयलें ॥ ११ ॥ २५

॥ श्रीराम ॥ पुढें ध्यानमूर्ती केली मारुतीची । प्रतापरुद्राची पृष्ठीभागीं ॥ १ ॥ सिंगणवाडीच्या रानीं टेंकावरी । मूर्ति केली बरी मारुतीची ॥ २ ॥ प्रतापगडासी होता राजा शिव । पुराणीं सद्भाव श्रवणाचा ॥ ३ ॥ तेथें निवे चर्चा सद्गुरुवांचून । व्यर्थ देह जाण शववत ॥ ४ ॥ श्रीराम कृष्णादि पूर्णब्रह्म परी । सद्गुरु निर्धारीं केले तेहीं ॥ ५ ॥ ऐकतांची राया अश्रु नेत्रीं येती । सद्गुरु भेटती कोण केव्हां ॥ ६ ॥ किल्यावरी निद्रा केली खोलीअंत ॥ तेथें गुरुनाथ प्रगटले ॥ ७ ॥ राया उठवीलें दर्शन दिधलें । पाहातांची जालें समाधान ॥ ८ ॥ बोलती रायासी तुझिया राज्यांत । कोण साधुसंत न जाणसी ॥ ९ ॥ आसेल आवड तरी ये मसुरा । प्रसाद हा बरा घेई आतां ॥ १० ॥ बुका लावोनीया नारळ दिधला । भीमें हा वर्णिला कथाभाग ॥ ११ ॥ २६

श्रीराम ॥ नमन करोनी पाहे जों उठोनी । तंव स्वामी नयनीं न दिसती ॥ १ ॥ कवाडें पाहात तंव जैसी तैसी । आश्चर्य मानसीं जालें फार ॥ २ ॥ वर्तमान सर्वां रायें निवेदीलें । मसुरा वहीले जावे ह्मणे ॥ ३ ॥ सद्गुरुदर्शन होईल जेधवां । अन्न आह्मी तेव्हां भक्षूं ह्मणे ॥ ४ ॥ ऐसा करोनी नेम निघोन मसुरा । मुकामची बरा केला तेथें ॥ ५ ॥ शोध करितां मठीं स्वामी नाहीं ह्मणती । तेव्हां आली चित्तीं उद्विग्नता ॥ ६ ॥ स्वप्नामाजी स्वामी सांगती रायासी । षष्ठीमाजी कैसी भेटी घेसी ॥ ७ ॥ उदईक सप्तमी शिंगणवाडींत । भेट होय तेथ येई जाण ॥ ८ ॥ प्रातःकाळीं स्वारी चालिली त्वरेनें । चरेगांवा जाण जवळी आले ॥ ९ ॥ कल्याण गोसांवी होते शिरगांवीं । सद्गुरुचा जीवीं निजध्यास ॥ १० ॥ तेही त्याच दिसीं निघाले दर्शना । अकस्मात

जाणा आले तेथें ॥ ११ ॥ रायानें पाहोनी खालीं उतरोनी । दंडप्राय चरणीं नमन केलें ॥ १२ ॥ परस्परे भेटी गोष्टींत आनंद । भीमासी स्वानंद गावयाचा ॥ १३ ॥ २७

॥ **श्रीराम** ॥ सुखासनीं यांसी बैसवोनी रायें । ह्मणे गुरुमाय केव्हां पाहूं ॥ १ ॥ अर्ध कोशावरून कल्याण गोसांवी । गेली दृष्टी बरवी स्वामीवरी ॥ २ ॥ सुखासनांतुनी टाकीयली उडी । नमन आवडीं केलें तेथें ॥ ३ ॥ रायें विचारीलें तया दाखवीलें । तेव्हां तेणें केलें दंडवत ॥ ४ ॥ रायासी टाकोनी गेले स्वामीपासीं । ह्मणती दर्शनासी राव आला ॥ ५ ॥ अनवाणी पाईं राव हळुहळु । चाले सर्व मेळु समागमें ॥ ६ ॥ आला स्वामीपासीं केले दंडवत । पूजेचें साहित्य सर्व केलें ॥ ७ ॥ राया अनुग्रह जालीया नंतरे । मोहरा होन बरे पाईं वोती ॥ ८ ॥ मुठी भरभरों दिघले टाकोनी । पोरें होती त्यांनीं वेचीयलें ॥ ९ ॥ स्वामीपासीं कपी होता त्यासी ह्मणती । प्रसाद रायासी देईं वेगीं ॥ १० ॥ आठावीस जाले अभंग हे ऐसे । यशवंतदास गाय प्रेमें ॥ ११ ॥ २८

॥ **श्रीराम** ॥ कपी गेला वृक्षीं अंबे तीन आगून । स्वामीपुढें जाण ठेवीयले ॥ १ ॥ स्वामी ह्मणती आह्मापुढें कां ठेविसी । देईं प्रसादासी राजयाला ॥ २ ॥ ठेऊनीया अंबा स्वामीपुढें येक । दोन दिले देख रायालागीं ॥ ३ ॥ राव बोले पुत्र अजी दिले दोन । नौबती ठोकणें आनंदानें ॥ ४ ॥ शुभ्र ढाला आजीपासूनी नसाव्या । भगव्याच कराव्या ह्मणतां केल्या ॥ ५ ॥ राया स्वामी ह्मणती चांफळा जावोन । रामाचें दर्शन घेऊनी जावें ॥ ६ ॥ कल्याण गोसांवी जवळी बोलाऊनी । ह्मणती रामकानीं ऐसें सांगा ॥ ७ ॥ राजयासी तुरा मस्तकींचा देणें । करोनी नमन निघते जाले ॥ ८ ॥ पुढें येवोनीया रामरायाकानीं । निरोप सांगोनी उभे होते ॥ ९ ॥ आला राव रामा केला

नमस्कार । तुरा हा झरार आला पुढें ॥ १० ॥ घेवोनीया तुरा रायासी लावीला । आनंद जाहाला भीमा गाया ॥ ११ ॥ २९

॥ **श्रीराम** ॥ राजा सातान्यासी गेलीया उपरी । कथा जे वर्तली तेही ऐका ॥ १ ॥ काशीहूनी येक पंडित निघाला । जिंकीत चालीला क्षेत्रोक्षेत्रीं ॥ २ ॥ आला सातान्यासी भेटे राजयासी । वाद पंडितासी घालूं आह्मीं ॥ ३ ॥ जानव्यासी सुरी बांधोनीयां ह्मणे । जिव्हा हे छेदणें अव्याक्षरीं ॥ ४ ॥ न घालांची वाद तरी द्या पत्रासी । ह्मणूनी आग्रहासी आला भारी ॥ ५ ॥ पंडित सर्वही भयाभीत जाले । तेव्हां राजा बोले ध्यावें पत्र ॥ ६ ॥ नित्य दासबोध समास वाचावा । हाही पाहावया आला तेथें ॥ ७ ॥ येवोनी पंडित पुसत हें काय । सांगती हा आहे दासबोध ॥ ८ ॥ रामदास स्वामी समर्थ सद्गुरु । महिमा अपारु न वर्णवे ॥ ९ ॥ ऐकतां आवेश पंडिता वाढला । ह्मणे जिंकूं त्यांना आधीं आह्मी ॥ १० ॥ तिसावे अभंगी कथा जाली ऐसी । पुढील प्रमेयासी भीम गाये ॥ ११ ॥ ३०

॥ **श्रीराम** ॥ निघोनी चालिला संतछळणासी । मार्गीं जातां त्यासी काय जाले ॥ १ ॥ कल्याण गोसांवी पाहातांची खुणे । रामदास ह्मणे तुह्मी काय ॥ २ ॥ ऐकतांची नेत्रा अश्रु आले पूर्ण । स्वामीचे मी दीन दास आहे ॥ ३ ॥ पंडितही ह्मणे दर्शनाचा हेत । धरोनी त्वरित आलो येथें ॥ ४ ॥ चलावें दर्शना तुह्माही होईल । बोलोनी हे त्वरें आले पुढें ॥ ५ ॥ दंडप्राय तेव्हां करोनी नमन । सर्व वर्तमान निवेदीलें ॥ ६ ॥ दिवसांची मशाल लावोनीयां आले । स्वामीनीं त्या केलें नमनासी ॥ ७ ॥ आशिर्वाद अथवा नमनाचा प्रकार । प्रश्नाचें उत्तर होय तेव्हां ॥ ८ ॥ राजा शिष्य केला घाला वाद आतां । पाहों वित्पन्नता कैसी आहे ॥ ९ ॥ ह्मणती पंडितासी धन्य तुह्मी थोर । मीपणाचा मात्र डाग आहे ॥ १० ॥ येकतीस अभंग पुढें कथा गोड । भिमासी आवड वर्णायाची ॥ ११ ॥ ३१

॥ **श्रीराम** ॥ सर्वांच्या दृष्टीसी प्रकाश दिवसा । तुह्मासीच कैसा अंधकार ॥ १ ॥ पंडित ह्मणत बडबड हे टाका । प्रश्न करा निका पाहूं कैसा ॥ २ ॥ स्वामी म्हणती कांहीं नव्हे मी पंडित । रामासी चिंतीत आहे सदा ॥ ३ ॥ ह्मणत पंडित तरी ऐका मंत्र । द्यावें त्वरें पत्र जिंकीलोसे ॥ ४ ॥ इतुक्यांत अंत्यज मोळी वेवोनीया । जात होता तया पाचारीला ॥ ५ ॥ ठेवोनीया मोळी आला स्वामीपुढें । दंडवत पडे पृथ्वीवरी ॥ ६ ॥ उभा राहोनीया आज्ञा काय पुसे । स्वामी कल्याणास बोलीयले ॥ ७ ॥ हातांतील छडी देवोनी ह्मणती । मंडळें निगुती काढी चार ॥ ८ ॥ प्रथम मंडळ स्थूळ देह तेथें । आणोनी पुसत स्वामी त्यासी ॥ ९ ॥ तो ह्मणे मी शूद्र दुज्या मंडळांत । सूक्ष्मांत वैश्य ह्मणे आहे ॥ १० ॥ तिजे ते कारण येतां क्षत्रिय ह्मणे । कथा हे गहन भीम गाय ॥ ११ ॥ ३२

॥ **श्रीराम** ॥ चतुर्थ कारण ज्ञान देह जाण । ह्मणे मी ब्राह्मण आहे आतां ॥ १ ॥ वाद यासी कांहीं वालींसील काय । आज्ञा जरी होय तरी सिद्ध ॥ २ ॥ पंडितासी वाद अद्भुतचि केला । क्षणांत जिंकीला स्वामीसत्तें ॥ ३ ॥ इतुक्यांत विमान आलें अकस्मात । दिव्य देही होत क्षणामाजी ॥ ४ ॥ स्वामीपाईं केलें नमन येऊन । स्वामी ह्मणती कोण होतासी तूं ॥ ५ ॥ ह्मणे माल्यवंत गंधर्व मी सत्य । होतो क्रीडा करीत सरोवरीं ॥ ६ ॥ सुर्योदय जाला तरी नाहीं भान । तेथें आले स्नाना देवऋषी ॥ ७ ॥ पाहोनी उन्मत्त शाप दिला त्यांनीं । ह्मणती दुष्ट योनी जन्म घेई ॥ ८ ॥ तेव्हां जालो दीन उशाप मागता । ह्मणती तीं जन्मांत मुक्त होसी ॥ ९ ॥ पशु जन्म दोन अंत्यजाचा येक । तेथें मुक्त देख होसील तूं ॥ १० ॥ मारुती अवतार नाम रामदास । ताराया जनास भीम ह्मणे ॥ ११ ॥ ३३

॥ **श्रीराम** ॥ तेचि तुज मुक्त करिती हा वर । देवोनी सत्वर जाते जाले ॥ १ ॥ प्रथमचि घोडा जयत्पाळ जेथें । मुकुंदरायें तेथें

मुक्त केलें ॥ २ ॥ पैठणांत हेला तेथें ज्ञानराजा । दुजा जन्म माजा मुक्त केला ॥ ३ ॥ मारुती साक्षात मुक्त केलें दीना । धावी आतां आज्ञा येतो स्वामी ॥ ४ ॥ नमन करोनी सव्य घालोनीया । गेला जया ठायां होतां तेथें ॥ ५ ॥ पंडितासी तेव्हां अश्रुपात आले । पायांवरी लोळे शुद्धि नाहीं ॥ ६ ॥ उठवोनी अनुग्रह केला त्यासी । हुर्मुजी वस्त्रासीं घेतां जाला ॥ ७ ॥ दासबोध ग्रन्थ लेहोनी घेतला । संत जाणा केला संतरायें ॥ ८ ॥ आज्ञा घेवोनीयां काशीसी चालीले । सेउरास आले गावांमध्यें ॥ ९ ॥ ब्राह्मणाचें घरीं राहिले वस्तीसी । दासबोध ग्रन्थासी वाचीतांना ॥ १० ॥ बहिणाबाई येक श्रवणासीं बैसत । ह्मणे कोण ग्रन्थ कोणें केला ॥ ११ ॥ ३४

॥ **श्रीराम** ॥ सर्व वर्तमान जालें तें तयेसी । सांगतांची तीसी अश्रु आले ॥ १ ॥ प्रातःकाळीं गेले पंडित निघोन । मागें वर्तमान कैसें ऐका ॥ २ ॥ बहिणाबाई ह्मणे स्वामीचें चरण । पाहूं तेव्हां अन्न भक्षूं ह्मणे ॥ ३ ॥ घोडे मनुष्यासी घेवोनी निघाली । स्वामीपासीं आली भावबळें ॥ ४ ॥ तयेसी स्वामीनीं दिला अनुग्रह । भक्तराज पाहे तेही जाली ॥ ५ ॥ आज्ञा घेऊनीया गेली पूर्व ग्रामा । अभिनव प्रेमा निष्ठेचा हा ॥ ६ ॥ शिवाजी राजाचा जीव स्वामीपासीं । प्रतापगडासी जाते जाले ॥ ७ ॥ तेथें निळोपंत अमात्य रायाला । आले भेटायाला आनंदानें ॥ ८ ॥ भेटी होतां रायें सर्व वर्तमान । केलें निवेदन सद्गुरूचें ॥ ९ ॥ ऐकतांची प्रेमा तयांसी होवोनी । रायासी पुसोनी निघते जाले ॥ १० ॥ आले चाफळासी जाहालें दर्शन । प्रेम आलें पूर्ण भीम ह्मणे ॥ ११ ॥ ३५

॥ **श्रीराम** ॥ भावार्थ पाहोनी दिला अनुग्रह । आज्ञा घेवोनी ये रायापासीं ॥ १ ॥ राव ह्मणे गुरुभाऊ जालों आतां । ह्मणोनीया माथा ठेवी पाईं ॥ २ ॥ ह्मणे अन्नदाता धनी माने श्रेष्ठ । ज्येष्ठ बंधु श्रेष्ठ माझा तूंचि ॥ ३ ॥ निरुबाई पतिव्रता पुसे स्पष्ट । ह्मणे तुह्मी

कोठें गेला होता ॥ ४ ॥ राया पासोनीया वृतांत जो जाला । तये निवेदिला महिमा सारा ॥ ५ ॥ ऐकतांची तये नेत्रीं आले अश्रु । ह्मणे ते सद्गुरु भेटतीं कैं ॥ ६ ॥ दर्शन होईल तरी अन्न खाणें । अपवित्र जीणें गुरूवीण ॥ ७ ॥ तीन दिवस जाले बहुती वर्जीले । परी नाहीं घेतलें अन्नपाणी ॥ ८ ॥ प्रहर रात्रींत आले स्वामी तेथें । ह्मणती क्षुधीस्त तीं दिसाचा ॥ ९ ॥ ऐकोनीया सती घाबरीच जाली । चुलीपासीं गेली पहावया ॥ १० ॥ किंचितसा अग्नी आंत पाहोनीयां । भीम ह्मणे तया काय केलें ॥ ११ ॥

३६

॥ **श्रीराम** ॥ साडी नेसली ते फाडोन पेटवी । वरी अधण ठेवी क्षीरीलागी ॥ १ ॥ सर्व घरांतीला[1] शाला सोवळ्यास । जाळीतांच त्यास स्वामी पाहाती ॥ २ ॥ सेवायाची क्षीर करोनी वाढीली । स्वामीनीं सेवीली यथासांग ॥ ३ ॥ उरल्या प्रसादासी ग्रहण करून । अनुग्रह पूर्ण दिल्हा तये ॥ ४ ॥ भ्रताराची उंच होती शालजोडी । मनांत आवडी जाली द्याया ॥ ५ ॥ पाहों गेली तंव जाळोनी टाकिली । बहु खिन्न जाली मनामाजी ॥ ६ ॥ जाणोनी अंतर स्वामी म्हणती तये । गवाळ्यांत पाहे स्वस्थ चित्तें ॥ ७ ॥ पाहे गवाळ्यांत सर्वही आहेत । स्वामी जों देत न घेती हे ॥ ८ ॥ म्हणती उतार[2] कैसा देसी आम्हा । अद्भुतचि प्रेमा वर्णवेना ॥ ९ ॥ गल्बला काशाचा म्हणूनी निळोपंत । गृहांत जों येत तंव स्वामी ॥ १० ॥ नमन करोनी आनंद जाहाला । भीमें हा वर्णिला प्रेमभाव ॥ ११ ॥

३७

॥ **श्रीराम** ॥ प्रसन्न होवोनी ह्मणती मागे वरा । ते ह्मणे दातारा पुत्र देई ॥ १ ॥ नारळ वोट्यांत घालीतां स्वामींनीं । नमन उभयांनीं केलें तेव्हां ॥ २ ॥ उठोनी पाहातां स्वामी न दिसती । ऐसी केली ख्याती तये स्थानीं ॥ ३ ॥ वर्षा पुत्र होतां घेवोनी तयासी । आली

---

१ घरांतल्या. २ एकाद्यास सन्मानार्थ दिलेलें आपल्या अंगावरील मौल्यवान वस्त्र किंवा आभरण.

स्वामीपासीं दर्शनासी ॥ ४ ॥ रामचंद्र नाम ठेविलें स्वामींनीं । पूर्ण कृपा करूनी पाठवीली ॥ ५ ॥ मुंजही तयाची केली स्वामीपासीं । अनुग्रह त्यासी केला तेव्हां ॥ ६ ॥ रासीवड्यामध्यें होती बाई येक । अनुग्रह देख केला तीसी ॥ ७ ॥ नाम तीचें आका भाव जीचा नीका । प्रीतिपात्र देखा स्वामींचें तें ॥ ८ ॥ चांफळीच्या मठीं स्वामीत्व तयेचें । जीव प्राण जीचे स्वामीपासीं ॥ ९ ॥ दिवाळीचा सण आला तें कौतुक । पुढिलीया देख अभंगांत ॥ १० ॥ आडतीस अभंग जाले हे संपूर्ण । भाव धरूनी मनें भीम गाय ॥ ११ ॥ ३८

॥ **श्रीराम** ॥ मिरजेमध्यें होती वेणूबाई भक्त । अखंड आसक्त गुरुध्यानीं ॥ १ ॥ दिवाळीच्या सणीं हेत हा जाहाला । न्हाऊं घालायाला स्वामीलागीं ॥ २ ॥ समर्थ प्रगटले न्हाऊंही घालीत । फराळा वाढीत वेणुबाई ॥ ३ ॥ सेउर ग्रामांत बहिणाबाई राहे । दिवाळीस बाहे श्रीगुरुसी ॥ ४ ॥ मिरजेहूनी स्वामी तत्काळ पातले । भोजना वाढिलें यथासांग ॥ ५ ॥ कडु दोडक्याची पात्रीं भाजी होती । श्रीगुरु भक्षिती राम ह्मणुनी ॥ ६ ॥ वारंवार वाढी नेणोनिया भाजी। स्वामी ह्मणती आजी पोट भरे ॥ ७ ॥ भोजन जाहाले तांबुल घेतला । प्रसाद सेवीला बहीणाईनें ॥ ८ ॥ कडु भाजी खातां अश्रुपात आले । बहुत विनवीले श्रीगुरुसी ॥ ९ ॥ चाफळांत आका वाट पाहे फार । समर्थ सत्वर तेथें आले ॥ १० ॥ पुजूनी स्वामीसी । आका वोवाळीत । यशवंतसुत गाय ऐसें ॥ ११ ॥ ३९

॥ **श्रीराम** ॥ चाफळां दर्शना वेणुबाई आली । समर्था भेटली प्रेमभावें ॥ १ ॥ ह्मणती रामनवमी करोनीयां जाई । आज्ञा ह्मणूनी पाईं नमन केलें ॥ २ ॥ आकाबाई आणि उभयतां तुह्मी । असा येथें रामीं हेत ठेवा ॥ ३ ॥ सांगोनीया स्वामी निघोनीया गेले । मागें कैसें जाले तेंही ऐका ॥ ४ ॥ वर्षासनें आणावया आका गेली । साहित्या राहीली

---

१ बोलावी.

वेणुबाई ॥ ५ । सीत उपद्रव अंगीं ज्वर येतां । मनीं वाटे चिंता बहु-साल ॥ ६ ॥ वळवट पापड साहित्य राहीलें । रामें ऐसें केलें काय ह्मणे ॥ ७ ॥ उछाह समीप आला काय करूं । चालीले पाझरू नेत्रां-तूनी ॥ ८ ॥ न्या मज सत्वर श्रीरामासन्मुख । पुसेन त्या देख ऐसें कां हें ॥ ९ ॥ सर्वही मिळोनी नेती रामापुढें । बांधा ह्मणे गाढें खांबासी या ॥ १० ॥ आका गांवां गेली मज वेथा जाली । दयाळा राहीली रामनवमी ॥ ११ ॥ ४०

॥ **श्रीराम** ॥ ध्यान करितां स्वामी आले अकस्मात । खांबा-हूनी मुक्त केली तेव्हां ॥ १ ॥ उछाहही जाला ज्वरही राहीला । मिरजे जावयाला सिद्ध जाली ॥ २ ॥ ह्मणे स्वामीराज पुजे द्यावें कांहीं । राम दिला तये पुजेलागीं ॥ ३ ॥ ताम्रमूर्ति रम्य पट्टाभि श्रीराम । घेवोनीयां प्रेमें गेली पाहा ॥ ४ ॥ सर्वकाळ पूजाभजनांत असावें । कीर्तन करावें अहोरात्र ॥ ५ ॥ राघवें येवोनी स्वप्नांत सांगावें । साक्षात्कार भावें ऐसा असे ॥ ६ ॥ वेणुबाईची हे पुढें कथा रम्य । सांगूं अनुक्रमें श्रोत-यांसी ॥ ७ ॥ मध्यें कथा आली जयरामस्वामीची । ऐका इची रुची बहु आहे ॥ ८ ॥ गुरुपरंपरा कृष्णउपासना । ब्रह्मचारी जाणा होते पूर्ण ॥ ९ ॥ अनुक्रम आला ह्मणुनी संपूर्ण । आदिअंत जाण सांगी-तला ॥ १० ॥ येथोनी अभंग जयरामस्वामीचे । भीम गाय वाचे आवडीनें ॥ ११ ॥ ४१

॥ **श्रीराम** ॥ जयराम स्वामी हे साता वरुषांत । येतां मुंजी करीत पिता त्यांची ॥ १ ॥ पुढें दों वरुषां पिता शांत जाला । मातेनेंच केला प्रतिपाळ ॥ २ ॥ पुढें पंढरीस यात्रा जाय जंव । हेही मातेसवें चालीयले ॥ ३ ॥ आले पंढरींत आनंद मनांत । तेथेंच राहात माते-सहीत ॥ ४ ॥ मातेचे सेवेंत तत्पर हे होते । तंव तीस मृत्य आला पाहा ॥ ५ ॥ तेयेचें सार्थक केलें आनंदानें । पांडरंगीं मन सर्व-काळ ॥ ६ ॥ माझी मातापिता तूंचि देवा आतां । ज्ञान देई आतां

दीनास या ॥ ७ ॥ चंद्रभागे स्नान क्षेत्र प्रदक्षणा । देवासी प्रार्थना हेचि सदा ॥ ८ ॥ येके दिसीं केला निग्रह जेधवां । देवें भेटी तेव्हां दिली पाहा ॥ ९ ॥ मागे बापा वर ह्मणे द्यावें ज्ञाना । देव त्यासी जाणा बोलीयले ॥ १० ॥ सद्गुरु वांचोनी नव्हे कदां ज्ञान । भीमाचें हें मन गुरुपाईं ॥ ११॥

४२

॥ **श्रीराम** ॥ गुरु करूं कोण सांगा स्वामी मज । ऐकोनी महाराज सांगताती ॥ १ ॥ पंढरीपासोनी आहे दाहा गांवें । पश्चिमेसी जावें वडगांवासी ॥ २ ॥ तेथें आहे माझा अंतरंग पूर्ण । कृष्णापा हें जाण नाम त्याचें ॥ ३ ॥ ऐकतांचि ऐसें निघाले सत्वर । ध्यान निरंतर सद्गुरूचें ॥ ४ ॥ आले वटग्रामा कृष्णापासन्मुख । पाहातांचि हाक मारीयली ॥ ५ ॥ ये रे जयरामा पांडुरंगें तुज । धाडिलें हें मज कळों आलें ॥ ६ ॥ ऐकतांचि नेत्रीं अश्रुधारा आली । चरणावरी घाली दंडवत ॥ ७ ॥ उठवोनी देवोनी आलिंगन त्यासी । ह्मणती वृत्तांतासी ऐके माझ्या ॥ ८ ॥ विप्रकुळीं जन्म कृष्णातीरीं ग्राम । ऊर्णबाहे नाम प्रसिद्ध हें ॥ ९ ॥ पूर्व स्त्री जे होती क्रमोनीया गेली । मग दुजी केली आणीकाची ॥ १० ॥ विप्र येक घेवोनीया होता आला । ब्रह्मसूत्रें जाला समंध हा ॥ ११ ॥

४३

॥ **श्रीराम** ॥ होती उपवर कन्या येक जाली । पुढें यात्रा आली रवळयाची[1] ॥ १ ॥ उदकासी गेली आमुचीहो कांता । तिनें तेथें पिता वोळखीला ॥ २ ॥ जाल्या भेटी गोष्टी स्फुंदत उकसाबुकसी । पुसती तयासी आयाबाया ॥ ३ ॥ नापीकाची होती कळों आली जना । केली विचारणा माहाजनीं ॥ ४ ॥ पित्यासमागमें गेली ते आनंदें । मग विप्रवृंदे आली पाहा ॥ ५ ॥ नकळत दोष जाला प्रायश्चित । देवोनी जातींत घेऊं ह्मणती ॥ ६ ॥ आतां ब्राह्मणासी कासया भ्रष्टऊं । देह पाईं ठेऊं देवाजीचे ॥ ७ ॥ सिद्ध शांतरायें मग कृपा केली । वृत्ति

---

१ रवळनाथ नांवाचें दैवत कोकणांत आहे.

स्थिरावली सस्वरूपीं ॥ ८ ॥ आषाढी कार्तिकी पंढरीची वारी । करितो ज्ञानेश्वरीपारायण ॥ ९ ॥ जयरामा तूं शुद्र आहेसी ब्राह्मण । भ्रष्ट यातीहून जाहालों मी ॥ १० ॥ कथा हे गहन पुढें आहे ऐका । प्रसंग हा नीका भीम गाय ॥ ११ ॥ ४४

॥ **श्रीराम** ॥ ह्मणती याती कुळा नाहीं मज चाड । याची पाईं दृढ भाव आहे ॥ १ ॥ केला अनुग्रह आनंद जाहाला । तीर्थ द्यावें मजला ह्मणती तेव्हां ॥ २ ॥ विहीरींत तेव्हां करोनीया स्नान । ह्मणती तीर्थ जाण हेंचि घेई ॥ ३ ॥ सेवा सद्गुरूची केली वर्णवेना । सेवेंतचि ज्ञाना जालें पाहा ॥ ४ ॥ कृष्णापासी काळ पातला समीप । ह्मणती ब्रह्मरूप होऊं आतां ॥ ५ ॥ जयराम हा माझा न ठेवील प्राण । ह्मणवोनी खूण सांगती त्या ॥ ६ ॥ जयरामा भक्तीचा करी तूं उद्घाट । आह्मी वैकुंठास जाऊं आतां ॥ ७ ॥ येक खूण तुज सांगतो ते ऐक । मारुतीचा देख अवतारची ॥ ८ ॥ स्वामी रामदास नाम हें प्रसिद्ध । करिती ते बोध पूर्ण तूज ॥ ९ ॥ मजहूनी प्रीति करी त्यांचा ठाईं । राम आणि ते कांहीं भिन्न नाहीं ॥ १० ॥ सांगोनीया ऐसें गेले परंधामा । संतांचा महिमा भीम गाये ॥ ११ ॥ ४५

॥ **श्रीराम** ॥ स्वामीची समाधी केलें वृंदावन । भजनविधी जाण वाढविली ॥ १ ॥ शंकराचार्यांचा मठ करविरीं । गुरुत्व निर्धारीं ब्राह्मणाचें ॥ २ ॥ तयापासीं कोणी सांगती जाऊनी । भ्रष्टाकार जनीं जाला येक ॥ ३ ॥ ब्राह्मण असतां नापीकाचा शिष्य । होवोनी बहुत भ्रष्टाकार ॥ ४ ॥ ऐकतांचि स्वारी धाडोनी आणिले । पुसतां कथिलें होतें तैसें ॥ ५ ॥ तयांच्या मठांत उछाहही होता । भोजना तत्वता विप्र आले ॥ ६ ॥ चहूं सहस्त्रांच्या बैसल्या पंगती । स्वामी तयाप्रती बोलताती ॥ ७ ॥ भ्रष्टाचा हा शिष्य ह्मणूनी उपवीत । काढूनीया घेत तये क्षणीं ॥ ८ ॥ बंधनातुनीया जालो आजी मुक्त । ह्मणोनी निघत तेथोनीया ॥ ९ ॥ पंचगंगेवरी करोनीया स्नान सद्गुरूचें ध्यान आरं-

भीलें ॥ १० ॥ भीम ह्मणे गुरुभक्त जे निसीम । तयासी श्रीराम सांभाळीत ॥ ११ ॥ ४६

॥ **श्रीराम** ॥ रामदास स्वामी निरवीले तुह्मासी । तरी या दिनासी सांभाळावें ॥ १ ॥ चितीतांची नवल जालें तये वेळीं । यज्ञोपवीतें गेलीं ब्राह्मणांचीं ॥ २ ॥ चारसहस्त्र हो पाहाती गळ्यांत । येकही दिसत नाहीं कोठें ॥ ३ ॥ जोडवी आंगठ्या किल्या मुद्या होत्या । येकदाची पाहा त्या गेल्या जाणा ॥ ४ ॥ ब्राह्मण क्षोभले ह्मणती संन्यास्यासी । संतांच्या छळणासी कांहो केलें ॥ ५ ॥ सन्यास्यासहित सर्वही ब्राह्मण । येवोनी सन्मानें नेले यांसी ॥ ६ ॥ यज्ञोपवीत यांच्या गळां घालिताती । सर्वांचींही येतीं जैसीं तैसीं ॥ ७ ॥ सन्मान बहुत करूनी पाठवीले । पूर्वस्थाना आले होते तेथें ॥ ८ ॥ कृष्णापा स्वामींची पुण्यतीथ आली । साहित्याची केली विचारणा ॥ ९ ॥ चाफळासी जावें दर्शना हा हेत । परी पुण्यतीथ जवळी आली ॥ १० ॥ पत्र पाठवावें तरी नाहीं ठीक । भीम ह्मणे ऐक्य भाव पाहा ॥ ११ ॥ ४७

॥ **श्रीराम** ॥ ऐसीयांत स्वामी आले गांवापासीं । सारिती स्नानासी स्वस्थ चित्तें ॥ १ ॥ कोणी आला त्यानें सांगितलें यांस । स्वामी रामदास आले ह्मणून ॥ २ ॥ ऐकोनी ह्मणती दिनाचें अंतर । जाणोनी साचार राम आला ॥ ३ ॥ वाद्यें लाऊनीया चालीले सामोरे । ह्मणती वारंवार धन्य जालो ॥ ४ ॥ दर्शन होतांचि अष्टभाव जाले । नेत्रांतूनी चाले अश्रुधारा ॥ ५ ॥ पायावरी दंडप्राय नमस्कार । करितांची सत्वर उठवीलें ॥ ६ ॥ आलिंगनें तेव्हां दिलें प्रेमभावें । राघोबा चालावे आश्रमासी ॥ ७ ॥ जयरामा उछाह रचना सांग कैसी । होती ते स्वामीसी निवेदीली ॥ ८ ॥ पुण्यतीथ येथें काला न करावा । रथोछह व्हावा तेव्हां ठीक ॥ ९ ॥ काला मोडोनीया रथोछह केला । आनंद जाहाला न वर्णवे ॥ १० ॥ पुढील कथेसी द्यावें अवधान । भीम ह्मणे गहन संतलीला ॥ ११ ॥ ४८

॥ **श्रीराम** ॥ जयराम ह्मणती राघोबासी भावें । कीर्तन ऐकावें ऐसी इच्छा ॥ १ ॥ आज करूं ह्मणून गेले अरण्यांत । तेथें कौतुकार्थ काय केलें ॥ २ ॥ पोरें मेळऊन तया शिकवीती । नारळ देऊं ह्मणती आक्रा आक्रा ॥ ३ ॥ यादवा माधवा शिकऊनी तया । ह्मणती कथेस या संध्याकाळीं ॥ ४ ॥ कथे उभे रहावें ह्मणसी जयरामा । टाळधरी आह्मा नाहीं कोणी ॥ ५ ॥ आहेत हे टाळधरी तुमचेची । स्वामी ऐक-तांचि उभे राहाती ॥ ६ ॥ टाळधरी सर्व गेले निघोनीया । मग पोरा तयां बोलावीलें ॥ ७ ॥ यादवा मधवा ह्मणत उभे राहाती । टाळ घेती हातीं पाषाणाचे ॥ ८ ॥ तयावरी कथा केली दोनप्रहर । ब्रह्मरस थोर जाला तेव्हां ॥ ९ ॥ कथा जाल्यावरी नारळ आणऊन । आक्रा आक्रा जाण दीले तयां ॥ १० ॥ पुढील कथेसी अवधान द्यावें । भीम ह्मणे भावें ऐका सर्व ॥ ११ ॥
४९

॥ **श्रीराम** ॥ खटावांत येका विप्रें उछाहासी । सभारंभें यांसी नेले तेथें ॥ १ ॥ जयरामस्वामींचें त्या दिसीं कीर्तन । ऐकावया जन बहुत आले ॥ २ ॥ गांवीचा पठाण ठाणेदार होता । तोही आला होता ऐकायासी ॥ ३ ॥ रामदासस्वामीसमर्थी पाहोन । करित कीर्तन आनं-दानें ॥ ४ ॥ प्रेमाच्या भरांत तेधवा बोलती । हातीं राम देती संत-राव ॥ ५ ॥ पठाणें हें मनीं धरोनीया गेला । प्रातःकाळीं याला बोला-वीले ॥ ६ ॥ तीन छत्तीवरी बंगल्यांत ह्मणे । हातीं राम देणें धरो-नीया ॥ ७ ॥ अध्यात्म सांगतां कैद केलें यांसी । तेव्हां गोपाळासी पाचारीलें ॥ ८ ॥ सच्छिष्य गोपाळा ह्मणती राघोबाला । वर्तमान त्याला सांग जाई ॥ ९ ॥ जावोनी स्वामीसी सांगे सर्व वृत्त । ऐकतांचि तेथें आले वेगें ॥ १० ॥ पठाणें सन्मान करून बैसवीले । पुढे जें वर्तलें भीम सांगें ॥ ११ ॥
५०

॥ **श्रीराम** ॥ स्वामी तया ह्मणती राम व्हावा काय । तरी तूं मागें ये आमुचीया ॥ १ ॥ लाहान खिडकी होती तयांतूनी । सत्वर

निघोनी आले खालीं ॥ २ ॥ राम उभा केला त्वरें येई आतां । चमत्कार पाहातां कांपूं लागे ॥ ३ ॥ गळ्यांत पागोटें घालोनी उत्तरे । ह्मणे मी पामर आहे दीन ॥ ४ ॥ द्रव्य बहु दिल्हें सत्कारही केला । उछाह जाहाला आनंदानें ॥ ५ ॥ ऐसी तेथें ख्याती करोनी निघाले । वटग्रामा आले आनंदानें ॥ ६ ॥ येके दिसीं ह्मणती जयरामा वैराग्य । करावें हें भाग्य संताचें कीं ॥ ७ ॥ गोपाळ गोसावी मठांत ठेवोनी । उभयता निघोनी गेले पाहा ॥ ८ ॥ अरण्यांत गेले पर्वताची घळ । ह्मणती हें स्थळ राहाया योग्य ॥ ९ ॥ घळ लिंपायासी चिखल कराया । कुदळ आणोनीया ठेवीयली ॥ १० ॥ यशवंतसुत अल्पमती आहे । संताचीच गाय लीला सदा ॥ ११ ॥ ५१

॥ **श्रीराम** ॥ जयरामासी माती खाणाया लावीती । पाण्यालागीं जाती आपणची ॥ १ ॥ पाणी आणोनीया ओतीतांचि माती । वाहोनीया जाती तयेवेळीं ॥ २ ॥ माती खाणवेना आहेसी निकामी । तेव्हां केले भूमी दंडवत ॥ ३ ॥ राघोबारे मज करी तूं निकामी । ह्मणती पाणी तुह्मी आणा आतां ॥ ४ ॥ यांचें शरीर जड हाळु हाळु घागर । आणितां माती फार ढीग केला ॥ ५ ॥ स्वामीनींच पाणी आणोनी चिखल । करोनीया घळ खाणूं गेले ॥ ६ ॥ तंव कडा अकस्मात पडिला वरी । जयरामाच्या नेत्रीं अश्रु आले ॥ ७ ॥ राघोबासारिखें रत्न हारपलें । ह्मणोनी घातलें आसन तेथें ॥ ८ ॥ प्राणाचा संकल्प केला तये क्षणीं । तव पडिली कानीं ध्वनी ऐसी ॥ ९ ॥ शहापुरीं आहे येवोनीया पाहे । विस्मय हा होय अंतःकर्णीं ॥ १० ॥ जावें बरे तेथें ह्मणोनी निघाले । मठालागीं आले भीम ह्मणे ॥ ११ ॥ ५२

॥ **श्रीराम** ॥ येवोनी पाहाती स्वामी आनंदांत । मिठीच घालीत गळा तेव्हां ॥ १ ॥ राघोबारे तुझें चरित्र नकळे । ह्मणोनीयां लोळे चरणावरी ॥ २ ॥ कांहीं मज कृपा करूनी सांग खूण । येकांतीं नेऊन बोध केला ॥ ३ ॥ तीन दिवस तेव्हां समाधी लागली । स्थितीच

बाणली वर्णवेना ॥ ४ ॥ स्वामींनीं तयासी केले सावधान । जिवन्मुक्त-पण जालें प्राप्त ॥ ५ ॥ उभयता निघोनी आले वटग्रामा । तेथें केला महिमा अद्भुतची ॥ ६ ॥ जयरामा स्नानासी जाऊं अरण्यांत । ह्मणोनी त्वरित निघते जाले ॥ ७ ॥ सात पुरुष खोल होता येक आड । बहु अवघड तेथें आले ॥ ८ ॥ पाहातांचि उडी ठोकिली स्वामींनीं । जयराम त्यां नयनीं । पाहाताती ॥ ९ ॥ टाक उडी ह्मणतां यांनींही टाकीली । तळासीच गेली अकस्मात ॥ १० ॥ आसन घालोनी बैसले सुखांत । यशवंतसुत गाय त्यासी ॥ ११ ॥ ५३

॥ **श्रीराम** ॥ स्वामी मनोवेगें आले चांफळासी । जाले तीन दिवस ऐसीयासी ॥ १ ॥ तेथोनीया स्वामी आले वडगांवा । ह्मणती शिष्यां सर्वां मिळऊनी ॥ २ ॥ स्वामी तुमचे गेले आडांत बुडाले । तीन दिवस जाले पाहूं चला ॥ ३ ॥ बुका माळा तेव्हां वाद्यें लाऊनीया । आले पाहावया तया स्थाना ॥ ४ ॥ पोहोणार अंत उतरोनी पाळणा । सांडोनीया जाणा काढिताती ॥ ५ ॥ समाधीसुखांत आहेत निमग्न । कांहीं देहभान नाहीं यांसी ॥ ६ ॥ स्वामींनीं त्यावेळे नमस्कार केला । धन्य साधु लीळा मुखें ह्मणती ॥ ७ ॥ बुका भाळीं माळा गळ्यांत घालून । समाधी उत्थान केलें पाहा ॥ ८ ॥ वाद्यें लाऊनीया मठासी आणीले । बोधा रूप जाले आजी माझ्या ॥ ९ ॥ अर्धोन्मीलित नेत्र पाहाती उघडून । स्वामीस देखोन नमन केलें ॥ १० ॥ जयरामस्वामीचें चरित्र अद्भुत । भीमें संकळीत वर्णीयलें ॥ ११ ॥ ५४

॥ **श्रीराम** ॥ तेथोनीया स्वामी आले चाफळासी । पुढें कथा कैसी तेही ऐका ॥ १ ॥ अरण्यांत जावें तेथेंचि राहावें । व्याघ्रानें पडावें सभोवते ॥ २ ॥ येकनाथस्वामी त्यांचा नातु असे । गेला विदेशास द्रव्यासाठीं ॥ ३ ॥ विजापुराकडे रोजगार करून । जवळी होते होन बासष्टची ॥ ४ ॥ बहु दिस जाले जातसे घरास । बाबाजी हें असे नाम ज्याचें ॥ ५ ॥ मार्गी येतां कानीं ऐकीले कितींसी । संतदर्शनासी

जावें आधीं ।। ६ ।। आपुल्या वडिलांची ख्याती आहे मोठी । यांसी पाहूं दृष्टी ह्मणूनी आला ।। ७ ।। चाफळासी आला विचारूं लागला । स्वामी दर्शनाला आलों ह्मणे ।। ८ ।। मठीं होते त्यांनीं सत्कार करून । राहावीलें जाण आदरें त्या ।। ९ ।। कल्याण गोसांवी शिरगांवीं होते । तेही आले तेथें अकस्मात ।। १० ।। गुरुवारीं दर्शन ध्यावें सद्गुरूचें । भीम ह्मणे साचे प्रेम असे ।। ११ ।। ५५

।। **श्रीराम** ।। घोडे मनुष्यासी ठेवोनीया तेथें । द्रव्य मात्र घेत समागमें ।। १ ।। कल्याण गोसांवी यांच्या समागमें। चालीलें सप्रेमें भेटा-वया ।। २ ।। पर्वतांत स्वामी घोंडीवरी पाहाती । नमन करिती दंडप्राय ।। ३ ।। येक होन स्वामीपुढें ठेवियला । आलिंगन त्याला दिलें भावें ।। ४ ।। कल्याण स्वैंपाक करीं त्वरें आतां । जाळींत तत्वता सिधा आहे ।। ५ ।। तिवाचाची सिधा भांडींही आहेत । घेवोनी त्वरीत पाक केला ।। ६ ।। कोंकणस्थ विप्र साठ मार्गीं जातां । स्वामीसी पा-ह्यतां संतोषले ।। ७ ।। समर्थें भोजना राहावीले तयासी । ह्मणती स्ना-नासी करा त्वरें ।। ८ ।। अन्नावरी छाटी आंगीची टाकीली । तृप्ती सर्वां जाली वर्णवेना ।। ९ ।। दक्षणा द्यावया ह्मणती बाबाजीसी । येकसष्ट होनासी वेगीं द्यावें ।। १० ।। द्विगुणीत देऊं ह्मणतांचि दिधले । ब्राह्मणा वांटीलें भीम ह्मणे ।। ११ ।। ५६

।। **श्रीराम** ।। साठ ब्राह्मणासी दिले साठ होन । बाबाजीसी जाण दोन दिल्हे ।। १ ।। आले चाफळासी घेवोनी तयासी । केले अति-ध्यासी बहुतची ।। २ ।। जाते वेळे कांहीं न देतीच होन । मनीं संको-चोन जातां जाला ।। ३ ।। दोन होनावरी आला गांवापासी । घराला रात्रीसी जाऊं ह्मणे ।। ४ ।। त्याच दिवसीं स्वामी तयाच्या वाड्यांत । आले अकस्मात प्रातःकाळीं ।। ५ ।। बाबाजीचा बाप भव्यरूप पाहे । नमन करीत आहे वारंवार ।। ६ ।। सवासे होनासी देवोनी ह्मणती । बांबाजीही येती अस्तमांनीं ।। ७ ।। मार्गीं तस्करांचा उपद्रव ह्मणून ।

दिल्हे होन तेणें आह्मापासीं ॥ ८ ॥ नाम रामदास सांगोनीया तथा। गेले तेथोनीया अकस्मात ॥ ९ ॥ आनंद जाहाला अस्तमान होता। बाबाजी तत्वता आले तेथें ॥ १० ॥ बापें वर्तमान सर्व सांगीतलें। तेव्हां अश्रु आले भीम ह्मणे ॥ ११ ॥

५७

॥ **श्रीराम** ॥ सद्गदीत कंठ बापा वर्तमान। सर्व निवेदन केलें तेव्हां ॥ १ ॥ ऐसीयासी तुम्ही कैसें जाऊं दिले। हें कांहीं समजलें नाहीं आह्मा। २। सर्वही मठासी येवोनी स्वामीसी। भेटोनी गृहासी गेले जाणा ॥ ३ ॥ पुढें कथा गोड बहुत रसाळ। कोंडोळ्याचे घळें स्वामी गेले ॥ ४ ॥ कांहीं येक दिवस होती तया ठाया। चाफळा जावया हेत जाला ॥ ५ ॥ कल्याण गोसांवी समागमे होते। कुकुद्मति वाहात तेथें आले ॥ ६ ॥ उतारही नाहीं उदक अपार। गांव पैलतीर तेथें होता ॥ ७ ॥ तयासी ह्मणती न्या वेगी आह्मासी। पेटी आणावयासी गेले तेव्हां ॥ ८ ॥ पराधेन व्हावें कासयासी आह्मी। ह्मणोनीया स्वामी शिरले अंत॥ ९ ॥ पोहत चालीले गउंड[1] चुकले। आवर्तीत आले अकस्मात ॥ १० ॥ हत्ती आला तरी न निवे त्यांतून। जन पाहाती नयनीं भीम ह्मणे ॥ ११ ॥

५८

॥ **श्रीराम** ॥ गांव सर्व मिळून हाकाच मारिती। बुडाला ह्मणती रामदास ॥ १ ॥ कल्याणारे दास गेला हे बोलिले। ऐकतांचि जाले सिद्ध पाहा ॥ २ ॥ उडि टाकोनीया आले स्वामीपासी। पाठीवरी त्यांसी घेती तेव्हां ॥ ३ ॥ स्वामी क्षणभरी श्वासोच्छ्वास धरा। टाकूनें भोंवरा फोडीतो मी ॥ ४ ॥ मारोनीयां बुडी फोडिला भोंवरा। आले पैलतीरा क्षणामाजी ॥ ५ ॥ स्वामी ह्मणती आह्मा जीवदान दिल्हे। तेव्हां नेत्रीं आले अश्रुपात ॥ ६ ॥ मस्तकीं हस्तक ठेवोनी त्यावेळीं। पूर्ण कृपा केली गुरुरायें ॥ ७ ॥ हस्तामध्यें कडें होतें सुवर्णाचें। हातीं तेव्हां यांचे घालीताती ॥८॥ चाफळासी येतां कडें आकापासी। देतांचि

---

1 गवंड = मार्ग.

स्वामीसी निवेदीलें ॥ ९ ॥ समर्थ बोलीले न घे अशाश्वत । तरी त्या शाश्वत देऊं आह्मी ॥ १० ॥ कांहीं येक दिवस चांफळीं राहोनी । चालीले तेथोनी भीम ह्मणे ॥ ११ ॥

५९

॥ **श्रीराम** ॥ चाफळासन्निध दोंच कोशावरी । रामघळ बरी होती तेथें ॥ १ ॥ दाहा पांच शिष्य समागमे होते । घळींत राहते कांहीं दीन ॥ २ ॥ येकांतीं बैसावें ध्यानस्त असावें । कांहीं न बोलावें कोणासवें ॥ ३ ॥ स्वामीची बैठक आसनाचें स्थान । आद्यापीही जाण आहे तेथें ॥ ४ ॥ प्रहररात्रीसी बोलीले शिष्यासी । विडा हा आह्मासी द्यारे कोणी ॥ ५ ॥ पाहाती तों पानें नाहीं झोळण्यांत । कल्याण त्या ह्मणत आणितो मी ॥ ६ ॥ अमावास्येची रात्र अंधार निबीड । झाडीही सद्दढ तृण फार ॥ ७ ॥ भय नाहीं मनीं सत्वर निघाले । कड्याखालीं गेले भजन करीत ॥ ८ ॥ मार्गावरी सर्प न दिसे कलेहारी[1] । पाय तयावरी पडीला तेव्हां ॥ ९ ॥ दंश करितां हाक राम ह्मणुनी देत । पृथ्वीसी पडत अचेतन ॥ १० ॥ स्वामीनीं तो शब्द ऐकतां उठिले । घाबीरेंच जाले भीम ह्मणे ॥ ११ ॥

६०

॥ **श्रीराम** ॥ कोण गेला कोठें ह्मणती तो कल्याण । गेला हें ऐकोन बोलीयले ॥ १ ॥ लावा चूड वेगीं जाऊं कड्याखालीं । हांक का दिधली पाहूं चला ॥ २ ॥ लावोनीया चूड आले याजपासीं । पाहाती तों प्राणासी ठाव नाहीं ॥ ३ ॥ उचलोनी वरी आणीयलें प्रेत । ह्मणती खरा भक्त हाचि आहे ॥ ४ ॥ भैरवासी हाक मारिली स्वभावीं । अतीत उठवी आमुचा हा ॥ ५ ॥ प्रातःकाळीं आह्मा मण वाटूं गुळ । सर्पाचे हे सळ दूर करी ॥ ६ ॥ भैरवाचें सत्व पाहूं ह्मणोनी तेथ । येवोनीया हस्त फिरवीला ॥ ७ ॥ निर्विष होउनी उठिले सत्वर । स्वामीचरणीं शिर ठेवियलें ॥ ८ ॥ पाहाती तों हातीं पानेंही आहेत । तेव्हां विडा देत सद्गुरुसी ॥ ९ ॥ सर्व शिष्यालागीं विस्मये जाहाला । **नमस्कार**

---

1 कमलाकार.

केला सर्वांनींही ॥ १० ॥ आक्रा मण गुळ वाटीला आनंदें । भीम हा स्वानंदें लीला गाय ॥ ११ ॥ ६१

॥ **श्रीराम** ॥ उंबरज गांवीं होता येक भक्त । त्याची ऐका मात आवडीनें ॥ १ ॥ जटीळ गोसांवी गुरु केला त्यानें । घरींच ठेवोनी सेवा करी ॥ २ ॥ चाकरी आलीया सांगत स्त्रीयेसी । सेवा मज ऐसी करावी त्वा ॥ ३ ॥ ऐसें सांगोनीया गेला तो गांवासी । दासीला सेवेसी लावीयेले ॥ ४ ॥ तयावरी तेणें ठेवितांची प्रीति । तेव्हां निंदा करिती सर्व जन ॥ ५ ॥ पतिव्रता पतिभेणें न ह्मणे कांहीं । ऐसीयांत तोही आला घरा ॥ ६ ॥ तया वर्तमान सांगती सर्वही । परी न ये कांहीं विकृती त्या ॥ ७ ॥ दासीस आणोनी नमस्कार घाली । गुरुमाता जाली ह्मणे आह्मा ॥ ८ ॥ निश्चये करोनी उभयांची सेवा । करित सद्भावा धरोनीया ॥ ९ ॥ ऐसें वर्तमान चाफळीं स्वामीस । कळतांचि त्यास धन्य ह्मणती ॥ १० ॥ ऐसीयाची भेटी घ्यावी ह्मणऊनी । निघती ते क्षणीं भीम ह्मणे ॥ ११ ॥ ६२

॥ **श्रीराम** ॥ सुखासनीं तेव्हां बैसोनी निघाले । समागमे चाले शिष्यभार ॥ १ ॥ आले गांवामध्यें ग्रामस्त भेटती । गुरुभक्त ह्मणती दावा आह्मा ॥ २ ॥ समाचार घेतां होता तो शेतांत । ग्रामस्त सांगत स्वामीपासीं ॥ ३ ॥ गुरु त्याचा घरीं भेटा ह्मणती पाही । स्वामी ह्मणंती नाहीं प्रयोजन ॥ ४ ॥ धाडोनी माणसे आणिला बोलाऊन । पाहातां आलिंगन स्वामी देती ॥ ५ ॥ आलिंगनांतचि जाला अनुतापा । ह्मणे स्वामी कृपा करा दीना ॥ ६ ॥ तया अनुग्रह देवोनी सत्वर । केला भवपार क्षणामाजीं ॥ ७ ॥ ऐकुनी जटिळ पळोनीया गेला । निश्चयें तारीला स्वामीरायें ॥ ८ ॥ पुन्हा चाफळासी आले आनंदानें । पुढील कथन तेंही ऐका ॥ ९ ॥ बद्धासी ताराया अवतार सत्य । किर्ती हे अद्भुत जगामाजीं ॥ १० ॥ चाफळीच्या कथा जाहाल्या संपूर्ण । पुढील कथन भीम गाय ॥ ११ ॥ ६३

**॥ श्रीराम ॥** येके दिसीं स्वामी तारळखोऱ्यांत । गेले अकस्मांत आनंदानें ॥ १ ॥ कोकणीचे शूद्र सांगती स्वामीसी । घळ आपणासी आहे येथें ॥ २ ॥ परी पंचानन व्याघ्र आहे तेथ । तये स्थानीं जात नाहीं कोणी ॥ ३ ॥ दत्तोबासी तेव्हां बोलीलें वचन । जाऊन तें स्थान पाहा आधीं ॥ ४ ॥ व्याघ्रासी आमुचा सांगावा निरोप । स्थान द्यावें कोप सांडूनीया ॥ ५ ॥ तेथें आह्मी स्नानसंध्या करूं ऐसी । इच्छा हे मानसीं जाली आहे ॥ ६ ॥ आज्ञा वंदोनीया गेले भीत भीत । तव त्या घळींत व्याघ्र होता ॥ ७ ॥ भयाभीत तया निरोप सांगती । नेत्र हे झाकिती बैसोनीया ॥ ८ ॥ गर्जना करूनी गेला निघोनीया । स्वामी तयां ठाया आले मग ॥ ९ ॥ कांहीं येक दिवस तेथेंचि राहिले । पुन्हा जाते जाले चाफळासी ॥ १० ॥ आद्यापी घळींत व्याघ्र नाहीं येत । ऐसी केली ख्यात भीम ह्मणे ॥ ११ ॥ ६४

**॥ श्रीराम ॥** चाफळीं मठांत निद्रा होती केली । रात्रही जाहाली दोन प्रहर ॥ १ ॥ कल्याण गोसांवी भार घालितांती । इतुक्यांत येती चोर पाहा ॥ २ ॥ साठी बेरडाचा दरवडा आला । तेव्हां कल्याणाला आज्ञा केली ॥ ३ ॥ जीवें न मारावें धुडाऊनी द्यावें । ऐसें ह्मणतां भावें उठिले हे ॥ ४ ॥ मठासंनिधानी येउनी बिलगले । तेव्हां यानीं केलें काय ऐका ॥ ५ ॥ हाक देउनीया तुळवट उचलीलें । पाठींच लागले अकस्मात ॥ ६ ॥ साठही बेरड हत्यार टाकूनी । चरणासी येऊनी लागताती ॥ ७ ॥ द्यावें जीवदान ह्मणतांचि सोडिले । घेवोनीया आले हत्यारासी ॥ ८ ॥ स्वामीपुढें मोळी आणोनी ठेवीली । पाठ थापटीलीं गुरुनाथें ॥ ९ ॥ पुढें रामनवमी उछाहही आला । समारंभ जाला वर्णवेना ॥ १० ॥ राजेही उछाहा आले होते तेथें । भीम गाय चित्तें सद्गुरुसी ॥ ११ ॥ ६५

**॥ श्रीराम ॥** राजयाचा नेम गुरुवारीं यावें । दर्शन सद्भावें घ्यावयासी ॥ १ ॥ अंतर पडतां अन्नचि न खाये । ऐसी निष्ठा पाहे

असे तया ॥ २ ॥ लांब पडतें ह्मणूनी स्वामीसी विनवीलें । सन्मानेंचि नेले किल्यावरी ॥ ३ ॥ सज्जनगड हें नाम त्या किल्याचें । ऐकतां स्वामीचें मन नीवे ॥ ४ ॥ सातान्याहूनि तो होता तीन कोस । तेथेंच निवास केला मग ॥ ५ ॥ खाले उपद्रव बहुत म्हणून । येकांत जाणोन राहातातीं ॥ ६ ॥ घरही विस्तीर्ण बांधोन दिधलें । निस्पृहही जाले बहु शिष्य ॥ ७ ॥ भिलवंडी गांवीं उठविला भ्रतार । प्रथमाचि पुत्र जाला त्यासी ॥ ८ ॥ पांचा वरुषाचा होतां स्वामीलागी । आणोनीया वेगीं समर्पिला ॥ ९ ॥ मुंजी करोनीया ठेवोनीया नांव । उद्धव हें पाहावें ठेवीयलें ॥ १० ॥ टाकळीचा मठ देवोनी तयासी । ऐशा निस्पृहासी भीम गाय ॥ ११ ॥ ६६

॥ **श्रीराम** ॥ प्रांतामध्यें कांहीं दुष्काळ पडिला । खर्चही वाढला मठीं थोर ॥ १ ॥ स्वामी बोलीयले जावें कोठें तरी । समुदाय भारी जाला असे ॥ २ ॥ वार्ता हे फांकतां रायासी समजली । विचारणा केली तेव्हां कैसी ॥ ३ ॥ कारकून उधोपानस्या आणोन । ठेवियला जाण स्वामीपासीं ॥ ४ ॥ लागेल तें मठीं द्यावें आनंदानें । ऐशी आज्ञा पूर्ण केली तया ॥ ५ ॥ राव दर्शनासी आला प्रेमभावें । नमन सद्भावें केलें पाईं ॥ ६ ॥ ह्मणे राज्य काय अजीच बुडालें । जाऊं कां इच्छिले विदेशासी ॥ ७ ॥ गेला जरी तरी प्राण मी न ठेवी । आज्ञा मात्र व्हावी दीनासीया ॥ ८ ॥ नेत्रीं अश्रुधारा निश्चय जाणोनी । अभय स्वामीनीं दिल्हें त्यासी ॥ ९ ॥ ऐसा भाव तुझा तेणोंचि बांधलो । किल्यावरी जालो ठाणापती ॥ १० ॥ ऐकोनीया रायें साखर वांटिली । भिमें हें वर्णिली भक्तीसार ॥ ११ ॥ ६७

॥ **श्रीराम** ॥ राव सातान्यासी गेलीया उपरी । मागें कथा बरी तेही ऐका ॥ १ ॥ पर्वकाळ आला न सांगोनी कोणा । गेले कृष्णा-स्नाना येकलेचि ॥ २ ॥ कृष्णावेण्यासंगमासी करितां स्नान । विप्रवृंदे जाण आली तेथें ॥ ३ ॥ संकल्प सांगती दाहावीस मिळोनी । आज्ञा

विचारोनी स्नान केलें ॥ ४ ॥ कपाळीं त्रिपुंड लाऊनी बैसले । विप्र बोलीयले दक्षणा द्या ॥ ५ ॥ जवळी तों येक पैसा नाहीं आतां । आहे कृष्णा माता भावीकासी ॥ ६ ॥ उदकीं जाऊनीया खडे घेवोनीया । येक येक तया हातीं देती ॥ ७ ॥ भावार्थी बोलती आमुचें हें सुवर्ण । अभावी ते जाण टाकीताती ॥ ८ ॥ तेथोनीया स्वामी मठालागीं आले । ब्राह्मणही गेले घरोघरीं ॥ ९ ॥ भाविक होते ते पाहाती सोडोन । तंव तें सुवर्ण जालें असे ॥ १० ॥ जितुक्यांनीं घेतलें तितुक्याचेंही जालें । त्यांनीं दाखवीलें कुटीळासी ॥ ११ ॥ पाहातांची त्यांच्या अश्रु आले नेत्रीं । भीम ह्मणे बरी भक्ती आहे ॥ १२ ॥ ६८

॥ **श्रीराम** ॥ सर्वही मिळोनी आले स्वामीपासीं । स्वामीनीं तयांसी वोळखीले ॥ १ ॥ नमन करोनी बैसावें ह्मणती । तेव्हां ते बोलती स्वामीलागीं ॥ २ ॥ येक येक धोंडा द्यावा तुह्मी आह्मा । अद्भुत महिमा सांगवेना ॥ ३ ॥ सुवर्णाचे गोळे जाहाले तयांचे । आह्मा अभाग्याचें कर्म खोटें ॥ ४ ॥ स्वामी ह्मणती तये वेळेचा तो गुण । भाव तैसें जाण फळ आहे ॥ ५ ॥ बहु श्रमी होतां येकेक मोहर । घेवोनी साचार गेले पाहा ॥ ६ ॥ राव दर्शनासी आले स्वामीचीया । मोहीताही तयासवें होता ॥ ७ ॥ नाम हें तयाचें रामराव तेणें । स्वामीस पाहोन क़ाय केलें ॥ ८ ॥ दंडप्राय पृथ्वीवरी पडोनीया । ह्मणे स्वामीराया मुक्त करा ॥ ९ ॥ पाहोनी भाविक दिला अनुग्रह । राव भेटताहे तयालागीं ॥ १० ॥ स्वामी तयालागीं सांगती तें ऐका । भीम ह्मणे नीका प्रसंग हा ॥ ११ ॥ ६९

॥ **श्रीराम** ॥ स्वामी ह्मणती त्यासी संतनिंदा कानें । न ऐकावी मनें करूं नये ॥ १ ॥ संत साधु त्यांचे अवगुण न पाहे । गुण पाहात जाये सर्वकाळ ॥ २ ॥ गुरुनिंदा होतां शिक्षेसी करावे । नाहीं तरी जावे उठोनीया ॥ ३ ॥आज्ञा ह्मणोनीया रायासवें गेला। संतापासीं जाला भाव दृढ ॥ ४ ॥ येका मराठ्यानें केली मेजवानी । भोजनासी आणी सर्वो-

लागी ॥ ५ ॥ हाही आला हातीं माळ जप करीत । भोजना बैसत पंक्तिमाजी ॥ ६ ॥ सरदार विचारी कोण गुरु केला । सांगतांचि त्याला न साहावे ॥ ७ ॥ पिसे रामदास त्याचे तुह्मी शिष्य । ह्मणोनी उपहास्य केलें बहु ॥ ८ ॥ भोजनीं विक्षेप शिक्षेसी करितां । ह्मणोनी तत्वता उठूनी गेला ॥ ९ ॥ घरीं जावोनीया विचारी ब्राह्मणा । गुरुनिंदा जाणा ऐकीयली ॥ १० ॥ मरणें कीं मारणें ह्मणूनी सिद्ध जाला । सांगोनी तयाला पाठवीले ॥ ११ ॥ ७०

॥ **श्रीराम** ॥ हातीं नग्न खड्ग घोड्यावरी स्वार । बेभान हीं थोर जाला असे ॥ १ ॥ अकस्मात स्वामी आले तये स्थानीं । शिष्य पुढें दोनी पाठवीले ॥ २ ॥ पाहातांचि घोड्याखालीं उतरोनी । नमन चरणीं भावें केलें ॥ ३ ॥ हास्तासी जोडोनी पुढें आज्ञा काय । सेवटील आहे प्रसंग हा ॥ ४ ॥ ह्मणती द्यावी भिक्षा न जावें युद्धासी । ऐकतांचि त्यासी अश्रु आले ॥ ५ ॥ स्वामी आलें ऐसें ऐकतां निघाला । प्रेमभरें आला नमनासी ॥ ६ ॥ जेणें केली निंदा त्याची वाचा गेली । तोही स्वामीजवळी आला वेगें ॥ ७ ॥ राया वर्तमान कळतां तोही आला । समुदाय मिळाला सर्व तेथें ॥ ८ ॥ सर्वांचा संतोष केला गुरुरायें । पाईं लोळताहे निंदकही ॥ ९ ॥ सर्वस्वाचें दान करवोनी तयासी । अनुग्रह त्यासी दिला मग ॥ १० ॥ वाचा आली तेव्हां आनंद जाहाला । भीमें हा वर्णीला संतमहिमा ॥ ११ ॥ ७१

॥ **श्रीराम** ॥ वेणाबाई स्वामीदर्शनासी आली । भक्ति तिनें केली तेही ऐका ॥ १ ॥ करोनी स्वयंपाक ताट वाढोनीया । स्वामीपासीं काया वाचा मन ॥ २ ॥ खोलींत जावोनी ताट स्वामीपासीं । ठेवोनी दारासी द्यावें मग ॥ ३ ॥ कोणीं न पाहावें ऐसी आज्ञा होती । तैसेंचि चालती सर्वत्रही ॥ ४ ॥ वेणुबाई नित्य नव्या पक्वान्नासी । करोनी स्वामीसी जेववावें ॥ ५ ॥ येकें दिवसीं केलीं अपूपें सुंदर । आवडीचा पार नाहीं जीच्या ॥ ६ ॥ भरोनीया ताट खोलींत नेवोनी । सप्रेम

ठेवोनी बाहेर ये ॥ ७ ॥ दार लावोनीया उभीच राहीली । मनांत भावीली भावना हे ॥ ८ ॥ भोजन जालीयां धुवोनी ताटासी । मग प्रसादासी घेऊं ह्मणे ॥ ९ ॥ खोलीतूनी ध्वनी उठे रामराम । ह्मणे पूर्णकाम जेवीताती ॥ १० ॥ आपणही लागे भजन कराया । भीमासी गावया आनंद हा ॥ ११ ॥ ७२

॥ **श्रीराम** ॥ मनामाजी ह्मणे झरोक्यातुनीया। पाहावे गुरुराया भोजनांत ॥ १ ॥ उंच भिंतीवरी चढोनी पाहात । तव कपीनाथ बैसलासे ॥ २ ॥ पाहातांचि तेव्हां गुर्गुरीला रागें । भयाभीत वेगें पडिली खालीं ॥ ३ ॥ शुद्धि नाहीं देहभान सर्व गेलें । निःशेष निमाले प्राण पाहा ॥ ४ ॥ गडबड जाहाली खोलींत पाहाती । स्वामी न दिसती किल्यावरी ॥ ५ ॥ कल्याण गोसांवी किल्याखालीं येती । स्वामीस पाहाती धोंडीवरी ॥ ६ ॥ प्रार्थना करोनी वर्तमान कथिलें । ह्मणती कांहो केले लबाडीसी ॥ ७ ॥ आली कृपा मग किल्यावरी आले । वेणीस पाहिले ह्मणती सर्व ॥ ८ ॥ लत्ताप्रहार करितां उठोन बैसली । चरणास लागली आनंदानें ॥ ९ ॥ बहु स्तव केला सद्गुरूचा जेव्हां । स्वामीनीं तेव्हां कृपा केली ॥ १० ॥ आज्ञा घेवोनीया गेली मिरजेसी । पुढिल कथेसी भीम गाय ॥ ११ ॥ ७३

॥ **श्रीराम** ॥ येके दिसीं राजा आला दर्शनासी । करोनी नमनासी बैसलासे ॥ १ ॥ कल्याण गोसांवी भाव ज्यांचा निका । प्रातःकाळीं देखा स्नाना जावें ॥ २ ॥ दोंच घागरीचा गुंडा नित्य घ्यावे । गंगेवरी यावे किल्याखालीं ॥ ३ ॥ उर्वोशी हें नांव गंगेचें जाणावें । स्नान हें करावें स्वच्छ तेथें ॥ ४ ॥ प्रहर दिवसांत यावे स्वामीपासीं । ऐसा प्रतिदिवसीं नेम ज्यांचा ॥ ५ ॥ स्वामी स्नानपान त्यांतचि करिती । माझा भीम ह्मणती सर्वांत हा ॥ ६ ॥ रायानें पाहोनी ह्मणे दाळगपु । मनांत संकल्पु केला ऐसा ॥ ७ ॥ अंतरसाक्ष स्वामी जाणोनीया भाव । बोलावीले सर्व शिष्यवर्ग ॥ ८ ॥ ग्रन्थांतील खुणा पुसतां न कळती ।

मग विचारिती कल्याणासी ॥ ९ ॥ जें जें विचारीले तें तें सांगितलें । दाळगपु बोले कोण आतां ॥ १० ॥ कल्याण गोसांव्यां रायें नमन केलें । भीमें हें वर्णीलें अल्पज्ञानें ॥ ११ ॥ ७४

॥ **श्रीराम** ॥ आज्ञा घेवोनीया आला सातान्यासी । स्वामीचा मानसीं निजध्यास ॥ १ ॥ तेथें गागाभट्ट पंडितही श्रेष्ठ । शास्त्रामध्यें स्पष्ट जाणणारे ॥ २ ॥ रायापासीं येतां सन्मान करोनी । उत्तम आसनीं बैसवीले ॥ ३ ॥ दासबोध ग्रन्थ वाचिताहे राव । धरोनीया भाव आनंदानें ॥ ४ ॥ चौदा ब्रह्मांचेंचि निघालें प्रमेय । ऐकोनी विस्मय विप्र जाला ॥ ५ ॥ आपुल्या मनाऐसें कवित्व करिती । संत हा ह्मणती कोण आहे ॥ ६ ॥ राव ह्मणे स्वामी रामदास थोर । महिमा अपार न वर्णवे ॥ ७ ॥ आधारावाचोनी केलें कवित्वासी । जाऊं ह्मणे त्यांसी भेटावया ॥ ८ ॥ येतां स्वामीपासीं स्वामीच बोलती । बृहदारण्य-श्रुति येती तुह्मा ॥ ९ ॥ तेवढी मात्र मज येत नाहीं स्पष्ट । स्वामी घडघडाट ह्मणती ती ॥ १० ॥ तेंच टिपण त्यासी काढोनी दावीलें । गर्वहात केलें भीम ह्मणे ॥ ११ ॥ ७५

॥ **श्रीराम** ॥ स्वामीचरणावरी ठेविला मस्तक । मानवी मी रंक आहे ह्मणे ॥ १ ॥ तया अनुग्रह देउनीया भक्त । विद्याभिमानांत गेलो होतो ॥ २ ॥ दासबोध ग्रन्थ करी पारायण । सदा रामभजन करी-ताहे ॥ ३ ॥ आज्ञा घेवोनीया तोही गेल्यावरी । कैसी जाली परी तेही ऐका ॥ ४ ॥ वासुदेवबावा पंडित निस्पृह । तेणें शिष्य पाहे बहु केलें ॥ ५ ॥ कण्हेरीचा मठ प्रतापेंचि केला । स्वामीदर्शनाला यावें भावें ॥ ६ ॥ येकशे येकवीस पताका लावाव्या । महंतीचा यावा मोठा ज्याचा ॥ ७ ॥ सुखासनामध्यें स्वामींच्या पादुका । महंतीचा निका थाट असे ॥ ८ ॥ हाजारों हाजार शिष्यही जाहाले । मंत्रा पालटीले बुद्धि-बळें ॥ ९ ॥ स्वामीपासीं यावे तेरा दिवस रहावे । पुजेसी करावें नित्य

नवे ॥ १० ॥ आज्ञा घेवोनीया जावें आनंदानें । जाला अभीमान भीम ह्मणे ॥ ११ ॥

७६

॥ **श्रीराम** ॥ दिवाकर विप्र शिष्य होता त्यास । स्वामीच्या सेवेस ठेविलें त्या ॥ १ ॥ येके दिसीं त्यास जवळी बोलाऊन । ह्मणती सांग कोण मंत्र तुजा ॥ २ ॥ या मंत्राचा जप तुंवा न करावा । मूर्ख तेणें गोवा केला तुज ॥ ३ ॥ समर्थें तयासी दिला अनुग्रह । सर्वही समुदाय मिळाला तेथें ॥ ४ ॥ मिरजेहून वेणुबाई आली होती । पुढें कैसी ख्याती तेही ऐका ॥ ५ ॥ वासुदेवबावा कळलें वर्तमान । तेणें अंतःकरण खिन्न जालें ॥ ६ ॥ स्वामीद्रोही त्यासी मोक्ष न दे कोणी । तुष्टल्यावांचोनी गुरुराव ॥ ७ ॥ त्वरित निघोनी आले स्वामीपासीं । ह्मणती कृपा कैसी होय आतां ॥ ८ ॥ खोलीच्या बाहेरी येतां स्वामी वेगें । नमन साष्टांगें केलें येणें ॥ ९ ॥ स्वामी कांहीं उठ न ह्मणती त्यासी । निश्चय मानसीं केला येणें ॥ १० ॥ देह जावो परी उठणेंचि नाहीं । भीम ह्मणे पाही भक्ति ऐसी ॥ ११ ॥

७७

॥ **श्रीराम** ॥ सर्वांनीं प्रार्थना केली समर्थांची । परी ते कोणाची न ऐकती ॥ १ ॥ तीन अहोरात्र तैसाचि पडिलासे । कृपेमाजी असे हेत ज्याचा ॥ २ ॥ प्रातःकाळीं वेणुबाईनें उठोनी । तंबोरा घेवोनी भजन करी ॥ ३ ॥ करुणास्वरें केला अभंग भक्तीनें ॥ अष्टभाव पूर्ण येती तये ॥ ४ ॥

## अभंग वेणुबाईचा.

आह्मीं तुझी तुझी तुझी पावना ॥ ध्रु० ॥ सुष्ट हो दुष्ट कनिष्ठ कुजरी तरी ॥ १ ॥
भावी अभावी कुभावी कुजरी तरी ॥ २ ॥ हीन दीन अपराधी वेणीपरी ॥ ३ ॥

स्वामीनीं करुणा हे श्रवण केली जेव्हां । बोलीयले तेव्हां वेणुबाई ॥ ५ ॥ वेणु तुजवरी तुष्टलो मी पूर्ण । सांगसी तें जाण करीन मी ॥ ६ ॥ ऐकोनीया ह्मणे वासुदेव दीन । करावा पावन दयानिधी ॥ ७ ॥ येई घे-

वोनीया ह्मणतांचि उठिला । स्वामीनीं देखिला कृपादृष्टीं ॥ ८ ॥ तीर्थ देवोनीया ह्मणती या मंत्राचा । पालट त्वा साचा कां रे केला ॥ ९ ॥ अत:पर ऐसें न करावें तुवा । सर्वासी सांगावा मंत्र माझा ॥ १० ॥ तुझीया मंत्राच्या जपें अध:पात । बोधें जाला स्वस्थ भीम ह्मणे ॥ ११ ॥
७८

॥ **श्रीराम** ॥ आज्ञा घेवोनीयां गेले ते मठासी । वेणुही मिरजेसी गेल्यावरी ॥ १ ॥ स्वामीचे मानसीं आले येके दिवसीं । जावे चांफळासी ऐसा हेत ॥ २ ॥ कल्याण गोसांवी मठांत ठेवोनी । पोरे आणवोनी बोलीयले ॥ ३ ॥ बाराबलोत्याचीं मुलें नौल जाणा । सांगती कल्याणा सांभाळी यां ॥ ४ ॥ सन्निध असावें मागती तें द्यावें । आज्ञेसी मानावें आह्मा ऐसें ॥ ५ ॥ मान्य करोनीया लागले सेवेसी । स्वामी चाफळासी निघते जाले ॥ ६ ॥ आह्मासमागमें येऊं नका कोणी । येकटे निघोनी गेले पाहा ॥ ७ ॥ मार्गीं अस्तमान जाला ह्मणोनीया । ह्मणती खेड्यांत या राहूं आजी ॥ ८ ॥ जाळगेवाडी हें नाम होतें तेथें । स्वामी अकस्मात आले तेव्हां ॥ ९ ॥ शूद्र येक त्यासी न सांगोनी नांव । ह्मणती देसी ठाव तरी राहूं ॥ १० ॥ राहा ह्मणतां तेथें जावोनी बैसले । भजन प्रवर्तले भीम ह्मणे ॥ ११ ॥ ७९

॥ **श्रीराम** ॥ राम राम ध्वनी करीतांचि जाणा । शूद्रानें चरणा वंदीयलें ॥ १ ॥ माग ह्मणतांचि ह्मणे भरलें घर । द्वाड[1] हें साचार न ह्मणावें ॥ २ ॥ स्वामी ह्मणती तया ह्मणूं आह्मी हेंचि । ह्मणे सत्ता तुमची काय येथें ॥ ३ ॥ बोलतां बोलतां तया बोध जाला । वोळखी तयाला दिली मग ॥ ४ ॥ नेत्रीं अश्रुपात चरणावरी लोळे । दीन मी सांभाळ करा ह्मणे ॥ ५ ॥ तया अनुग्रह करोनी निघाले । चाफळासी आले रामापासीं ॥ ६ ॥ येक मास तेथें राहीले आनंदें । डुलती स्वानंदें अहिर्नीसीं ॥ ७ ॥ गणेश गोसांवी शिष्य येक होता । चतुर तत्वता बहु

---

१ द्वाड, उनाड.

**॥ श्रीराम ॥** राव आज्ञा काय विचारी स्वामीसी । ह्मणती त्या विप्रासी मुक्त करी ॥ १ ॥ करोनीया मुक्त वस्त्रें देववीलीं । तयासीही जाली भक्ती तेंव्हां ॥ २ ॥ आज्ञा मागोनीया राव गेला भावें । चरित्रें अभिनवें पुढें ऐका ॥ ३ ॥ धोत्रेंही स्वामींचीं वाळत घालिती । उडोनीया जाती कड्याखालीं ॥ ४ ॥ कड्यामध्यें झाड तेथेंच राहीलीं । शिष्यें येका दिल्हीं होती भावें ॥ ५ ॥ तया नेसों ह्मणून बोलीयले होते । त्यामुळें वाळत घालीताती ॥ ६ ॥ आणा धोत्रें ह्मणून सर्वां केली आज्ञा । परी जाववेना कोणा तेथें ॥ ७ ॥ कल्याण गोसांवी गेले कड्यावरी । टाकीयेली बरी उडी तेंव्हां ॥ ८ ॥ आणोनीया धोत्रें दिलीं गुरुराया । तेंव्हां कृपा तयावरी केली ॥ ९ ॥ वडील बंधूनीं पत्र पाठवीलें । स्वामीनीं वाचीलें आवडीनें ॥ १० ॥ भीम ह्मणे गंगाधरबावा नांव । पाठवीला भावें श्लोक येक ॥ ११ ॥ ८९.

॥ श्लोक ॥

लावण्य सौंदर्य तारुण्य नारी । चातुर्यता चंचळ चित्तहारी ॥
येकांत काळीं पडतां समंधु । अभिलाष न करी तो धन्य साधु ॥ १ ॥

**॥ श्रीराम ॥** ज्येष्ठांच्या श्लोकासी वाचीतां स्वामींनीं । विचारीती मनीं श्रेष्ठशिक्षा ॥ १ ॥ पत्राचें उत्तर लेहोनीया दिल्हें । तेंही निवेदीलें श्रोतयांसी ॥ २ ॥ योगाचा शेवट राम लावणार । ऐसा हा निर्धार केला शास्त्रीं ॥ ३ ॥ कामानें जिंकीलें सर्वांसी साचार । रामकृपा पार पाववील ॥ ४ ॥ ह्मणोनीया श्लोक येकचि लिहीला । अभीनव लीला वर्णवेना ॥ ५ ॥

॥ श्लोक ॥

स्वर्गांगनेसी जरि साम्य आली । परंतु तेथें दृष्टी न घाली ॥
निजात्मबोधें निःसंग रासी । परंतु आरण्यमिरास त्यासी ॥ १ ॥

पूर्णबोध रामकृपा जरी होये । तरी काम काय करील सांगा ॥ ६ ॥ रज्जु कळल्यावरी सर्पभय आहे । ऐसें ह्मणूं नये सूज्ञ जनीं ॥ ७ ॥ आत्मसाक्षात्कारीं स्त्रिया पुरुष नाहीं । ब्रह्मरूप पाही जग दीसे ॥ ८ ॥ ऐसेंही असतां प्रवृत्ती मार्गांत । भ्रष्टाकार होत नाहीं जाणा ॥ ९ ॥ परी वडीलांची शिक्षाही असावी । केली मान्य जीवीं धरोनीया ॥ १० ॥ जांबे पत्र गेलें वाचोनी पाहीलें । आनंद पावले भीम ह्मणे ॥ ११ ॥ ९०

**॥ श्रीराम ॥** केशवस्वामीनीं पत्र पाठवीलें । नमन लिहीलें साष्टांगेसी ॥ १ ॥ यावें दीनालागीं भेटी द्यावयासी । मुख्य पत्र त्यासी ऐका भावें ॥ २ ॥

**॥ वोव्या केशवस्वामींच्या ॥**

ॐ नमोजी सच्चिदानंदा । पदत्रयस्वरूपशुद्धा । वीजतरू उगवे रवेंदा[1] । स्वयें अमोदा परिमळसी ॥१॥ त्या स्वादामृताची चाखवटी । तूंचि रुचि तुझिये पोटीं । सुवोनी द्यावी भेटी । कृपादृष्टीं अवलोकन ॥ २ ॥ श्रीरामदासा प्रेमसखया । स्वानंदघना गुरुवर्या । केशवें विज्ञप्ती ल्याहावया । हेंचि कारण ॥ ३ ॥

ऐशा तीन वोव्या करोनीया जाण । पाठवील्या पूर्ण स्वामीपासी ॥ ३ ॥ स्वामींनीं पाहोनी दिधलें उत्तर । तेंही सवीस्तर ऐका भावें ॥ ४ ॥ ह्मणती पत्रापत्र आणि भेटीभेट । ह्मणूनी लिहीलें स्पष्ट पत्र ऐका ॥ ५ ॥ येक श्लोक करूनी पाठवीला पूर्ण । अर्थ ज्याचा गहन तोही ऐका ॥६॥

**॥ श्लोक स्वामींचा ॥**

पदातीत वाक्यार्थ शोधी समाधीं । क्षयातीत जो निर्विकल्पावबोधी ॥
जये ऊगमीं जन्म नाहीं तयासी । मिळे दास त्या संगमीं केशवासीं ॥ १ ॥

ऐसा श्लोक करूनी पाठवीला जाणा । संताचिया खुणा संता ठाव्या ॥७॥ केशव स्वामींनीं पत्र वांचोनीया । समाधीच तया लागलीसे ॥ ८ ॥ सम-

---

१ अरविंदा.

थांनीं येके दिसीं भावीयलें । बहु दिवस जाले येके स्थळीं ॥ ९ ॥ कांहीं दिवस जाऊं अरण्यांत राहूं । मग येथें येऊं ह्मणताती ॥ १० ॥ आज्ञा शिष्य समागमे घेवोनीया । निघाले जावया भीम ह्मणे ॥ ११ ॥ ९१

॥ **श्रीराम** ॥ गडाहूनी खालीं उतरले पाहीं । शिष्य होते तेही चालीयले ॥ १ ॥ कौतुक मार्गांत आले रंगनाथ । येकमेका होत दृष्टादृष्टी ॥ २ ॥ रंगनाथ संतराज योगाअंत । बखतर अंगांत दिव्य ज्यांच्या ॥ ३ ॥ पांचा हजाराचा घोडा गांडीखालीं । तिरकमठा जवळी हातीं असे ॥ ४ ॥ हुदेदार पुढें धांवत चालीती । चवरीवरी उडती अबदागिरी ॥ ५ ॥ पाहोनी स्वामीसी उडीच टाकीली । तेव्हां हे जवळी आले जाणा ॥ ६ ॥ मारुतीच आजी भेटला ह्मणून । करितांची नमन आलिंगीले ॥ ७ ॥ उभयतांचें पोटीं आनंद अद्भुत । संवादही होत प्रीति करूनी ॥ ८ ॥ अनिर्वाच्य बोल बोलीलें जें काये । सांगतांचि नये अल्पमती ॥ ९ ॥ जें जें स्थूळमानें बोलीले विनोदें । तें मात्र आनंदें सांगेन मी ॥ १० ॥ यशवंतसुत संताच्या कीर्तनें । सुखी जाला मनें काया वाचा ॥ ११ ॥ ९२

॥ **श्रीराम** ॥ स्वामी ह्मणती तया तिरकमठा आहे । पराक्रम काय पाहूं बरे ॥ १ ॥ घार आकाशांत घेताहे मंडळें । तयासी पाहीले अकस्मात ॥ २ ॥ ह्मणती या घारेसी विंधोनी पाडावें । पराक्रम दावावे कैसा आहे ॥ ३ ॥ ऐकतांचि तेव्हां विंधोनी पाडीली । निर्जीव जाहाली तेच क्षणीं ॥ ४ ॥ स्वामी ह्मणती मोठा पराक्रम केला । आतां पक्षी मेला उठवावा ॥ ५ ॥ तुमचें काय केलें यानें वेर्थ घात । केला या त्वरित जीववावें ॥ ६ ॥ स्वामीस बोलीले तुमचें हें सामर्थें । उठवाल सत्य तुह्मीच या ॥ ७ ॥ ऐकतांचि ऐसें स्वामीनीं त्या वेळे । पक्षा उचलीले अकस्मात ॥ ८ ॥ कुरवाळोनी ह्मणती उडोनीया जावें । गगनांत फिरावें पूर्ववत ॥ ९ ॥ उडोनीया पक्षी होता तैसा गेला । अभिनव

जाला महिमा पाहा ॥ १० ॥ कटीबंद स्वामीवरी केला त्यांनीं । भीम ह्मणे कानीं तोही ऐका ॥ ११ ॥ ९३

## ॥ कटीबंद रंगनाथ स्वामींचा ॥

रामदास चतुराक्षरि मंत्र जप वारंवार । दुस्तरतर भवसागरतारक सच्चित् सुख सार ॥ ध्रु ॥ रामदास द्वय अभिन्न नामें गोडी शर्करा । राह्राटे परिमळ भुवनीं ह्मतीं घेतां कर्पूरा । राजती वर्तुळशा त्या परी त्या जीवन कीं गारा । राजाधिराज अवतरला या या जगदोधारा ॥ १ ॥ मनुष्यवेषें विलसे परि हा परिपूर्ण काम । मकराकृति कुंडलें पाह्मतां केवळ तें हेम । मंडण संतसभेचें साधुमुनिजनविश्राम । मस्तकमणि हा शतकोटीचा निजगुज सुखधाम ॥ २ ॥ दास तो उदास सेउनि परमामृतकंदा । दाता स्वात्मसुखाचा निरसुनि विषयाचा धंदा । दानवकुळ षड-वैरी मर्दुनि तारित मतिमंदा । दारा द्रव्य त्यजुनिया सत्वर सद्भावें वंदा ॥ ३ ॥ सद्गु-रुराज विराजत करूनी सज्जनगिरिवास । सर्वस्वेंसी शरण रिघावें धरूनिया कास । सत्य सनातन श्रीगुरु समर्थ मुनिमानसहंस । सहजपूर्ण निजरंगिं रंगला तारक विश्वास ॥ ४ ॥ ध्रु ॥

**॥ श्रीराम ॥** ऐशा स्तवनासी करोनी नमन । करितां स्वामी जाण बोलीयले ॥ १ ॥ समागम जाणा करावा जैशाचा । तैसाचि तो साचा होय पाहा ॥ २ ॥ भाग्याची संगती धरितां होय भाग्या । सेवितां अभाग्या होय तैसा ॥ ३ ॥ उदकामाजी जैसा रंग मेळवावा । तद्रुप पाहावा होय जी ते ॥ ४ ॥ अथवा वनस्पतिमाजीही तैसेंचि । स्वछता तयाची तेथें जाये ॥ ५ ॥ तैसें हें मानस लावावें ज्या संगीं । तेंचि होय वेगीं ऐसें आहे ॥ ६ ॥ भल्याच्या संगतीं भलाचि होतसे । दुष्टसंगें वसे बुद्धि तैसी ॥ ७ ॥ भिल्लाचे संगतीं वाल्हा भिल्ल जाला । हिंसक तो भला तयाहूनी ॥ ८ ॥ नारदाचा जेव्हां जाला समागम । संतांत उत्तम ऋषी जाला ॥ ९ ॥ शतकोटी पाहा केलें रामयण । जालीया श्रवण मोक्ष होय ॥ १० ॥ यशवंतसुत संतांचा अंकित । ह्मणोनी हे गात संतलीला ॥ ११ ॥ ९४

॥ श्रीराम ॥ स्वामी ह्मणती तया संत पूर्णज्ञानी । ब्रह्मनिष्ठपणीं सुखी सदा ॥ १ ॥ जगासी तारावे हांचि धंदा त्यांसी । दाविती दिक्षेसी आचरोनी ॥ २ ॥ कुसंगेंही तया न बाधेचि पूर्ण । परी होय जन भ्रष्ट ह्मणूनी ॥ ३ ॥ जना नाहीं ज्ञान कर्मभ्रष्ट होती । यालागी दाविती आचरोनी ॥ ४ ॥ संता माळ जप कर्मा नाहीं काम । सर्वदा आराम सस्वरूपीं ॥ ५ ॥ ऐसेही असोनी कीर्तन भजन । तारक तें जाण जाले ऐसे ॥ ६ ॥ कर्मे अंतःकरण शुद्ध होय मग । तेव्हां ज्ञानयोग सांगती त्या ॥ ७ ॥ येन्हवी हे देहे नाहीं जया होय । भोग त्याग काय तया आहे ॥ ८ ॥ ऐकोनीया ऐसें स्वामीचें वचन । समाधानें जाण काय केलें ॥ ९ ॥ धनुष्यबाणासी ठेवियलें पायीं । हस्तीं माळ पाही घेते जाले ॥ १० ॥ अद्भुत त्या वेळीं जाहाला संवाद । भीम मतीमंद काय वर्णी ॥ ११ ॥ ९५

॥ श्रीराम ॥ तेथोनीया स्वामी निघोनी चालीले । अरण्यांत गेले कौतुकार्थ ॥ १ ॥ शिष्य पाठीमागे भजन करीत । चालता पर्वत पुढें आला ॥ २ ॥ स्वामी तेव्हां नीट चढोनीया गेले । हेही चालीयले हाळु हाळु ॥ ३ ॥ दोन प्रहर जाले क्षुधेनें व्यापीले । स्वामी पुढें गेले गिरीवरी ॥ ४ ॥ स्वामीसही क्षुधा लागतांचि तेथें । देवालय होतें नीनाईचें ॥ ५ ॥ तेथें येवोनीया मारीयली हाक । अतीत हा भुकें जात आहे ॥ ६ ॥ आश्रम करोनी तरीच बैसावे । क्षुधिस्तासी द्यावें भक्षाबया ॥ ७ ॥ ऐकतांचि देवी बोलीयली स्वामी । मार्ग पाहाते मी यावे अंत ॥ ८ ॥ पाईच्या पैजारा बाहेर ठेवोनी । गेले तेच क्षणीं देवाल्यांत ॥ ९ ॥ होवोनी प्रगट पूजा करी देवी । धन्य जाले भावी मनामाजी ॥ १० ॥ मागोनीया शिष्य येती श्रमयुक्त । बाहेर बैसत भीम ह्मणे ॥ ११ ॥ ९६

॥ श्रीराम ॥ पैजारा स्वामीच्या घेवोनी जवळी । बहु क्षुधानळीं व्याप्त जाले ॥ १ ॥ कवाड उघडोन स्वामी येती जेव्हां । शिष्य

सर्व तेन्हां पाहातातीं ॥ २ ॥ सुगंध्येले केश दैदिप्य दिसती । त्रिपुंड पाहाती भाळीं पूर्ण ॥ ३ ॥ केशरी गंधाची उटी सर्वांगासी । पाहाती माळासी कळा दिव्य ॥ ४ ॥ तांबूल मुखांत आहे सुगंधीत । गजरेही हातांत शोभताती ॥ ५ ॥ ऐसें ध्यान पाहातां आनंद शिष्यासी । केलें नमनासी दंडप्राय ॥ ६ ॥ स्वामी ह्मणती जा रे देवालयाआंत । जाला श्रमयुक्त बहुसाल ॥ ७ ॥ ऐकतांचि गेले देवालयाआंत । पाहाती तों तेथ सर्व आहे ॥ ८ ॥ आनंद करोनी भक्षिती सर्वही । गंधे माळा तेही घेते जाले ॥ ९ ॥ तृप्त होवोनीया बाहेर पातले । स्वामीही निघाले पुढें जाया ॥ १० ॥ समुद्रस्नानासी करोनीयां आले । कोंकण पाहीलें भीम ह्मणे ॥ ११ ॥

९७

॥ **श्रीराम** ॥ रानांत कानटें मनुष्यें रानटें । झाडींतचि वाट अल्पमात्र ॥ १ ॥ स्त्रियां अल्प सुडके पुरुष बोडके । मुरे जाणा निके ह्मणती त्या ॥ २ ॥ पशुवत सर्व होते तया भक्ति । लावोनी निगुती निवते जाले ॥ ३ ॥ सज्जनगडासी आले स्वछंदानें । येती सर्व जन नमनासी ॥ ४ ॥ पुढें तुकाराम येती यांचे भेटी । तेही नवल गोष्टी ऐका भावें ॥ ५ ॥ वाद्य लावोनीया सन्मानें आणिले । आलिंगन दिल्हे गुरुरायें ॥ ६ ॥ तयासी बिऱ्हाड दिलें दुजे स्थानीं । सर्वांचिया मनीं होतें ऐसें ॥ ७ ॥ कीर्तन ऐकावें त्यांचें कैसें आहे । समारंभ पाहे केला रात्रीं ॥ ८ ॥ तुकारामाच्याही मनांत स्वामींचें । कीर्तन हें साचे ऐकावेसें ॥ ९ ॥ जाणोनीया स्वामी ह्मणती कथा आधीं । उभे राहूं संधी येतां तेची ॥ १० ॥ तुकारामा बोलावया पाठवीलें । शिष्यासी धाडीले भीम ह्मणे ॥ ११ ॥

९८

॥ **श्रीराम** ॥ मशाल घेवोनी गेले बोलवाया । चला ह्मणती तया कीर्तनासी ॥ १ ॥ तुमचें कीर्तन ऐकावें ह्मणोन । स्वामीही येवोन बैसलेती ॥ २ ॥ तुकारामें शिष्य मशाल पाहोन । ह्मणती आह्मी जाण येत नाहीं ॥ ३ ॥ जावोनीया तेन्हां सांगती स्वामीसी । हे उभे पाठीसी

तयांच्याची ॥ ४ ॥ कीर्तनासी उभे राहाती येवोनी । विठल ह्मणोनी हाक दिली ॥ ५ ॥ स्वामी ह्मणती आह्मी करितो कीर्तन । आपण श्रमोन आला आजी ॥ ६ ॥ तुकाराम ह्मणती माझा अधिकार । शिष्यांत साचार मोजावा जी ॥ ७ ॥ करितां कीर्तन नेत्रीं अश्रुधारा । रोमांच शरीरावरी येती ॥ ८ ॥ येक प्रहर कथा करोनी नमन । स्वामीलागी जाण केलें भावें ॥ ९ ॥ स्वामी तेव्हां कीर्तनासी उभे राहाती । बोधें सर्व होती तृप्त तेव्हां ॥ १० ॥ उभयांसी आनंद जाला न वर्णवे । भीम गाय भावें संतलीला ॥ ११ ॥ ९९

॥ **श्रीराम** ॥ तीन दिवस तेथें राहोनी आज्ञेसी । घेऊनी पंढरीसी जाते जाले ॥ १ ॥ वामन गोसावी दर्शनाचा हेत । धरोनीया तेथ आले पाहा ॥ २ ॥ दृष्टादृष्टी होतां नमनें आलिंगनें । जालीं जाण पूर्ण तये वेळीं ॥ ३ ॥ कौतुकार्थ येकमेकासी बोलीले । अर्थ हा सखोल आहे त्याचा ॥ ४ ॥ स्वामी तयालागी ह्मणती ये वृषभा । आलो आहे उभा महिषा पाहे ॥ ५ ॥ विष्णु आणि शिव अर्थ ऐसा याचा । संवाद उभयांचा जाला मग ॥ ६ ॥ संतोष पावोनी वामन गोसांवी । श्लोक केला जीवीं भावयुक्त ॥ ७ ॥

॥ **श्लोक** ॥

शुकासारिखें पूर्ण वैराग्य ज्याचें । वसिष्ठापरी ध्यान योगीजनाचें ॥
कवी वाल्मिकासारिखा मान्य ऐसा । नमस्कार माझा तया रामदासां ॥ १ ॥

ऐसें स्तव करूनी आज्ञेसी वंदोनी । जाते जाले मनीं आनंदानें ॥ ८ ॥ शिष्यसमुदाव जेथें नित्योछव । स्वामीचरणीं भाव सर्वांचाही ॥ ९ ॥ सद्गुरुनिष्ठेची कथा पुढें रम्य । स्वामीचा अगम्य भाव आहे ॥ १० ॥ येथोनी जाहाले शंभर अभंग । पुढील प्रसंग भीम गाये ॥११॥ १००

॥ **श्रीराम** ॥ स्वामीपासीं शिष्यमंडळी बहुत । कीर्तन करीत नित्य येक ॥ १ ॥ तेरा ग्रन्थ तेव्हां लहान लहान केले । स्वहस्तें

लिहिले होते पाहा ॥ २ ॥ कल्याण गोसावी जवळी बोलावोन । ह्मणती हें लिहिणें स्वस्थ चित्तें ॥ ३ ॥ शिरगांवासी जावे येक मास राहावें । मग जाणा यावें दर्शनासी ॥ ४ ॥ लघु ग्रन्थ यांचीं नामेंही ऐकावीं । श्रवणमात्रें गोवी निरसे जाणा ॥ ५ ॥ आत्माराम ऐसें प्रथमाचें नाम । दुजाही उत्तम पूर्वारंभ ॥ ६ ॥ तिजा अंतर्भाव आवघा ब्रह्मरस । जुनाटपुरुष चौथा ऐसा ॥ ७ ॥ सगुणध्यान हें नाम पांचव्याचें । ऐश्वर्य रामाचें वर्णियलें ॥ ८ ॥ निर्गुणध्यानांत अनुभव पाहा । ऐसे जाले साहा ग्रन्थ जाणा ॥ ९ ॥ पंचसमासी हा सप्तम जाणावा । वाचितांचि जीवा सुख होये ॥ १० ॥ सप्तसमासी तो अष्टम प्रसिद्ध । आवघा ज्ञानबोध भीम ह्मणे ॥ ११ ॥ १०१

॥ **श्रीराम** ॥ येकविसी हें नाम प्रसिद्ध नवम । जाणावा दशम अष्टाक्षरी ॥ १ ॥ येकादश षड्रिपूंचेंचि रूप । करोनिया बापा दावीयलें ॥ २ ॥ द्वादशांत राजधर्म निवेदीला । क्षात्रधर्म भला त्रयोदश ॥ ३ ॥ ऐसे त्रयोदश ग्रन्थ हे उत्तम । जयांत अध्यात्म प्रगट केलें ॥ ४ ॥ आज्ञा होतां गेले घेवोनी मठासी । लिहीती मानसीं धरोनीयां ॥ ५ ॥ मागें स्वामीपासीं मंडळी बहुत । शिष्य मी ह्मणत आपणासी ॥ ६ ॥ जे ते आपुल्या मनीं ह्मणती आह्मी थोर । स्वामीनीं विचार केला तेव्हां ॥ ७ ॥ सर्व गर्वहात करूं येकदाची । यांचीया चित्ताची खातरची ॥ ८ ॥ सत्यभामा गरुड आणि यादवासी । गर्व होता त्यासी कैसें केलें ॥ ९ ॥ आणोनी मारुती निर्दाळीला गर्व । कृष्ण रामराव जाले होते ॥ १० ॥ दर्शनाचा लाभ मारुतीसी दिला । निगर्वता जाला भाव सर्वां ॥ ११ ॥ तैसें कांहीं आतां कौतुक करोनी । भीम ह्मणे नयनीं दाऊं ह्मणती ॥ १२ ॥ १०२

॥ **श्रीराम** ॥ साताऱ्यासी राव होता तो स्वामीसी । निघे भेटायासी येके दीनीं ॥ १ ॥ तयापासीं असिलता होती जाणा । रायासी

१ घोटाळा.

ते प्राणाहूनी प्रीय ॥ २ ॥ तीन शतें होन देवोनी घेतली । करामत भली तयेमध्यें ॥ ३ ॥ लोहाच्या पाहारेचे टुकडेच करावे । युक्षदंडभावें जयांपरी ॥ ४ ॥ येके दिसीं मोठा वृक्ष बुडखा त्यासी । हाणीतांचि तैसी निघोन गेली ॥ ५ ॥ राव ब्राह्मणासी पुसे स्वामीपुढें । ठेवावे निवाडे काय सांगा ॥ ६ ॥ विप्र ह्मणे तुह्मा अत्यंत आवडे । तोंचि स्वामीपुढें ठेवा आजी ॥ ७ ॥ आला किल्यावरी स्वामीदर्शनासी । पुढें त्या खड्गासी ठेवीयेलें ॥ ८ ॥ दंडप्राय नमन करोनीया आज्ञा । घेवोनीया जाणा गेल्यावरी ॥ ९ ॥ स्वामी ह्मणती मनीं निश्चय शिष्याचा । पाहों बरे साचा कोण आहे ॥ १० ॥ सुखाचे सांगाती अवघेच आहेती । परी माझा साथी आहे कोण ॥ ११ ॥ अवघेच तनमन करिती अर्पण । भीम ह्मणे खूण पाहाती स्वामी ॥ १२ ॥ १०३

॥ **श्रीराम** ॥ येके दिसीं केलें कौतुक तें ऐका । भाव पाहाती निका सच्छिष्यांचा ॥ १ ॥ असिलता नग्न घेवोनी हातांत । कोणा न कळत खोलींतची ॥ २ ॥ मळवट कुंकुमें भरला जाणा पूर्ण । कोपीन हें जाण वस्त्र मात्र ॥ ३ ॥ अकस्मात आले बाहेर ते वेळीं । दिधली आरोळी दीर्घ घोषें ॥ ४ ॥ जोतें होतें उंच तयाखालीं उडी । बोलाची परवडी अन्नोविन्न ॥ ५ ॥ पुढें येईल त्यासी जीवेंचि मारीन । ह्मणोनी गर्जोन बोलताता ॥ ६ ॥ प्रातःकाळीं नेम होता कोण कोणा । पायांवरी जाणा नमन रीती ॥ ७ ॥ तयेवेळीं तेचि दुरून पाहाती । मंत्रचळ ह्मणती स्वामीलागी ॥ ८ ॥ येक घडी वाट पाहिली परी कोणी । न येती निर्वाणीं पळुनी जाती ॥ ९ ॥ जीवावरी कोणी उदार होईल । तरी माझें जाईल ह्मणती वेड ॥ १० ॥ संज्ञेनेंचि सर्व बोलोन दावीती । भीम ह्मणे चित्तीं धैर्य व्हावें ॥ ११ ॥ १०४

---

१ तऱ्हा.

॥ **श्रीराम** ॥ घडीभरी वाट पाहोनी निघाले । किल्यावरून खालीं उडी दिली ॥ १ ॥ गेले ब्रह्मारण्या मारीतचि हाका । ब्रह्मांड-नायका आळविती ॥ २ ॥ सर्वत्र ह्मणती काय जाले पाहा । मंत्रचळ माहा जाला आहे ॥ ३ ॥ उधोपानस्यानें पत्र लिहीलें राया । वेड लागोनीया स्वामी गेले ॥ ४ ॥ वाचितांची राया नेत्रीं आले अश्रु । ह्मणे हें सद्गुरु काय केलें ॥ ५ ॥ कैसी लीला केली न कळे आह्मा जीवा । उपोषणें तेंव्हां आरंभीलीं ॥ ६ ॥ अनुष्ठाना विप्र बहुत धाडिले । माहा माहा स्थळें पाहोनीया ॥ ७ ॥ आपणही केलें तेंव्हां वर्ज अन्न । दुध मात्र प्राणरक्षणासी ॥ ८ ॥ शिरगावांत होते कल्याण गोसांवी । सर्वकाळ जीवीं हेत हाचि ॥ ९ ॥ केंव्हां मास सरे जाऊं स्वामीपासीं । संपूर्ण ग्रन्थासी लेहोनीया ॥ १० ॥ गुरुभक्तांच्या ह्या कथा रम्य गोड । गातां पुरे कोड भीम ह्मणे ॥ ११ ॥ १०५

॥ **श्रीराम** ॥ यांस येक आला ब्राह्मण तयानें । कथिलें वर्तमान तेंही ऐका ॥ १ ॥ ह्मणे स्वामी तुमचे वेड लागोनीया । गेले फिरावया अरण्यांत ॥ २ ॥ ऐकोनी ह्मणती काय हें बोलसी । त्यांचीये लीलेसी न जाणतां ॥ ३ ॥ कोणीच सन्नीध नाहीं गेले काये । तरी कैसा देह अर्पियला ॥ ४ ॥ इतुके जाले परी कोणासी मारीले । ऐसें सांग वहिलें मजपासीं ॥ ५ ॥ काय करूं मज आज्ञा नाहीं ह्मणून । राहीलों गुंतोन मासभरी ॥ ६ ॥ विप्र गेला पुढें मासही जाहाला । स्वामीदर्शनाला चालीले हे ॥ ७ ॥ सज्जनगडासी येवोनी पाहाती । सर्व श्रमी होती स्वामीसाठीं ॥ ८ ॥ कल्याण गोसांवी गेले कीं हो स्वामी । तयावीण आह्मी दीन जालो ॥ ९ ॥ ह्मणती स्वस्थ असा आणितो स्वामीसी । भरवसा मानसीं असों द्यावा ॥ १० ॥ नका जाऊं तुह्मी फुकट मराल । स्फुंदती सकळ भीम ह्मणे ॥ ११ ॥ १०६

॥ **श्रीराम** ॥ ह्मणती स्वामीहस्तें मृत्य जरी होये । इतुकें पुण्ये काय आह्मापासीं ॥ १ ॥ आज गुरुवार दर्शन घेईन । पहिलेच अर्पण

केले देह ॥ २ ॥ ज्याचे त्यासी देता संकोचे कां व्हावें । संतोषानें द्यावें हेंचि भलें ॥ ३ ॥ त्यांचे देहे त्यांसी करीन अर्पण । करूत ते जाण कळे तैसें ॥ ४ ॥ बोलोनीया ऐसें सत्वर निघाले । किल्याखालीं आले अकस्मात ॥ ५ ॥ झाडी रान होतें निबिड तयांत । स्वामी तेथें होते आनंदानें ॥ ६ ॥ मास येक वाट बंदचि जाहाली । कोणी दऱ्या जवळी न जातीच ॥ ७ ॥ मनुष्यांनीं पाहा दराचि सोडीला । मास येक जाला ऐसीयासी ॥ ८ ॥ कल्याण गोसांवी पुसती तयासी । आमुच्या स्वामीसी सांगा कोणी ॥ ९ ॥ सांगतांचि मार्ग चालीले निर्भय । ह्मणतीं गुरुमाय भेटे कहीं ॥ १० ॥ पर्वताचा कडा अद्भुत तयांत । मध्येंच बैसत भीम ह्मणे ॥ ११ ॥ १०७

॥ **श्रीराम** ॥ वरता दोन भाले खाले बहु खोल । मध्येंच सरळ वृक्ष होता ॥ १ ॥ पायरीचा वृक्ष पाल्याच्या झुबक्यांत । तेथें स्वामीनाथ बैसलेती ॥ २ ॥ मळवट कपाळीं जैसा आहे तैसा । टवटवीत दशा होती तैसी ॥ ३ ॥ तांबुल मुखांत आनंदभरीत । कल्याणाची तेथ दृष्टी गेली ॥ ४ ॥ नग्न असिलता झळकली हातांत । पाहातांची तेथ नमन केलें ॥ ५ ॥ स्वामीचीही दृष्टी गेली यांजवरी । ह्मणती हा मुळारी आला आतां ॥ ६ ॥ दिली तेव्हां हाक ह्मणती कां येतोसी । जीवेंचि मरसी जाये मागें ॥ ७ ॥ ऐकोनी नमन केलें दंडवत । उठोनी चालत त्वरें त्वरें ॥ ८ ॥ अकस्मात तेव्हां आरोळी मारोन । पर्वताग्रीं जाण गेले वेगें ॥ ९ ॥ पर्वतावरुते हेही चालीयले । दुरोनी देखीलें भव्यरूप ॥ १० ॥ पुन्हां तेथें नमन केलें दंडवत । प्रेम हे अद्भुत भीम ह्मणे ॥ ११ ॥ १०८

॥ **श्रीराम** ॥ स्वामी पाहातातो निशंकचि येतो । भयाचा मनांत लेश नाहीं ॥ १ ॥ बहु हाक देती तेथें नमस्कार । चालीतचि त्वरें चालीयले ॥ २ ॥ स्वामी ह्मणती कां रे नको ह्मणतां येसी । उदार जालासी जीवदशे ॥ ३ ॥ असिलता हातीं होती ते ठेवीली । मग कैसी

केली विचारणा ॥ ४ ॥ दोहीं हातीं दोन धोंडे घेवोनीया । टाकिताती तयावरी पाहा ॥ ५ ॥ बहुतचि धोंडे टाकीयले परी । येक अंगावरी न पडेचि ॥ ६ ॥ येतांचिं जवळी खड्ग उचलीलें । अद्भुतचि केलें नवल पाहा ॥ ७ ॥ धांवोनीया जवळी आले अकस्मात । पागोटें पाडीत मस्त-कीचें ॥ ८ ॥ वामहस्तें शेंडी धरोनीया नेटें । वांक ह्मणती मोठें केलें अंग ॥ ९ ॥ जितुकें वांकवीती तितुकेंच वांकती । मारूं आतां ह्मणती याच क्षणीं ॥ १० ॥ स्वामीहस्तें मृत्य होईल ह्मणून । प्रेम आलें पूर्ण भीम ह्मणे ॥ ११ ॥ १०९

**॥ श्रीराम ॥** असिलता सव्य हस्तांत घेवोन । मानेसी लावोन मारूं ह्मणती ॥ १ ॥ इतुक्यांत शब्द येक बोलीयले । जाहाले नवल तेंही ऐका ॥ २ ॥ येका घायामध्यें स्वामी मुक्त करा । मानीतो मी बरा सुख यांत ॥ ३ ॥ स्वामी ह्मणती वरें मानीयलें सुख । मज काय देख त्वरा आहे ॥ ४ ॥ आतां मी आउट घेतो स्वस्थ चित्तें । येका घायें मातें तुटसी कैसा ॥ ५ ॥ मोठी मान येथें करोनी आलासी । नको ह्मणतां येसी धटपणें ॥ ६ ॥ आतां घेतों सेज हळु हळु स्वस्थ । झालासी तूं मस्त शिष्यामाजी ॥ ७ ॥ मग मौन धरूनी राहिले ते वेळीं । स्वामींनीं हालवीली असिलता ॥ ८ ॥ मानेवरी ठेवितां ती क्षण क्षणा । तों तों यांच्या मना आनंदचि ॥ ९ ॥ दृढनिश्चयाचें बळ पाहोनीयां । आली गुरुराया दया पूर्ण ॥ १० ॥ असिलता तेव्हां हस्तीची टाकीती । आलिंगन देती भीम ह्मणे ॥ ११ ॥ ११०

**॥ श्रीराम ॥** नेत्रीं अश्रुधारा सद्गदीत कंठ । बोलीयले स्पष्ट तेंही ऐका ॥ १ ॥ सर्व भातखाऊ मिळालेत सारे । सुखाचे सोयरे आहेत कीं ॥ २ ॥ आह्मा मात्र चळ जाला ह्मणताती । तूं येक निभ्रांती देखीलासी ॥ ३ ॥ माझीये कृपेचा तूंचि अधिकारी । येर वेषधारी जाण बापा ॥ ४ ॥ तांब्या घागरीनें उदक सांठविती । समुद्र न घेती साठऊन ॥ ५ ॥ त्यास येक जाला अगस्तीच मात्र । सुखाचेंचि पात्र

तेणें केलें ॥ ६ ॥ तैसी गुरुकृपा आधीं करा ऐसी । घेती परी गुरुसी न सांठवे ॥ ७ ॥ सद्गुरुसी गिळावें तेव्हां गुरु व्हावें । जीवित्व वेंचावें लागे बापा ॥ ८ ॥ कल्याणारे स्वामीपण माझें सारें । तुझे ठाई बारे असो आतां ॥ ९ ॥ तुझें आणि माझें ऐसें आहे द्वैत । जावो बा समस्त आजीहूनी ॥ १० ॥ मस्तकीं हस्तक ठेवोनीया बोध । केलासे अगाध भीम ह्मणे ॥ ११ ॥

१११

॥ **श्रीराम** ॥ ब्रह्मबोध तेव्हां लाधला संपूर्ण । कृपेचें महिमान बोलवेना ॥ १ ॥ विष खातां जैसा मृत्यही तत्काळ । अमृतें केवळ अमर होय ॥ २ ॥ तैसी अवकृपेमाजी अधोगती । कृपेमाजी मुक्ती तैसी जाणा ॥ ३ ॥ जीवित्व धरोनी ब्रह्म व्हावें ऐसें । न घडे विश्वासें जाण बापा ॥ ४ ॥ वारंवार देती आलिंगन प्रेमें । प्राप्ती हे निःसीम जाली तेव्हां ॥ ५ ॥ मग स्वामीलागी बोलीलें वचन । सर्वांसी दर्शन द्यावें आतां ॥ ६ ॥ भोळ्याभाविकांसी ताराया अवतार । भाग्य अमुचें सार ह्मणोनीया ॥ ७ ॥ अपुल्या वियोगें सर्व दुःख जालें । अन्न हें वर्जिलें कोणी कोणी ॥ ८ ॥ जैसा मथुरेसी कृष्ण गेल्यावरी । गोकुळांत परी जाली होती ॥ ९ ॥ तैसें समस्तांसी वियोगें जाहालें । चालावें वहीलें येच क्षणीं । ॥ १० ॥ घेवोनी स्वामीसी आले आनंदानें । भीम गाय मनें दास त्यांचा ॥ ११ ॥

११२

॥ **श्रीराम** ॥ सज्जनगडासी येतां मार्गीं स्नान । करावें ह्मणोन इच्छा जाली ॥ १ ॥ कल्याणारे येथें करी स्वैंपाकासी । नैवेद्य रामासी दाऊं येथें ॥ २ ॥ झोळी होती काखे त्यांत सर्व सिद्धि । नैवेद्याची विधि संपादीली ॥ ३ ॥ उभयांनीं तेथें करोनी भोजन । मग आले जाण किल्यावरी ॥ ४ ॥ समस्तांसी जाला आनंद अद्भुत । नमनासी येत सर्व तेव्हां ॥ ५ ॥ तये वेळीं येक पद केलें त्यांनीं । तेंही ऐका कानें भावयुक्त ॥ ६ ॥ रावही दर्शना आला भावयुक्त । पडे दंडवत पायांवरी ॥ ७ ॥ स्वामीलागी ह्मणे कल्याण गोसांवी । कोठें पाय जीवीं

धरूं त्यांचे ॥ ८ ॥ पाहातांचि तया नमन केलें प्रेमें । ह्मणे आह्मा राम दावीयला ॥ ९ ॥ वंशामाजी येक जाला भगीरथ । आह्मा समस्तांत तैसे तुह्मी ॥ १० ॥ भीम ह्मणे रायें धरीयले पाय । पुढील प्रमेय ते-ही ऐका ॥ ११ ॥ ११३

॥ पद स्वामींचें ॥

पळा पळा ब्रह्मपिसा येतो जवळीं । रामनामें हाक मारूनी डोई कांडोळी ॥
वृत्ति शेंडी बंधनवीण सदा मोकळी । संसाराची धुळी करोनी आंगीं उधळी ॥ १ ॥
मीपणाचें शहाणपण जळालें माझें । कोण वाहे देहबुद्धिवस्त्राचें वोझें ॥
नलगे आह्मा मान अभिमानाचें दुजें । तुझी शुद्धि घेतां नुरे मीपण हें माझें ॥ २ ॥
प्रपंच उकिरड्यावरी बैसणें त्याचें । भौंता पाळा पडोन पाहे जन अविद्येचें ॥
देखोनी धांवे उठोनी पळे जन दृश्य वाटेचें । अदृश्याचें रान घेतां न चले कोणाचें ॥ ३ ॥
औट हात गजे नवा ठाईं वितुळलें । दाहावा ठाव होता तेथें ठींगळ दीधलें ॥
ऐसें मन तेंही निवृत्तींत गुंतलें । परतूनी आलें ह्मणोनीयां जीवें मारिलें ॥ ४ ॥
आह्मी जन धड देखुनी चार करितों । पिसा आपणा ऐसा देखुनी उमज धरीतो ॥
आतें भेटों येती त्या वेड लावीतो । रामीरामदास ऐसें अबद्ध बोलतो ॥ ५ ॥

॥ **श्रीराम** ॥ ऐसें पद केलें सर्वांनीं ऐकीलें । मन आनंदलें तये वेळीं ॥ १ ॥ मिरजे वेणुबाई होती ते दर्शना । आली तिचें जाणा प्रेम मोठें ॥ २ ॥ तिचे भक्ति ऐसी भक्ती नाहीं कोठें । ध्यान तीचें मोठें कोणा नये ॥ ३ ॥ ऐक्यभाव दृढ असे स्वामीपाईं । भक्तीची नवाई काय सांगूं ॥ ४ ॥ आली स्वामीपासीं ध्यास अहिर्निसीं । पाईं मस्तकासी ठेवीयलें ॥ ५ ॥ मार्गीं जाले श्रम पर्जन्य लागला । श्रम हा जाहाला बहुसाल ॥ ६ ॥ मनीं ह्मणे आतां येणें जाणें पुरे । स्वामीपदीं स्थीर होऊं आतां ॥ ७ ॥ वाटेचा वृत्तान्त सर्व निवेदिला । स्वामींनीं ऐकीला मनोभावें ॥ ८ ॥ ह्मणती वेणे बहु श्रम जाले तुज । दया आली मज ऐक आतां ॥ ९ ॥ घरींच पाऊस लागला पाहून । क

आलीस जाण मरावया ॥ १० ॥ ऐकतांचि नेत्रीं लागलें पाझर । आला प्रेमपूर भीम ह्मणे ॥ ११ ॥ ११४

॥ **श्रीराम** ॥ ह्मणे स्वामी हेचि इच्छा आहे मज । हेंचि द्यावें आज कृपादान ॥ १ ॥ स्वामी ह्मणती ऐक पंधरा दिवस । भोजन आह्मांस घालीं मग ॥ २ ॥ आज्ञा ह्मणूनी पाई ठेवी मस्तकाला । आनंद जाहाला मनामाजी ॥ ३ ॥ आवडीची रीती ऐकावी सादर । मिरजेमाजी घर तये स्थानीं ॥ ४ ॥ गावांत जें उंच तांदुळ पाहोन । शुद्ध ते सडोन निवडावे ॥ ५ ॥ जैसे शिवपुजे निवडीताती जन । तैसेचि निवडून सगळे घ्यावे ॥ ६ ॥ त्याचा बस्ता भरून ठेवावा स्वामीसी । ऐसें साहित्यासी सर्व पाहा ॥ ७ ॥ भरोनी कंठाळ स्वामीपासीं यावे । आनंदेंचि द्यावे भोजनासी ॥ ८ ॥ वेणुबाई आहे तोंवरी स्वामीनीं । दुज्याच्या हातूनी न जेवीती ॥ ९ ॥ ह्मणूनी त्या वेळे पंधरा दिवस । भोजन आह्मांस घाली ह्मणती ॥ १० ॥ पुढील कथेसी द्यावे अवधान । भक्ती हे गहन भीम ह्मणे ॥ ११ ॥ ११५

॥ **श्रीराम** ॥ पंधरा दिवस स्वैंपाक करून । स्वामीस भोजन करवीलें ॥ १ ॥ सोळावे दिवसीं करूनी भोजनासी । बोलीले शिष्यासी गुरुराव ॥ २ ॥ अमुचें आसन घालावें बाहेरी । उठोनी सत्वरी चालीयले ॥ ३ ॥ बाहेर आसन त्यावरी बैसोन । पाहताती जाण शिष्याकडे ॥ ४ ॥ हास्तासी जोडोन सर्व उभे तेथें । पुसती स्वामी त्यांतें तेंही ऐका ॥ ५ ॥ सर्वही जणाचीं जाली हो भोजनें । शोध करूनी येणें याची वेळे ॥ ६ ॥ सर्वांचाही शोध घेवोनीया आले । मग निवेदिलें गुरुराया ॥ ७ ॥ भोजन वेणीचें जालेसें पाहावे । येवोनी सांगावें येच क्षणीं ॥ ८ ॥ तुह्मी कोणी कोठें न जावें येथोनी । सर्वही मिळोनी आसा येथें ॥ ९ ॥ वेणुबाई स्वस्थ भोजन करून । तांबुल घेवोन बैसलीसे ॥ १० ॥ स्वामीनीं तयेसी पाठवीलें मूळ । आनंदाची वेळ भीम ह्मणे ॥ ११ ॥ ११६

॥ **श्रीराम** ॥ बोलावितां आली पायांस लागली । मग उठवीली गुरुरायें ॥ १ ॥ वेणे त्वां कवन केलेसें ऐकीलें । रामासी वर्णिलें आवडीनें ॥ २ ॥ सितांस्वयंवरासी केलें कवनासी । ते वेळीं स्वामीसी ऐकवीलें ॥ ३ ॥ ऐकतांची स्वामी संतोष पावले । रामासी वर्णिलें आवडीनें ॥ ४ ॥ वेणे आजी आहे सोळावा दिवस । मागे या वेळेस पाहीजे तें ॥ ५ ॥ आज्ञा ह्मणोनीया विणा आणवीला । भावें आळवीला गुरुराव ॥ ६ ॥ ह्मणे मागूं काये नासीवंत सारे । चित्त हें न थारे तयामध्यें ॥ ७ ॥ सिद्धि आणि सामर्थ्य जरी मागूं आतां । तरी कांहीं चित्ता तेंही न ये ॥ ८ ॥ पाई द्यावा ठाव दुजेपण वाव । घेणें देणें सर्व नाहीं करा ॥ ९ ॥ नेत्रीं अश्रुधारा सद्गदीत कंठ । बोलतां हे स्पष्ट प्रेमभरें ॥ १० ॥ रोमांच शरीरीं थरारीलें पूर्ण । गेले देहभान भीम ह्मणे ॥ ११ ॥ ११७

॥ **श्रीराम** ॥ वेणुबाई ऐसी भक्ती कोठें नाहीं । अद्भुतचि पाहीं प्रेमा जीचा ॥ १ ॥ ठेवोनीया विणा नमन घालीत । पडे दंडवत पृथ्वीवरी ॥ २ ॥ चरणावरी ठेवी मस्तक ते वेळीं । प्रेमाश्रूनें क्षाळी पाय तेव्हां ॥ ३ ॥ स्वामी सर्वांलागी ह्मणती तत्त्वता । भजनाचा आतां घोष करा ॥ ४ ॥ मृदांग आणोनी टाळही वाद्यासी । रामराम ऐसी ध्वनी पूर्ण ॥ ५ ॥ वेणुबाईचीया मुखांतूनी कैसा । रामराम ऐसा शब्द जाळा ॥ ६ ॥ तया शब्दासरिसा प्राण गेला जाण । देह अचेतन जाले तेव्हां ॥ ७ ॥ तुळसीकाष्टें आणि चंदनकाष्ठासी । आणोनी तयेसी उचलीलें ॥ ८ ॥ आनंदें दहन केलें स्वामीरायें । इछामरणी पाहे ह्मणती सर्व ॥ ९ ॥ धन्य वेणुबाई निष्ठा जिची पूर्ण । स्वामी मुखें स्तवन करिती जीचें ॥ १० ॥ गुरुभक्तीची हे सीमाच जाहाली । पुढें कथा जाली तेही ऐका ॥ ११ ॥ ११८

---

१ वेणुबाईचें सीतास्वयंवर काव्य अजून अप्रकाशित आहे. सभेला तें उपलब्ध झालें आहे.

॥ श्रीराम ॥ स्वामीच्या मानसीं रामकथा कांहीं । वर्णावी हें पाहीं इच्छा जाली ॥ १ ॥ सुंदरकांडाचे केले शत श्लोक । युद्धकांड देख तेरा शतें ॥ २ ॥ ऐसें चौदा शतें केलें रामायण । जयाच्या श्रवणें दोष जाती ॥ ३ ॥ येक शिष्य आला स्वामीदर्शनासी । तयाच्या मानसीं रामायणें ॥ ४ ॥ यांसी ह्मणे मज द्यावें हें पुस्तक । प्रीत त्याची येक दुजी नाहीं ॥ ५ ॥ प्रातःकाळीं तया जावयाची त्वरा । ह्मणोनी दातारा विनवीलें ॥ ६ ॥ यांनीं कल्याणासी केली आज्ञा ऐसी । तुह्मींच हें यासी लिहूनी द्यावें ॥ ७ ॥ येका रात्रींतची लिहिलें पुस्तक । प्रातःकाळीं देख आणून देती ॥ ८ ॥ पाहोनी प्रसन्न जाले गुरुराज । आलिंगन सहज दिलें प्रेमें ॥ ९ ॥ मग मनबोध केले श्लोक पूर्ण । दोन शतें जाण पांचांगळें ॥ १० ॥ आणिक अभंग जाले संख्येतीत । न होय गणीत भीम ह्मणे ॥ ११ ॥ ११९

॥ श्रीराम ॥ स्वामी कल्याणासी बोलीले तेधवां । जावें शिरगांवा येथोनीया ॥ १ ॥ शिष्यसांप्रदाय करावा येथोनी । आज्ञा हे मानोनी जाये वेगीं ॥ २ ॥ बोलाऊं त्या वेळीं यावें आतां जाण । आज्ञा हे ह्मणोन जाते वेळे ॥ ३ ॥ नेत्रीं अश्रुधारा सद्गदीत कंठ । वियोगाचें कष्ट बहु होती ॥ ४ ॥ मनामाजी आले सगुणदर्शन । पुन्हा आतां जाण न होयची ॥ ५ ॥ पाय न उचले निघोन न जावें । आज्ञेसी मानावें हेंचि बरें ॥ ६ ॥ ऐसें होतां स्वामी देती आलिंगन । वियोगाचें भान दूर केलें ॥ ७ ॥ तुजपासी आहे अहर्निसीं जाण । आज्ञा हे ह्मणोन गेले पाहा ॥ ८ ॥ मग शिष्य कोणी व्हावयासी येती । तयांसी

---

१ श्रीकल्याणमहाराजांनीं स्वहस्तें लिहिलेल्या बाडांत सुंदरकांड व युद्धकांड अशीं दोनच कांडें आहेत. चाफळ मठींही हींच दोन कांडें आहेत. या ठिकाणींही याच दोन कांडांचा उल्लेख आहे. तर मग किष्किंधाकांड ह्मणून जें प्रकाशित आहे तें प्रक्षिप्त समजावयाचें कीं काय ?

२ सर्वत्र मनोबोधाचे २०५ श्लोक आहेत. हल्लीं प्रकाशित २१० आहेत त्यांत ५ प्रक्षिप्त आहेत.

धाडिती शिरगांवासी ॥ ९ ॥ ह्मणती स्वामीपण दिल्हें म्या तयासी । आतां मजपासीं कांहीं नाहीं ॥ १० ॥ स्वामीत्त्वचि दिल्हें आपणा ऐसें केलें । द्वैत मावळलें भीम ह्मणे ॥ ११ ॥ १२०

॥ **श्रीराम** ॥ स्वामीचीं चरित्रें वडिलावडिलीं श्रवण । जाली तितुकीं जाण वर्णियलीं ॥ १ ॥ अल्पमती परी आवड मानसीं । ह्मणोनी सिद्धीसी नेलें देवें ॥ २ ॥ वंशपरंपरा आणि गुरुही ते । ऐका सांगेन ते मालीकेसी ॥ ३ ॥ कल्याण स्वामी हे ब्रह्मचारी पूर्ण । बंधु त्यांचे जाण येकोदर ॥ ४ ॥ दत्तात्रेय ऐसें नाम असे साचें । स्वामीनीं तयांचें लग्न केलें ॥ ५ ॥ कृपा करोनीया दिला वर पूर्ण । नारळ देवोन बोलीयले ॥ ६ ॥ ब्रह्मनिष्ठ भक्त होय तुज पुत्र । पुढेंही विचित्र ऐका येक ॥ ७ ॥ तुझीया वंशांत भक्तचि होतील । सहजांत बोल जाले ऐसे ॥ ८ ॥ राघवस्वामी हे पुत्र जाणा त्यांचे । ब्रह्मनिष्ठ साचे गुरुभक्त ॥ ९ ॥ तयापासोनी हे यशवंतस्वामी । प्रेम प्रीति रामीं सदा ज्यांची ॥ १० ॥ तयानीं नाम हें गर्भींच ठेवीलें । भीम ऐसें जालें रूढींतही ॥ ११ ॥ बाप आणि गुरु परंपरा ऐसी । सर्व श्रोतयांसी निवेदीली ॥ १२ ॥ गुरुचरित्र हें सर्व जालें । अभंगीं वर्णिलें यथामती ॥ १३ ॥ न्यून असेल तें करावें संपूर्ण । श्रोते तुह्मी सूज्ञ ह्मणोनीया ॥ १४ ॥ गुरुभक्तांनीं हें वाचावें आवडी । तयांसीच गोडी लागे येथें ॥ १५ ॥ येक शत आणि येकत्रीस वरुते । अभंग निरूते आहेत हे ॥ १६ ॥ शके सत्राशत आणि येकोणीस । पिंगळ हा असे संवछर ॥ १७ ॥ श्रावण वद्यांत द्वितीया हे तीथ । वासर असत सौम्य पाहा ॥ १८ ॥ शततारका हें नक्षत्र जाणावें । तारीख स्वभावें पंधरावी ॥ १९ ॥ मोक्ष पुऱ्या सात तयांत अवंती । अभंग समाप्ती तेथें जाली ॥ २० ॥ यशवंतसुत संतांच्या कीर्तनें । भीम भवभान नाहीं जालें ॥ २१ ॥ १२१

॥ **इति श्री गुरुचरित्र अभंग संपूर्ण ॥ शुभं भवतु** ॥

---

# कल्याणस्वामी

॥ श्रीराम ॥ कल्याण स्वामी हे शिरगांवीं होते । आनंदभरीत सर्वकाळ ॥ १ ॥ काळ पडे तेव्हां पंढरी निघाले । समागमें चाले बहु जन ॥ २ ॥ हाणमंता बेरड घाटांत लुटाया । आला दया तया कांहीं नाहीं ॥ ३ ॥ अकस्मात यांसी पाहोनीया ह्मणे । येकीकडे होणें तुह्मी आतां ॥ ४ ॥ तुमचा समुदाय घेवोनीया जावें । दर्शनेंचि भाव जाला ऐसा ॥ ५ ॥ ह्मणती हे आह्मासी आधीं मारी येथें । चित्ता येईल तें करी मग ॥ ६ ॥ बहुतचि बोध करितां तयास । भावें ह्मणे शिष्य करा मज ॥ ७ ॥ तया रामनाम सांगतां तयानें । मागा कांहीं ह्मणे स्वामीलागी ॥ ८ ॥ पंढरीस आह्मी सुरक्षित जावें । ऐसें देई भावें करोनीया ॥ ९ ॥ शंभर बेरड रक्षणासी दिल्हे । पंढरीस आले सर्वांसहित ॥ १० ॥ केली यात्रा सांग निघाले तेथोन । पुढील कथन भीम गाय ॥ ११ ॥

॥ श्रीराम ॥ परंड्यासन्निध तीन कोशावरी । राहीले निर्धारी डोमगांवीं ॥ १ ॥ सीनातीरीं मठ केला त्या गांवांत । शिष्यही बहुत जाले तेथें ॥ २ ॥ बालेघाटावरी होता शिष्य तेणें । यांसी पाचारणें केलें होतें ॥ ३ ॥ रामनवमी घरीं उछाह तो करी । सद्गुरु पाचारी प्रेमभावें ॥ ४ ॥ निघाले जावया मार्गी विहीरीवरी । स्नानसंध्या बरी सारिताती ॥ ५ ॥ जटिलें येवोनी मांडीवरी पाय । ठेवोनीया पाहे शांती यांची ॥ ६ ॥ काढोनीया पाय मागें उभा राहे । शिष्यसमुदाय खवळला ॥ ७ ॥ नेत्र उघडोनी शिष्यांसी ह्मणती । क्रोध नका चित्तीं येऊं देऊं ॥ ८ ॥ मुंग्या मक्षीकांचे लागताती पाये । त्यांचें तुह्मी काय केलें सांगा ॥ ९ ॥ ऐकतां जटिल पायासी लागला । तोही शिष्य

जाला पुढें ऐका ॥ १० ॥ आले अबेरीस प्रतिपदेसचीं । ब्रह्मभोजनासी होते वेळे ॥ ११ ॥ गांवामाजी मठ होता जटीळांचा । त्यांच्या महंतीचा डौल तेथें ॥ १२ ॥ देशमुख त्यांचा शिष्य होता ह्मणून । प्रतिष्ठा संपूर्ण तेथें त्यांची ॥ १३ ॥ तेही भोजनासी बैसवीले होते । ब्राह्मण पुजेतें केलें तेव्हां ॥ १४ ॥ गंध पुष्पें पुजा मान देतां यासी । क्षोभोन मानसीं गेले पाहा ॥ १५ ॥ समजावीले परी पुन्हा नाहीं आले । भयभीत जाले सर्व तेव्हां ॥ १६ ॥ ब्राह्मणभोजन जाहालीयांवरी । विरस अंतरीं जाला मोठा ॥ १७ ॥ रात्रीं कीर्तनासी कोणीच न येती । भय पडे चित्तीं देसायाचें ॥ १८ ॥ स्वामीनींच येक पद ह्मणोनीया । आठवीले तया श्रीगुरूसी ॥ १९ ॥ देशमुख होता दुसरीया गांवीं । निद्रा केली बरवी आनंदानें ॥ २० ॥ तेथेंचि सद्गुरु प्रगट होवोनी । छडीनें मारोनी उठवीला ॥ २१ ॥ ह्मणती रामदास नाम माझें सत्य । तूं कां रे भ्रमिष्ट जाहालासी ॥ २२ ॥ माझें मूल तेथें गेले उछाहास । जटीळें विध्वंस केला त्याचा ॥ २३ ॥ प्रातःकाळीं तुवा जावोनी सन्मानें । करीसी तरी प्राण राहे तुझा ॥ २४ ॥ कपाळीं तयाच्या बुका लावीयला । नमस्कार केला मनोभावें ॥ २५ ॥ उठोनी पाहात तंव कांहीं नाहीं । प्रातःकाळीं पाहीं निघाला तो ॥ २६ ॥ कल्याण स्वामीही निघोनी चालीले । मार्गामाजी जालें दर्शन त्या ॥ २७ ॥ घोड्याखाले उडी टाकोन नमन । केलें पाईं जाण दंडवत ॥ २८ ॥ गांवांत आणोन सन्मान बहुत । करोनीया होत शिष्य तोही ॥ २९ ॥ जटिळ होते ते हाकोनी दिधले । उछाहासी केले आनंदानें ॥ ३० ॥ अपार चरित्रें केलीं ऐसें रिती । भीम गाय चित्तीं प्रेमयुक्त ॥ ३१ ॥

---

# दत्तात्रेयस्वामी

॥ **श्रीराम** ॥ दत्तात्रेयस्वामी त्यांची कथा रम्य । कीर्तनाचें प्रेम ऐका ज्यांचें ॥ १ ॥ कोकणस्थ विप्र मांडवगडासी । होता त्याचे स्त्रीसी बाधा होती ॥ २ ॥ समंधाची बाधा वस्त्रचि टाकावें । भलतेंचि करावें नवल मोठें ॥ ३ ॥ घरांमध्यें होती ठेविली कोंडोन । तेथें आगमन जाले यांचें ॥ ४ ॥ तयां घरांमध्यें करितां कीर्तन । दार उघडोन आली तेथें ॥ ५ ॥ भक्ति ज्ञान आणि वैराग्य वर्णितां । अनुताप तत्वता जाला त्यासी ॥ ६ ॥ ह्मणे म्या बहुतालागी दिला दगा । आतां मुक्तिजोगा ठाव आहे ॥ ७ ॥ घेवोनीया तीर्थ भालाभरी उडे । पृथ्वीमाजी पडे प्रेत जैसें ॥ ८ ॥ आंगावरी तिच्या टाकीयली छाटी । उठीली गोरटी लज्यायुक्त ॥ ९ ॥ पायावरि तेव्हां मस्तक ठेवोन । स्त्रीयामध्यें जाण गेली वेगें ॥ १० ॥ तिच्या वोव्यामध्यें नारळ घालीत । पुत्र तया होत सत्ता ऐसी ॥ ११ ॥ अद्यापी तयेचा वंश परींच्यात । पाहावा जी तेथ आहे जाण ॥ १२ ॥ बहुत चरित्रें केलीं त्यांत येक । संकळीत देख वर्णियलें ॥ १३ ॥ पुढील कथेसी द्यावें अवधान । भीम आहे दीन तयाचेची ॥ १४ ॥

---

# राघवस्वामी

॥ **श्रीराम** ॥ दत्तात्रेयस्वामी त्यांचे पुत्र धन्य । जाले जे गामान्य भक्त ज्ञानी ॥ १ ॥ जनका ऐसा ज्यांनीं प्रपंचही केला । भक्ति ज्ञान ज्याला हस्तगत ॥ २ ॥ येके दिसीं घरीं खर्चावया नाहीं । बोलीयलीं पाही माता यांसी ॥ ३ ॥ ह्मणे राघोबारे घरीं बसलीयां । कैसा प्रपंचा या चाले सांग ॥ ४ ॥ ह्मणती विश्व पाळी तो आह्मा सांभाळी । नवल तये काळीं जालें ऐका ॥ ५ ॥ भोजनीं बैसतां कोरडाची भात ।

दुध नाहीं मात जाणवीत ॥ ६ ॥ श्लोक दोन करून देवापुढें तेणें । ठेवविले जाण शिष्याहातीं ॥ ७ ॥ पांचसे रुपये येक गाय ह्मैस । तया समयास आली तेथें ॥ ८ ॥

॥ श्लोक ॥

ज्याचे गृहीं कमळजा आणि कामधेनु । कल्पतरू क्षिरनिधी सुख काय वानु ॥
आश्चीर्य वाटत मनीं कविलागि जाणा । दासासि ते कढिस चिंच तऱ्ही मिळेना ॥१॥
राहे स्मशानभुमिकेवरि भस्म लावी । मागे सदां भिक घरोघरिं दैन्य दावी ॥
आश्चीर्य वाटत मनीं कविराज भृत्या । दासांघरीं क्षिरनिधी सुरदुंदुभी त्या ॥ २ ॥

ऐसे दोन श्लोक केले तये वेळीं । आणुनी देवाजवळीं वाचीतांची ॥ ९ ॥ ऐसा भक्तांलागी सांभाळी अनंत । घरांतचि देत भीम ह्मणे ॥ १० ॥

---

# यशवंतस्वामी

॥ श्रीराम ॥ राघवस्वामीचे पोटीं यशवंत । पुत्र जाले सत्य भक्त ज्ञानी ॥ १ ॥ पंढरीस गेले यात्रे कार्तीकीस । चोरानीं घोड्यास नेले त्यांचे ॥ २ ॥ समाधान वृत्ती न डंडळे मन । शांती हे संपूर्ण बाणलीसे ॥ ३ ॥ पंधरा दिवस जाले जाते वेळे । बोलीले सकळ संगीयासी ॥ ४ ॥ सामान घोड्याचें पांडुरंगापुढें । ठेवोनी निवाडे या रे वेगीं ॥ ५ ॥ इतुक्यांत कौतुक घोडे आलें द्वारीं । जाली नवल परी काय सांगूं ॥ ६ ॥ भक्तांचे कधींही न पडेचि उणें । सदां नारायेण सांभाळीतो ॥ ७ ॥ बाप आणि गुरु आमुचे जाणावें । भीमालागी भाव पाई त्यांचे ॥ ८ ॥

---

# भानुदासस्वामी

**॥ श्रीराम ॥** भानुदासस्वामी संतामाजी श्रेष्ठ । प्रपंचाचे कष्ट दूर जया ॥ १ ॥ कापड आणाया गेले संग्यासवें । अद्भुतचि देवें केलें तेथें ॥ २ ॥ खेप भरोनीया येतां मार्गावरी । पालें दिल्हीं बरी गांवां-पासीं ॥ ३ ॥ यांचें पाल मध्यें होतें हे गांवांत । कीर्तनासी जात ऐका-वया ॥ ४ ॥ सर्वांनीं वर्जीले परी न राहीले । स्मरणीं रंगले देवा-जीचे ॥ ५ ॥ रिघ्या पेंवांमध्यें दीड पालें यांचीं । टाकती तयांची बुद्धी ऐसी ॥ ६ ॥ बैल सारे रानीं दिधले हांकोनी । रडऊं तया मनीं भाव-ना हे ॥ ७ ॥ चोर आले धाडी मोठी अकस्मात । लुटोनीया नेत सर्व यांचें ॥ ८ ॥ भानुदास आले कीर्तन ऐकोनी । पाहाती नयनीं जाहालें तें ॥ ९ ॥ माझें सर्व देवा केलेसी जतन । परी संगी जाण माझे कीं हे ॥ १० ॥ तेव्हां पांडुरंगें चोर अंध केले । प्रातःकाळीं आले घेवोनीया ॥ ११ ॥ ज्याचें त्यासी दिल्हें आनंद जाहाला । वाटीलें द्विजाला आपुलें जें ॥ १२ ॥ सोडोनीया वेंवसाव विणा हातीं । भजनीं रंगती अहिर्निसीं ॥ १३ ॥ संताचें चरित्र गातां आणि ऐकतां । होय सार्थकता भीम ह्मणे ॥ १४ ॥

**॥ श्रीराम ॥** घरीं आले बहु दरिद्रें पिडीलें । कांता तेव्हां बोले दीनरूप ॥ १ ॥ प्रातःकाळीं गंगास्नान करोनीया । गीतापाठीं तया प्रीति फार ॥ २ ॥ योगक्षेम त्यांचा वाहातो मी ऐसें । अनन्य विश्वासें भजती जे ॥ ३ ॥ लोक पाहोनीया विस्मित जाहाले । हारताळे लावीले तयालागी ॥ ४ ॥ देव घरीं आले माल घेवोनीया । कांता पुसे तया कोण तुह्मी ॥ ५ ॥ कृष्णाजीपंत हें नाम सांगीतलें । द्रव्यें अन्न केलें तृप्त तये ॥ ६ ॥ जन्मवरी खातां न सरेचि ऐसें । देवोनी विश्वासें बोली-यले ॥ ७ ॥ तुमच्या भ्रतारासी निरोप सांगावा । दृढ धरुनी जीवा-

माजी ऐका ॥ ८ ॥ आमुचे दाढी त्यांनीं लाविली हार्ताळ । पुसोनी तात्काळ टाका सांग ॥ ९ ॥ इतुकें सांगोनीया गेले तों हे आले । घरीं जों पाहीले अद्भुतची ॥ १० ॥ पुसतां कांतेसी सांगे वर्तमान । नेत्रीं वाहाती जाण अश्रुधारा ॥ ११ ॥ तात्काळ हार्ताळ पुसोन टाकीली । भक्तासी सांभाळी हेंचि सत्य ॥ १२ ॥ कांतेसी ह्मणती सर्वस्वाचें दान । करावेंसें जाण वाटताहे ॥ १३ ॥ बोलावोनी विप्र फडशा केला सारा । ह्मणे ज्याचें त्याला समर्पिलें ॥ १४ ॥ ऐसे हरिभक्त उदास मानसीं । देव तयापासी भीम ह्मणे ॥ १५ ॥

॥ **श्रीराम** ॥ भानुदास क्षेत्र पैठणाहूनीया । पंढरी जावया सिद्ध जाले ॥ १ ॥ आले पंढरीस नेम यांचा असे । प्रेमाच्या उल्हासें गावें भावें ॥ २ ॥ देवांपुढें पांच अभंग ह्मणावें । देवें माळे द्यावे अकस्मात ॥ ३ ॥ येका शिष्यें यांसी पितांबर दिला । आले राउळाला नित्या ऐसे ॥ ४ ॥ तेथें होता सडा चिडविडीत जाले । पितांबरामुळें काय केलें ॥ ५ ॥ राखोनी नमन केलें वरिच्यावरी । तये अवसरीं माळ न ये ॥ ६ ॥ बहुत श्रम जाले न ये माळ जेव्हां । उपेक्षीलें तेव्हां ह्मणती देवें ॥ ७ ॥ तेथोनी निघाले येका गांवा आले । लोकासी बोलीले तेथीलीया ॥ ८ ॥ प्रहररात्रीसी विघ्न येईल येथें । मारोनी तयातें टाका तुह्मी ॥ ९ ॥ पंढरीहून ते होते दोन कोस । ह्मणती जिवा नाश करूं आतां ॥ १० ॥ चौवें गडी केले तयासी ह्मणती । माझीये मोटेसी बांधोनी न्या ॥ ११ ॥ तया गावांमध्यें नेवोनी ठेवावें । मग तुह्मी यावे पंढरीस ॥ १२ ॥ आज्ञा ह्मणोनीया नेली मोट गांवीं । ठेविली जाणावी गांवांमध्यें ॥ १३ ॥ निघोनीया गडी गेल्यावरी लोक । मार करिती देख तयावरी ॥ १४ ॥ बहु केला मार परी न लागेची । मागें प्रल्हादाची साक्ष यांसी ॥ १५ ॥ वीट गेले मोटे सोडोनी पाहीले । स्वामीस देखीले अकस्मात ॥ १६ ॥ नमन करिती पायास लागती । तेथोनीया येती पंढरीस ॥ १७ ॥ निग्रह करितां ह्मणे पांडुरंग । सोव-

ळ्याचें मग स्मरण दिल्हें ॥ १८ ॥ समाधान केलें माळेसी दिधले । पैठणासी आले आनंदानें ॥ १९ ॥ पुढील चरित्र विस्तार बहुत । भीम गाय नित्य संतलीला ॥ २० ॥

॥ **श्रीराम** ॥ अनेगोंदीमध्यें होता नृपनाथ। कानडा विख्यात रामराजा ॥ १ ॥ रासाईचा भक्त होता तो अत्यंत । साक्षात्कार सत्य होता मोठा ॥ २ ॥ अभिमान तया जाहाला अत्यंत । वैभवी आणि भक्त मीच ह्मणे ॥ ३ ॥ हेमाडपंतही तेथें होते जाण । त्यांसी गजानन साह्य सदा ॥ ४ ॥ लंके बिभीषणें नेले होते ज्यांसी । पिशाचलिपीसी आणिले ज्यांनीं ॥ ५ ॥ रायापासी येतां बोलीला अभिमानें । आह्मा ऐसा कोण भक्त बोला ॥ ६ ॥ वैभवही थोर भक्तही मी थोर । देवी माझी थोर सर्वांमध्यें ॥ ७ ॥ हेमाडपंतासी न सावरे जेव्हां । बोलीयले तेव्हां निशंकची ॥ ८ ॥ पंढरींत पांडुरंग देव येक । ऐसा नाहीं देख भूमंडळीं ॥ ९ ॥ तयाचाची भक्त नामदेव संत । वैभव अद्भुत तेथें आहे ॥ १० ॥ रायासी आवेश येवोनी निघाला । सर्व वैभवाला घेवोनीया ॥ ११ ॥ यानीं करोनीया गणपतीच्या ध्याना । ह्मणती माझ्या वचना सांभाळावें ॥ १२ ॥ अभय होतांचि चालीयले मार्गीं । सेना दोही भागीं चतुरंग ॥ १३ ॥ आठ कोसावरी राहीली पंढरी । भक्तसाहेकरी पांडुरंग ॥ १४ ॥ अद्भुतचि माव करितो देवाजी । द्वार-काची दुजी ऐसें भासे ॥ १५ ॥ घोड्यावरी स्वार होवोनी आपण । आले नारायण रायापुढें ॥ १६ ॥ रायें पाहातांचि ह्मणे नामदेव । नमन सद्भावें करूनी पुसे ॥ १७ ॥ कृष्णाजीपंत हें नाम जाणवीलें । नामदेवें केलें पांगे[1] आह्मा ॥ १८ ॥ सांगोनीया जातां ह्मणतसे राव । धन्य हें वैभव वाटतसें ॥ १९ ॥ भुलोनीया आह्मी पाग्याच्या पायांसी । लागलों हे ऐसी भ्रांती जाली ॥ २० ॥ ऐसीं बहु सोंगें पांडुरंग दावी । न धरवे

---

१ पागे केलें = नादीं लावलें. पागा = अंकित

जीवीं ब्रह्मादिका ॥ २१ ॥ पंढरी येवोनी पाहाताती तंव । कळस कोट सर्व सुवर्णाचे ॥ २२ ॥ हेमाडपंतासी घेवोनी वाड्यांत । रत्नें वस्त्रें घेस अमोलीक ॥ २३ ॥ येतां कचेरींत बैसले लोडासी । नामदेव त्यांसी मानीयले ॥ २४ ॥ नमन करोनी वस्त्रें रत्नें दिल्हीं । आलिंगनें जालीं पुढें ऐका ॥ २५ ॥ राव ह्मणे नाम सांगावें आपुलें । नारायण भले ह्मणती आह्मा ॥ २६ ॥ नामदेवाचीये असो कोठीवरी । त्यांचा आह्मा-वरी लोभ फार ॥ २७ ॥ तुह्मी सर्व आजी यावें भोजनासी । मग भेटी त्यांसी करूं तुह्मा ॥ २८ ॥ अधिकारासारीखे बैसवीले पाहा । आली वाढावया जगन्माता ॥ २९ ॥ नामदेवाची हे पत्नी ह्मणऊन । राव तये नमन करीताहे ॥ ३० ॥ पुसतां सांगती नारोपंतकांता । कोठीवरी होता तयाची हे ॥ ३१ ॥ हेमाडपंतासी ह्मणे राव काय । वैभव हें आहे न वर्णवे ॥ ३२ ॥ ऐकतांचि यांच्या नेत्रीं आले अश्रु । ह्मणती सर्वेश्वरु जालासा रें ॥ ३३ ॥ भोजन करोनी चंद्रभागेतीरीं । पाहाताती नेत्रीं कौतुकासी ॥ ३४ ॥ शतावधि दासी भांडीं वांसीताती । विजे ऐशा दिसती राजयासी ॥ ३५ ॥ रासाईही त्यांत होती वोळखोन । साष्टांग नमन करी तये ॥ ३६ ॥ ह्मणे माते ऐसें काय हें करिसी । सांग निश्चयेंसी आजी मज ॥ ३७ ॥ ह्मणे देवी तुझा देव आहे तेथें । चाकरीचें नातें येथें आहे ॥ ३८ ॥ विस्मये होवोनी ह्मणे दासीपण । सोडवीन जाण चिंता नाहीं ॥ ३९ ॥ नामदेवाचीये भेटीसी चालीला । राउळांत आला देवाचीये ॥ ४० ॥ खांद्यावरी वीणा डोईस बोडके । पाईं चाळ निके बांधीयले ॥ ४१ ॥ गांडींत लंगोटी भजनीं रंगले । रायानें देखीले अकस्मात ॥ ४२ ॥ रायासी सांगती हेचि नामदेव । ऐकतां सद्भाव जाला मोठा ॥ ४३ ॥ संतदर्शनाचा महिमा अद्भुत । राव दंडवत पडे पाईं ॥ ४४ ॥ उठवोनी यांनीं आलिंगन दिल्हें । प्रेम गहीं-वरले नेत्र तेव्हां ॥ ४५ ॥ ह्मणे राव रासाईस मुक्त करा । देव माझा खरा आहे जी हा ॥ ४६ ॥ नामदेव ह्मणती दासीपण आहे । देवपण

पाहे तंवरीच ॥ ४७ ॥ सरकारातुनीया दूर केल्यावर । सत्ता तीळमात्र न चालेची ॥ ४८ ॥ मनामध्यें राव बहु संकोचला । दासीलागी केला देव आह्मी ॥ ४९ ॥ ईचा देव धनी कोण तोचि पाहूं । तयालागी वाहूं जीवप्राण ॥ ५० ॥ आला देवाल्यांत पांडुरंगापुढें । निग्रहासी गाढें आरंभीले ॥ ५१ ॥ ह्मणे यांसी नेऊं किंवा प्राण देऊं । उपोषणें बहु आरंभीलीं ॥ ५२ ॥ सात दीन जेव्हां उदकही न घे । पांडुरंग-माय बोले तेव्हां ॥ ५३ ॥ येके दिसीं मज नेई अनेगोंदी । आणीकही संधी ऐक येक ॥ ५४ ॥ माझीया संतांचा होतां अपमान । तात्काळ तेथोन येईन मी ॥ ५५ ॥ कबुल करोनी नेले कैसें ऐका । मनुष्येंचि देखा उभीं केलीं ॥ ५६ ॥ बहु प्रेत्नें नेले देव अनेगोंदीं । करी पुजा विधी मनोभावें ॥ ५७ ॥ भानुदाससंत तेथें गेले जेव्हां । अपमान तेव्हां केला रायें ॥ ५८ ॥ कळतांचि संत नेत्रा आले अश्रु । ह्मणे सर्वेश्वरु जातो आतां ॥ ५९ ॥ पांडुरंग राया ह्मणती आमुची भाक । उगंवली देख जाऊं आतां ॥ ६० ॥ आमुची प्रतिमा करोनी बैसवी । मज ऐसे भावी संत माझे ॥ ६१ ॥ राव ह्मणे येका दिसांतचि जावें । मग देवरावें मान्य केलें ॥ ६२ ॥ भानुदासें देवा उचलोनी घेतलें । तळ्यामाजी नेले अकस्मात ॥ ६३ ॥ जाला गुत चंद्रभागेंत निघाला । जयजयकार जाला पंढरीसी ॥ ६४ ॥ आणीयला देव धन्य संतराव । भानुदासा सर्व नमना येती ॥ ६५ ॥ पंढरीचा राव पंढरीस आला । आनंद जाहाला यात्रेलागी ॥ ६६ ॥ कथेचा विस्तार आहेच बहुत । भीमें संकळीत वर्णीयलें ॥ ६७ ॥

**॥ इति श्री भानुदास आख्यान संपूर्ण ॥ शुभं भवतु ॥**

---

# श्रीएकनाथ

॥ **श्रीराम** ॥ भानुदास स्वामी त्यांचे पणतु सत्य । जाले येकनाथ भक्त ज्ञानी ॥ १ ॥ मुंजी लग्न बापें केलें तये वेळीं । प्रपंचाची जाळी न पडेची ॥ २ ॥ विद्या कांहीं पोट भरायाची नाहीं । ह्मणवोनी पाही काये केलें ॥ ३ ॥ औरंगाबाजेंत जनार्दनपंत । संसारीं अलिप्त जनकाऐसे ॥ ४ ॥ दत्तात्रेय सिद्ध त्यांचा अनुग्रह । गुरुवारीं होय दर्शन ज्या ॥ ५ ॥ दिवाणगिरीही होती अविंधाची । परी भक्ती साची असे पाहा ॥ ६ ॥ येकनाथ तेथें ठेविले आणोनी । शागिर्दी करूनी राहीयले ॥ ७ ॥ विद्या कांहीं न ये सेवेंत तत्पर । नित्य निरंतर स्वामीपासी ॥ ८ ॥ खोलीमाजी रात्रीं जनार्दनपंत । जावोनी बैसत गुरुध्यानीं ॥ ९ ॥ आज्ञा असे कोणी बाहेर नसावें । येकनाथ भावें राहाती उभे ॥ १० ॥ ऐसे साहा महीने होते उभे रहात । गुरुवारीं येत दत्त तेथें ॥ ११ ॥ ह्मणती त्या मुलासी बोलवावे आंत । जनार्दनपंत घेती आंत ॥ १२ ॥ सिद्धासी पाहातां नमस्कार केला । जवळी बैसवीला गुरुरायें ॥ १३ ॥ जिव्हेवरी सिद्धें लिहीलें अक्षर । बोलीलें उत्तर जनार्दन ॥ १४ ॥ यासी अनुग्रह देई प्रातःकाळीं । संतामाजी बळी होईल हा ॥ १५ ॥ अनुग्रह मग दिला येकनाथा । पुढीलही कथा भीम सांगे ॥ १६ ॥

॥ **श्रीराम** ॥ पारसी लाखोटे अविंधासी आले । बोलाऊं धाडीले जनार्दना ॥ १ ॥ होते देवार्चनीं आलें बोलावणें । येकनाथा येणें पाठवीलें ॥ २ ॥ पारसी लाखोटे टाकी नाथापुढें । फोडोनी निवाडें वाचा ह्मणे ॥ ३ ॥ घडघडाट तया वाचोनी दावीले । उत्तरही दिल्हें यथास्थित ॥ ४ ॥ दिवाणगिरीचीं दिलीं वस्त्रें यांसीं । आनंदें घरासी आले तेव्हां ॥ ५ ॥ स्वामीपदावरी मस्तक ठेविलें । आलिंगून दिलें

जनार्दनें ॥ ६ ॥ सर्व कारभार करिती अविंधाचा । परी लोभ त्याचा नाहीं यांसी ॥ ७ ॥ स्वामी आज्ञेवरी देहच ठेवीला । येके दिसीं याला बोलीयले ॥ ८ ॥ येकनाथा तांब्या ठेवावया सांग । आपणचि अंगें घेऊनी गेले ॥ ९ ॥ घाण येती ह्मणून अंगेंची झाडिती । सडा तये क्षितीं स्वछ व्हाया ॥ १० ॥ रांगोळी घालोनी बोलीले स्वामीसी । शौच-कूपापासीं तांब्या आहे ॥ ११ ॥ जावोनी पाहातां आश्चर्य वाटलें । ह्मणती काय केलें येकोबानें ॥ १२ ॥ काम यासी आतां पाहोनी सांगावें । गुरुपण भावें घेतो माझें ॥ १३ ॥ सर्व शिष्य द्वेष करिताती यांचा । हे कांहीं कोणाचा न करिती ॥ १४ ॥ येकनाथ प्रात:काळीं पाई जाती । तुळसी अति प्रीति आणावया ॥ १५ ॥ जनार्दनपंतीं केलें कौतुकासी । बांधिती मांडीसी अंबा येक ॥ १६ ॥ खांडूक जाहालें वैद्यें सांगीतलें । तोंडेंचि वोढिलें पाहिजे या ॥ १७ ॥ तोंड लावोनीया जो कोणी घेईल । तात्काळ मरेल ऐसें आहे ॥ १८ ॥ कोणाही त्या वेळीं नव्हे अवसान । तुळसी हे घेवोन आले तेव्हां ॥ १९ ॥ कळतां वर्तमान आले स्वामी-पासी । ह्मणती त्यांचे त्यांसी देऊं देह ॥ २० ॥ जवळी येतांची स्वामी बोलीयले । मरसी या वेळे पुर्तें पाहें ॥ २१ ॥ मायबापा पुत्र येक तूं आहेसी । स्त्री तुझी तयेसी दु:ख होये ॥ २२ ॥ न बोलतां तोंड लावोनी वोढीलें । घटाघटा गिळिलें प्रेमानंदें ॥ २३ ॥ स्वामीस बोलीले नित्य दु:खें ऐसीं । बहुत अंगासी व्हावीं वाटे ॥ २४ ॥ मग आलिंगन दिधलें आवडीं । गुरुकृपाजोडी जोडली त्या ॥ २५ ॥ सर्वही बोलती कळतें हें आह्मांसी । चोखीतो त्वरेंसी पाय काये ॥ २६ ॥ पुढील कथेसी द्यावें अवधान । संताचेची दीन भीम आहे ॥ २७ ॥

**॥ श्रीराम ॥** दिवाणगिरीचा करितां कारभार । करोनी तत्पर गुरुसेवे ॥ १ ॥ दुष्ट बुद्धि धरूनी सर्व कारकून । येके स्त्रीसी जाण बोलीयलें ॥ २ ॥ गर्भीण पाहोन द्रव्य देती तये । रचिला अपाये संतावरी ॥ ३ ॥ येकनाथें पोट वाढवीलें ह्मणे । आणिखीही धन

देऊं तुज ॥ ४ ॥ तैसीच ते होती ह्मणून मान्य केलें । मग समजावीलें अविंधासी ॥ ५ ॥ तया आला कोप सेवक धाडीले । येकनाथा आले बोलवाया ॥ ६ ॥ जनार्दनस्वामी करिती देवार्चन । पुढें उभे जाण हेही होते ॥ ७ ॥ सेवक येतांचि जावया निघाले । स्वामी बोलीयले तये वेळीं ॥ ८ ॥ नित्याऐसें नव्हे बोलावणें हेंची । स्मरणी हातींची दिल्ही तेव्हां ॥ ९ ॥ घालोनीया हस्तीं गेले आनंदानें । अविंध पाहोन बोले यांसी ॥ १० ॥ काय स्त्री बोलती तये बोलवीले । तयेनें कथीलें द्रव्यलोभें ॥ ११ ॥ येकनाथ तेव्हां ह्मणती अविंधासी । असत्य मानीसी माझें आतां १२ ॥ स्मरणी तयेच्या लावीली पोटासी । बोलती गर्भासी सत्य सांग ॥ १३ ॥ पोटांतूनी गर्भ बोले घडघडीत । जाहाला वृत्तांत सर्व सांगे ॥ १४ ॥ ऐकतां अविंध जाला सद्गदीत । पायासी लागत नाथाचीये ॥ १५ ॥ चाडी केली ज्यांनीं त्यांचा शिरछेद । करावासा क्रोध आला तया ॥ १६ ॥ येकनाथा ह्मणे मागा कांहीं आतां । भाक घेवोनी त्या मागताती ॥ १७ ॥ ज्यांनीं केली चाडी तयावरी दया । पहिल्यांहूनीया करावी जी ॥ १८ ॥ वस्त्रें आणऊन देविली तयासी । दुष्टावरी ऐसी कृपा केली ॥ १९ ॥ ज्यांनीं त्या स्त्रियेसी देऊं केलें धन । तेंही त्यां हातून देववीलें ॥ २० ॥ सन्मानें येवोनी जनार्दनपाईं । वर्तमान तेंही निवेदीलें ॥ २१ ॥ संतांचें चरित्र संतांनीं ऐकावें । जिवींच धरावें भीम ह्मणे ॥ २२ ॥

**॥ श्रीराम ॥** जनार्दनस्वामीलागी केला प्रश्न । मनोजयखूण कैसी आहे ॥ १ ॥ घरींचा हिशेब येवढा जुळून देई । आज्ञा ह्मणून पाई नमन केलें ॥ २ ॥ येकनाथ तेव्हां येकाग्रचित्तानें । जमाखर्च जाण पाहाताती ॥ ३ ॥ रुका येक तेथें न लागे ह्मणोन । येकचित्त जाण केलें होतें ॥ ४ ॥ जनार्दनस्वामी पुढें उभे राहाती । हे न कांहीं पाहाती तयाकडे ॥ ५ ॥ बोलीयले स्वामी कोठें रे आहेसी । ह्मणती रुक्यापासीं होतो जी मी ॥ ६ ॥ ऐसेंच स्वरूपीं ठेवावें हें मन । मग

दृश्यभान नाहीं होय ॥ ७ ॥ भीम भव सहज तरोनीया जावें । संत-लीला भावें ऐकतांची ॥ ८ ॥

॥ **श्रीराम** ॥ येके दिनीं जनार्दनस्वामी ह्मणती । पिकपात्र क्षितीं टाकून ये ॥ १ ॥ दृष्टीं न पडेचि तेथें टाकून ये । आज्ञा ह्मणुनी काय केलें यानीं ॥ २ ॥ डोळा न पडे ऐसा येक आहे ठाव । प्राशन सद्भावें केली तेव्हां ॥ ३ ॥ ऐसी गुरुभक्ती कोणा नव्हे जाण । भीम ह्मणे पूर्ण गुरुच ते ॥ ४ ॥

॥ **श्रीराम** ॥ जनार्दनस्वामी स्वप्न जालें ऐसें । बागेंत विश्वासें येईं ह्मणून ॥ १ ॥ समागमें येकनाथासी आणावें । चालीले सद्भावें उभयता ॥ २ ॥ बागेंत फकीर पाहातां नमन । उभयता जाण करितातीं ॥ ३ ॥ कटोऱ्यांत दुग्ध श्वानीचें काढून । टुकडे भिजऊन देती यांसी ॥ ४ ॥ जनार्दनपंत प्रसाद भक्षिती । नाथ हे ठेविती शिरावरी ॥ ५ ॥ सिद्ध बोलीयले न करी भक्षण । अद्भुत कवन करील हा ॥ ६ ॥ बहुतासी भक्ती लाऊन तारील । नमस्कार केले उभयांनीं ॥ ७ ॥ उठोनी पाहातां कांहीं नाहीं तेथें । जाहाले विस्मित तये वेळीं ॥ ८ ॥ जनार्दनस्वामी ह्मणती दत्तात्रेय । कामधेनु पाहे दूध तींचें ॥ ९ ॥ यशवंतसुत आनंदेंचि गात । ठेवोनीया हेत संता-पासीं ॥ १० ॥

॥ **श्रीराम** ॥ जनार्दनस्वामी त्यांचा होता शिष्य । सुभेदार असे गुरुभक्त ॥ १ ॥ रामनवमी करी उछाह सद्भावें । स्वामीसी पुजावे प्रेमानंदें ॥ २ ॥ कासीयात्रे स्वामी जावया निघाले । येकोबा ठेवीले गृहीं तेव्हां ॥ ३ ॥ सुभेदारा नेत्रीं आले अश्रु ह्मणे । पुजेसी सांगणें काय करूं ॥ ४ ॥ ह्मणती येकनाथ प्रतिमाची माझी । तयालागीं पूजी प्रेमयुक्त ॥ ५ ॥ गेले स्वामी कासी रामनवमी आली । स्वामी ऐसी केली पुजा यांची ॥ ६ ॥ येकनाथ हात चोळीती त्या वेळीं । पुसती

त्या वेळीं ऐसें काये ॥ ७ ॥ ह्मणती स्वामी गेले विश्वेश्वरापासीं । दीप हा शालेसी लागलासे ॥ ८ ॥ विझवीले पाहाती हस्त जाले काळे । जासूद धाडीले तये वेळीं ॥ ९ ॥ वर्तमान आणीलें सत्यचि जाहालें । सद्भावें नमीले येकनाथा ॥ १० ॥ गुरुपासीं मन न हालेचि ज्याचें । सामर्थे निष्ठेचें भीम ह्मणे ॥ ११ ॥

॥ **श्रीराम** ॥ जनार्दनस्वामी कासीयात्रा करून । घरां आले जाण आनंदानें ॥ १ ॥ येकनाथें पाईं मस्तक ठेवीलें । प्रेमें आलिंगीले गुरुरायें ॥ २ ॥ पैठणांत पत्नी जाली उपवर । स्वामीलागीं पत्र धाडी माता ॥ ३ ॥ स्वामीनीं पत्रासी वाचोनी ठेवीलें । यांसी न धाडीलें पुढें ऐका ॥ ४ ॥ बहुतांनीं यांचा द्वेष करोनीया । ह्मणोनी अपाया योजीयले ॥ ५ ॥ गुरुमातेपासी जाऊन सांगती । पुत्राहूनी प्रीति याजवरी ॥ ६ ॥ येकनाथ जरी जाईल पैठणा । तरी पुत्र शाहाणा करूं आह्मी ॥ ७ ॥ स्वामीचें पुस्तक येकनाथापासीं । नित्य वाचायासी देती हेचि ॥ ८ ॥ गीतेचें पुस्तक मातेनें ठेवीलें । स्वामी बोलीयले नाथालागीं ॥ ९ ॥ आणी रे पुस्तक न सांपडे जेव्हां । सर्वांलागीं तेव्हां विचारीलें ॥ १० ॥ मातेसहीत ह्मणती नाहीं देखीयलें । कृत्रिम हें जालें आहे पाहा ॥ ११ ॥ जयानें पुस्तक ठेवीलें असेल । तयाचे जातील नेत्र आतां ॥ १२ ॥ ऐसें बोलीयले सद्गुरु ते वेळीं । नेत्रहीन जाली बाई तेव्हां ॥ १३ ॥ येकनाथा ह्मणे अन्याय जाहाला । दया तेव्हां त्यांला आली पूर्ण ॥ १४ ॥ स्वामीची प्रार्थना करोनी हस्तासी । फिरवींतां नेत्रासी तेज आले ॥ १५ ॥ गीतेचें पुस्तक आणोनी दिधलें । वर्तमान कथीलें होतें तैसें ॥ १६ ॥ येकनाथमाथां ठेवीयला हस्त । आलिंगन देत प्रेमभावें ॥ १७ ॥ जावें पैठणासी मी चतुजपासी । आहे अहिर्निसीं ऐसें मान ॥ १८ ॥ आज्ञा ह्मणोनीया आले पैठणांत । नमस्कार करीत मातेलागीं ॥ १९ ॥ गुरुघरींच्या ह्या कथा जाल्या पूर्ण । येथील कथन भीम गाय ॥ २० ॥

॥ श्रीराम ॥ जनार्दनपंतापासीं जीवप्राण । प्रपंचाचें भान नाहीं जया ॥ १ ॥ स्वामीलागीं पत्र मातेनें धाडीलें । वर्तमान लिहीलें होतें तैसें ॥ २ ॥ वाचोनीया स्वामी स्वहस्तेंचि पत्र । लिहिलें पवित्र धर्मन्यायें ॥ ३ ॥ असा तेथें करा प्रपंच आपुला । संतोष मातेला होय तेणें ॥ ४ ॥ धर्मपत्नी तिचा करा अंगीकार । आज्ञा हे साचार आहे माझी ॥ ५ ॥ जात होते स्नाना वाटेवरी पत्र । वाचीतांचि नेत्र सजल जाले ॥ ६ ॥ तया गड्यालागीं केला नमस्कार । ह्मणती वारंवार धन्य तया ॥ ७ ॥ मातेलागीं तेव्हां सांगोन धाडीलें । पत्नीला आणवीले तये स्थानीं ॥ ८ ॥ देवोनीया पाळ राहीले तेथेंचि । गुरूचे आज्ञेची प्रीति ऐसी ॥ ९ ॥ घरही कोंपट मोडकेसें होतें । ऐका जगन्नाथें काय केलें ॥ १० ॥ सावकारें घर बांधीलें नूतन । तया दिल्हें स्वप्न देवरायें ॥ ११ ॥ माझ्या येकोबासी घर द्यावें आतां । यांसीही तत्वता स्वप्न जालें ॥ १२ ॥ स्वामींनीं स्वप्नांत आज्ञा केली ऐसी । नूतन गृहासी जाई वेगीं ॥ १३ ॥ सावकार आला देवोनीया गेला । सर्व बेगमीला केलें तेणें ॥ १४ ॥ पुढील कथेसी द्यावें अवधान । संतलीला गहन भीम ह्मणे ॥ १५ ॥

॥ श्रीराम ॥ येकनाथाघरीं पाणी आणायाचा । ब्राह्मण तो साचा गेला होता ॥ १ ॥ ब्रह्मांडनायक विप्रवेष धरून । येवोनी नमन केलें त्यांसी ॥ २ ॥ यांनींही नमन करोनी भेटले । नाम विचारीलें काय ह्मणुनी ॥ ३ ॥ कृष्ण नाम माझे सेवेस राहीन । ह्मणती हे वेतन सांग काय ॥ ४ ॥ मज कांहीं इछा नाहीं घ्यावयाची । प्रीति अंतरींची संतसेवा ॥ ५ ॥ हेंचि माझें धन हाचि माझा मान । पूर्ण समाधान सेवा घ्यावी ॥ ६ ॥ तुज कोणी आहे किंवा नाहीं सांग । तेव्हां पांडुरंग बोलीयला ॥ ७ ॥ माता जिव्हा चक्षु पिता हे जाणावें । कर्ण वोळखावे सहोदर ॥ ८ ॥ हस्त पाद माझा कुटुंब हा सारा । प्रपंच वेवहारा इछा नाहीं ॥ ९ ॥ आलिंगन स्वामी देवोनी ठेविती । लग्न तुझें प्रीति

करूं आह्मी ॥ १० ॥ संतसेवेवरी प्रीति देवाजीची । भीमास हे रुचि गावयाची ॥ ११ ॥

॥ **श्रीराम** ॥ येकनाथस्वामी रामायण लिहिती । प्रेमाची हे ज्योती ऐकायांची ॥ १ ॥ सुंदरकांडांत कथा आली ऐसी । मारुती लंकेसी उडी मारी ॥ २ ॥ यांसी देहभान नाहीं तये काळीं । उडाले ते वेळीं आवेशानें ॥ ३ ॥ वाड्याबाहेर ते जावोन पडती। लोक तेथें येती धावो-नीयां ॥ ४ ॥ कृष्णापा येवोनी उठवोनी नेले । नाहीं दुखवले भीम ह्मणे ॥ ५ ॥

॥ **श्रीराम** ॥ येकनाथस्वामी कृष्णापासीं ह्मणती । नापिक निगुती बोलवावा ॥ १ ॥ आणिला बोलावोनी आसन घालोनी । बैसती जावोनी स्मश्रुलागीं ॥ २ ॥ रामायणी कथा आणोनी ध्यानांत । मनन करीत अंतर्यामीं ॥ ३ ॥ सीताशुद्धि जाली वन विध्वंसीलें । अखयासी मारीले मारुतीनें ॥ ४ ॥ इंद्रजीतें नेले हानुमंतासी लंके । रावणासी देखे सिंहासनीं ॥ ५ ॥ पुछाचें आसन करोनी त्यावरी । बैसतां विचारी लंकानाथ ॥ ६ ॥ कोणरे वानरा ह्मणे पुत्रहंता । दुत जाण सीताप-तीचा मी ॥ ७ ॥ शस्त्रविद्येआंत जे होती प्रवीण । त्याचा स्वामी जाण राम माझा ॥ ८ ॥ दुत आहे परी भुजाच्या चपेटें । मेरु हे त्रिकुट लोळवीन ॥ ९ ॥ रावण मशक ह्मणोन तोंडांत । दिली अकस्मात अव-लीळा ॥ १० ॥ येकनाथ नेत्र झांकोनी ध्यानस्त । न्हाव्याच्याच देत तोंडावरी ॥ ११ ॥ मग वृत्तीवरी येवोनी बोलती । तया संमोखीती दयावंत ॥ १२ ॥ रावणाच्या तोंडावरी मारुतीनें । दिली तेथें मन गेलें माझें ॥ १३ ॥ पुन्हा हजामत करावया लागे । स्वामी नेत्र वेगें लावोताती ॥ १४ ॥ पायावरी शीर ठेवोनीया ह्मणे । लंकेसी न जाणे क्षणभरी ॥ १५ ॥ ऐसें ध्याननिष्ठ ऐसे गुरुभक्त । भीम त्यासी गात आवडीनें ॥ १६ ॥

॥ **श्रीराम** ॥ येकनाथा घरीं पितृश्राद्ध आलें । ब्रह्मणासी दिल्हें आमंत्रण ॥ १ ॥ कृष्णापा घरांत कारभारी सर्व । स्वैंपाक अपूर्व सिद्ध होये ॥ २ ॥ स्वामी स्नान करूनी गेले माडीवरी । मोळ्या घेऊन शिरीं जाती खालीं ॥ ३ ॥ अंतेज जातीचे तयां गेला वास । ह्मणती धन्य यांस भक्षीती ते ॥ ४ ॥ स्वामीनीं कृष्णापा आणिला बोलाऊन । ह्मणती सर्व अन्न विटाळलें ॥ ५ ॥ अंतेजाचें मन गेलें स्वैंपाकांत । अन्न हें समस्त यांसी द्यावें ॥ ६ ॥ कृष्णापा तयांसी रांडापोरासहित । आणोनीयां देत भोजनासी ॥ ७ ॥ पाहोनी ब्राह्मण क्षोभले अद्भुत । पुन्हा हे करीत स्वैंपाकासी ॥ ८ ॥ जालीं अन्नें सिद्ध न येती ब्राह्मण । केलें कृष्णापानें नवल ऐका ॥ ९ ॥ त्यांचेच वडील स्वर्गी गेले होते । आणोनीया देत भोजन त्या ॥ १० ॥ विडे देवोनीया यांसी शिव्या देत । गेले अकस्मात ऊर्ध्वपंथें ॥ ११ ॥ येकनाथाचीया घरीच्या अन्नासाठीं । देवा इच्छा पोटीं भक्षायाची ॥ १२ ॥ ऐसें हें आश्चीर्य पाहोनीया विप्र । करिती नमस्कार संतराया ॥ १३ ॥ यशवंतसुत गाय संतलीला । देवाजीची लीला देव जाणे ॥ १४ ॥

॥ **श्रीराम** ॥ येकनाथा घरीं कीर्तनासी नित्य । येक शूद्र नित्य येत होता ॥ १ ॥ तयासी अनुताप जाला घर तेणें । लुटवोनी जाण काय केलें ॥ २ ॥ स्त्रीयेसहीत स्वामीसेवा करावया । दारापासीं तया राहिलासे ॥ ३ ॥ झाडलोट करी चिंध्याचाची पोत । प्रकाश रात्रींत स्वामीपुढें ॥ ४ ॥ कांतेचें फाटकें वस्त्र त्याची चिंता । न मागे तत्वता स्वामीपासी ॥ ५ ॥ स्वामीच्या मनांत आलें द्यावें परी । कृष्णापा निवारी तयालागी ॥ ६ ॥ मागे तेव्हां देऊं हाट त्याचा पाहूं । मग वस्त्र देऊं तयालागीं ॥ ७ ॥ पांचा हजाराचा कर्जदार आला । स्वामीसी बोलीला उग्र रूपें ॥ ८ ॥ आजी द्यावें द्रव्य कृष्णापा ऐकोन । देऊं ह्मणतां जाण गेला वेगें ॥ ९ ॥ चार तोंडे चौघा गड्यापासीं दिलें । येकासी पाहीले गडी नाहीं ॥ १० ॥ यासी बोलाऊन दिल्हा डोईवरी ।

जातां वाटेवरी फुटला याचा ॥ ११ ॥ गोळा केले सर्व रुपये तयांत । चोरोनी मुखांत धरी दोन ॥ १२ ॥ देतां उणें आले देवानी दिधलें । घरासी पातले पुढें ऐका ॥ १३ ॥ मुखांतुनी टाकी मुखीं आहेतची । रास रुपयाची पुढें जाली ॥ १४ ॥स्वामी देव आले निवारण जाले । दरिद्रही गेलें भीम ह्मणे ॥ १५ ॥

॥ **श्रीराम** ॥ येकनाथस्वामी गंगास्नान करून । येतां कुटीळानें काय केलें ॥ १ ॥ पीक अंगावरी टाकी अकस्मात । पुन्हा स्नान करीत आनंदानें ॥ २ ॥ ऐसें तीन वेळ केलें परी चित्तीं । नयेची विक्रुती तीळप्राय ॥ ३ ॥ घरां आले मग पात्र वाढोनीयां । तयालागीं पाहा पाठवीले ॥ ४ ॥ भक्षितां प्रसाद अनुताप जाहाला । येवोनी स्वामीला नमन केलें ॥ ५ ॥ अनोपकारीया करिती उपकार । शांतीच अपार भीम ह्मणे ॥ ६ ॥

॥ **श्रीराम** ॥ येकनाथस्वामीपासीं शिष्य येक । येवोनीया देख पूजा केली ॥ १ ॥ अपूर्व मंदील दिधला तयानें । मस्तकीं बांधोन भावयुक्त ॥ २ ॥ गांवाच्या बाहेर गेले शौच्या तेथें । अडावरी होते श्वान येक ॥ ३ ॥ तृषाक्रांत जालें स्वामीनीं पाहीलें । मंदील बांधीलें तांब्यालागीं ॥ ४ ॥ न पुरे ह्मणोनी मध्येंची फाडीती । उदक काढीत अडांतुनी ॥ ५ ॥ उताणें पाडोनी पोट खोलावोनी । पाजोनीया पाणी स्वस्थ केलें । ऐसे दयावंत मंदील फाडीत । आत्माच पाहात भीम ह्मणे ॥ ७ ॥

॥ **श्रीराम** ॥ येकनाथा घरीं आहेत श्रीहरी । काय कोणा सरी नव्हे यांची ॥ १ ॥ जनार्दन स्वामी आणि दासोपंत । गुरुबंधु सत्य साक्षात्कारी ॥ २ ॥ दासोपंत जोगाईचा अंबा तेथें । राहाती हे तेथें गेले पाहा ॥ ३ ॥ भेटी गोष्टी जाल्या आनंदें बैसले । मग विचारीलें जनार्दना ॥ ४ ॥ बहु शिष्य तुवां केले त्यांत कोणी । घरी देव आणी

ऐसा आहे ॥ ५ ॥ येकनाथ माझा आहे पैठणांत । उपासना तेथ उभी आहे ॥ ६ ॥ सद्गुरु स्वमुखें करिती ज्याची स्तुती । तोचि शिष्य क्षितीं धन्य जाणा ॥ ७ ॥ जनार्दनपंत गृहालागीं गेले । दासोपंत आले पैठणासी ॥ ८ ॥ येकोबानीं संता सामोरें दों कोसा । वरी जावें ऐसा नेम ज्यांचा ॥ ९ ॥ ऐसें असे ह्मणुनी पुढें दासोपंत । शिष्यासी धाडीत सुचनेसी ॥ १० ॥ आले शिष्य त्यांसी पाहा कृष्णापानीं । दिले धुडावोनी द्वारांतून ॥ ११ ॥ गांवाजवळी आले सांगों पाठवीले । कृष्णापा बोलीले तयांलागीं ॥ १२ ॥ दूर असतां कां रे जवळी ह्मणतां । फिरारे जा आता क्रोधें ह्मणे ॥ १३ ॥ दासोपंता ह्मणती द्वारांत ब्राह्मण । धुडावोनी ह्मणे रागें रागें ॥ १४ ॥ येकनाथाचीया द्वारापासीं आले । मनीं खिन्न जाले होते बहु ॥ १५ ॥ द्वारीं जों पाहाती दत्तात्रेयमूर्ति । नमस्कार प्रीति केला तेव्हां ॥ १६ ॥ ह्मणती स्वामी येथें उभे कां राहीला । येकनाथें गोवा केला ह्मणती ॥ १७ ॥ येकनाथ आहे ब्रह्ममूर्ति त्यासी । सांडोनी आह्मासी जाववेना ॥ १८ ॥ येकनाथा कळतां वर्तमान आले । प्रेमें गहीवरले प्रेमभावें ॥ १९ ॥ परस्परें नमस्कार घालीताती । बोल बोलताती प्रेमभावें ॥ २० ॥ सन्मान नाथानीं गुरु ऐसा केला । संतोषें गृहाला गेले मग ॥ २१ ॥ धन्य येकनाथ धन्य निष्ठावंत । मनांत स्तवीत भीम ह्मणे ॥ २२ ॥

॥ **श्रीराम** ॥ येकनाथस्वामी चालीले स्नानासी । आतमाच पाहाती जेथें तेथें ॥ १ ॥ लोणाऱ्याचें येक गाढव सुटोनी । सेतांत जावोनी खाय फार ॥ २ ॥ पाहोनीया शूद्रा कोप आला भारी । कोंडीयलें थोरी कांट्यामाजी ॥ ३ ॥ याचा येईल धनी मग मारूं त्यासी । मुक्या जीवनासी न मारीच ॥ ४ ॥ दडोनी बैसला तंव नाथ आले । पाहातांचि जाले सद्गदीत ॥ ५ ॥ उष्णे तृषाक्रांत जालेसें पाहोन । आंगे कांट्या जाण काढीयल्या ॥ ६ ॥ गंगेवरी आणुनी पाणी जों पाजिती । येतो शूद्र पाहाती धांवतची ॥ ७ ॥ स्वामीस पाहोन उभा राहे तेथ ।

ह्मणे माझें सेत बुडवीले ॥ ८ ॥ येकनाथा ह्मणे पाहा चला सेत । पाहाती तों तेथ कांहीं नाहीं ॥ ९ ॥ जैसें होतें सेत तैसेंचि जाहालें । स्वामीपाईं केलें दंडवत ॥ १० ॥ ह्मणती येकनाथ आमुचें गाढव । न मारीलें भाव धन्य तुझा ॥ ११ ॥ भूतमात्रीं दया ऐसी ज्याची पूर्ण । तेथें नारायण भीम ह्मणे ॥ १२ ॥

॥ **श्रीराम** ॥ येकनाथस्वामी बैसले भोजना । कृष्णापा हा जाणा तूप वाढी ॥ १ ॥ थोडें तूप ह्मणूनी बोलीले मातेसी । वाढावें तुपासी आज तुह्मी ॥ २ ॥ कृष्णापारे थोडें तूप ह्मणऊन । बरे मी वाढीन असों देई ॥ ३ ॥ तूप वाढीयलें सर्वा सारीखेंचि । पतिव्रता साची काय करी ॥ ४ ॥ नाथाचींये पात्रीं भरीयला द्रोण । सर्वही भोजन करितातीं ॥५ ॥ स्वामीनीं तुपासी न लावीला हात । दिल्हें नाहीं तीर्थ तये दिसीं ॥ ६ ॥ उदकही प्राशन केलें नाहीं पाहा । पतिव्रता माहा नेमवती ॥ ७ ॥ द्वितीय दीनही तैसाची जाहाला । परी हे सत्वाला न सोडीच ॥ ८ ॥ स्वामी देती तीर्थ तेंव्हांचि भोजन । करीन हा पण सत्य जीचा ॥ ९ ॥ तृतीय दिवसीं नैवेद्याची वेळ । वाढोनी आणीलें ताट पुढें ॥ १० ॥ दावोनी नैवेद्य वैश्वदेवा केलें । पुन्हा जाणा आले देवापासीं ॥ ११ ॥ तुळसीचें तबक भरलेसें पाहोनी । बैसोनी आसनीं वाहातातीं ॥ १२ ॥ नैवेद्याची भ्रांती घंटानाद होतां । दुजे ताट माता वाढी जाणा ॥ १३ ॥ तयाचाही पुन्हा नैवेद्य अर्पिला । ध्यानांत पाहीला देवराणा ॥ १४ ॥ तांबूल मुखांत न घेतीच ग्रास । मनांत उदास जाले तेंव्हां ॥ १५ ॥ कृष्णापा बोलीला नैवेद्य जाहाला । पुन्हा कां देवाला जेववीतां ॥ १६ ॥ ध्याननिष्ठ स्वामी दृश्यस्मृती नाहीं । तुपाचीच पाहीं धरीली कैसी ॥ १७ ॥ तीन दिवस जाले उपोषणा-लागी । तीर्थ द्यावें वेगीं आजी तरी १९ ॥ तीर्थ देवोनींया भोजनही जालें । भीमें हें वर्णीलें संकळीत ॥ २० ॥

**॥ श्रीराम ॥** येकनाथाघरीं होते देवराव । अद्भुतचि भाव कृष्णजीचा ॥ १ ॥ नाथाचीया हातें श्रीमुखांत खावी । ऐसें आलें जीवीं देवाजीचे ॥ २ ॥ क्षेत्रा आमंत्रण दिल्हे भोजनासी । स्वैंपाक चालीसी लावीयला ॥ ३ ॥ स्वामी स्नान करूनी सहजांत पाहाती । घृत नाहीं ह्मणती कृष्णापासी ॥ ४ ॥ कोणापासोनीया आणावें सांगाल । मोलेवीण दील सांगा कोण ॥ ५ ॥ ह्मणती रामशेटमोदी त्यापासोनी । त्वरें जाय आणी गमूं नको ॥ ६ ॥ आज्ञा ह्मणे परी न जातां स्वामीसी । विस्मय मानसीं जाला बहु ॥ ७ ॥ दोन तीन वेळे विचारीतां ह्मणे । आणूं मी कोठून सांगा स्वामी ॥ ८ ॥ आले विप्र सर्व पात्रेंही वाढीलीं । तुपाचीच जाली वेळ जेव्हां ॥ ९ ॥ स्वामी ह्मणती वाढावया तूप आण । कृष्णापा कोठून आणूं ह्मणे ॥ १० ॥ ऐकतांचि दिल्ही श्रीमुखांत जेव्हां । दुजा गाल तेव्हां पुढें करी ॥ ११ ॥ देतां दुज्यावरी हर्ष जाला बाप । पाण्याचेंची तूप करुन वाढी ॥ १२ ॥ बुद्धिदाता सर्व आपण श्रीहरी । संतापासी खरी प्रीत याची ॥ १३ ॥ यशवंतसुत संतांचा अंकीत । ह्मणुनी लीला गात आनंदानें ॥ १४ ॥

**॥ श्रीराम ॥** येकनाथापासी आली येक बाई । गुळ तीचा खाई पुत्र तेव्हां ॥ १ ॥ स्वामीलागीं ह्मणे फार गुळ खाणें । या कांहीं सांगणें तुह्मी तरी ॥ २ ॥ तयासी ह्मणती खाऊं नको गुळ । मान्य करुनी मूल गेले ॥ ३ ॥ स्वामीही घरांत सांगती सर्वांसी । गुळाचे आह्मांसी व्रत आहे ॥ ४ ॥ वर्ज केला गुळ क्षीर न कळत । शर्करामिश्रीत भक्षीयली ॥ ५ ॥ भोजन जालीया तांबूलाचे वेळे । तेव्हां जाणवीले कृष्णापानें ॥ ६ ॥ ऐकतां वमन केलें तये क्षणीं । अद्भुतचि करणी दावीयली ॥ ७ ॥ गुळचि न खाय परी मूल क्षीण । दिवसेंदिवस जाण होऊं लागे ॥ ८ ॥ पुन्हा स्वापीपासीं आले घेवोनीया । ह्मणे गुरुराया पाहा यातें ॥ ९ ॥ होतें तैसें करा ऐकोन ह्मणती ।

बाळा खाय प्रीति गुळ आतां ॥ १० ॥ तेंही **खाय** तेव्हां आपणही खाती । ऐसी आहे भक्ती भीम ह्मणे ॥ ११ ॥

॥ **श्रीराम** ॥ ॥ येकनाथस्वामींवरी ब्राह्मणानें । तुफान घेवोन काय केलें ॥ १ ॥ पठाणासमीप नेले जार स्त्रीसी । येकनाथ ईसी गेले ह्मणे ॥ २ ॥ हाकीमें नाथासी बोलावोंनी नेले । ह्मणती ऐसें केलें काय तुह्मी ॥ ३ ॥ तयेसी पाहोनी ह्मणती सत्य सांग । नाहीं तरी अंग कुष्ट होय ॥ ४ ॥ असत्य बोलतां गळत कुष्ट जाला । वाहोंच लागला क्षणामाजी ॥ ५ ॥ पठाण नाथांच्या पायावरी लोळे । वेर्थचि छळीले ह्मणे स्वामी ॥ ६ ॥ जार स्त्री येवोनी तेही पाया लागे । वर्तमान सांगे होतें तैसें ॥ ७ ॥ दया तेव्हां आली तीर्थ देवोनीया । होती तैसी काया केली तिची ॥ ८ ॥ सर्वांसी सद्भाव लावोनी भक्तीसी । करणी केली ऐसी भीम ह्मणे ॥ ९ ॥

॥ **श्रीराम** ॥ येकनाथा पुत्र जाहाला पवित्र । हारबाजी विचित्र नाम ज्याचें ॥ १ ॥ बुद्धिबळें त्यांनीं कासीस जावोनी । पंडीत होवोनी आले घरा ॥ २ ॥ नाथ ह्मणे भ्रष्ट सोवळें उत्कृष्ट । निंदेमाजी नष्ट पुण्य जालें । । ३ ॥ आपुलेच हातें करावा स्वैंपाक । नाथा दया देख आली त्यांची ॥ ४ ॥ गांवामध्यें बाई सांगे भोजनासी । नाथ हारबाजीसी सांगवीती ॥ ५ ॥ पात्र वाढीयलें हेही पाहाताती । उचलोनी देती बाईलागीं ॥ ६ ॥ दुजें पात्र खालीं जैसें होतें तैसें । वाढीलेंच असे घवघवीत ॥७॥ अगांतुक चौघे आले त्यांसी पात्रें । दिधली विचित्रें पाहाती हे ॥ ८ ॥ जाला अनुताप येवोनी **स्वामीसी** । ह्मणती या दिनासी येक द्यावें ॥ ९ ॥ निंदेनें पुण्याचा क्षय जाला सर्व । आतां तरी गर्व करूं नको ॥ १० ॥ केली कृपा **पूर्ण दिलें** पात्र त्यासी । माझ्या कवनासी वाची आतां ॥ ११ ॥ **अभिमानरहित** केला भक्त पूर्ण । भीम सांगे खूण कृपेची हे ॥ १२ ॥

॥ **श्रीराम** ॥ येकनाथस्वामी स्नाना गेले जेव्हां । पाणी थंड तेव्हां काय केलें ॥ १ ॥ जाळ घालितांना धुरचि लागला । गंगेसी स्नानाला जाती तेव्हां ॥ २ ॥ मार्गीत कुटाळ ह्मणे तोंड कैसें । खाप-राची ऐसें दिसताहे ॥ ३ ॥ मागे कृष्णापासी आला कोप जेव्हां । स्वामी शांत तेव्हां करिती त्यासी ॥ ४ ॥ खं शब्दें आकाश यापर जें ब्रह्म । तयाचें उपम दिल्हें त्याने ॥ ५ ॥ व्यर्थ तयावरी कां गा क्रोधा येसी । ऐकतां पायासी तोही लागे ॥ ६ ॥ यशवंतसुत ह्मणे संत शांत । देवही अंकित जाला असे ॥ ७ ॥

॥ **श्रीराम** ॥ येकनाथ गंगास्नान करोनीया । तीरीं गुरुराया आठवीले ॥ १ ॥ विप्र येक परीस होता तयापासी । जावया तो कासी-यात्रेलागीं ॥ २ ॥ नाथापासीं आला परीस दिधला । ह्मणे रक्षा याला जीवाहूनी ॥ ३ ॥ गंगातीरीं शिळा त्यावरी ठेवोनी । हा गेला तेथोनी यात्रेलागीं ॥ ४ ॥ यांसी नाहीं स्मरण हे आले गृहासी । वर्ष येक त्यासी जाल्यावरी ॥ ५ ॥ विप्र आला ह्मणे द्यावा आतां परीस । तेव्हां हे गंगेस जाती पाहा ॥ ६ ॥ जये स्थानीं होता ठेविला तैसाचि । रक्षणा गंगाची करी पाहा ॥ ७ ॥ विप्र आनंदला घेवोनीया गेला । ऐसी संत-लीला भीम गाय ॥ ८ ॥

॥ **श्रीराम** ॥ येकानाथस्वामीपासी बाई येक । आली पुत्र देख मागावया ॥ १ ॥ ह्मणे पुत्र स्वामी द्यावा येक मज । कृष्णापा सहज आले तेथें ॥ २ ॥ ह्मणती इच्या दैवीं पुत्र नाहीं स्वामी । निर्दय हे भूमी आहे जाणा ॥ ३ ॥ खडकावरी कैसें पीक होय सांगा । तैसाची हा जागा आहे जाणा ॥ ४ ॥ उदईक अनुभव याचा दाखवीन । ऐकतां तेथून तेही गेली ॥ ५ ॥ दोनप्रहरां गेली गंगेला स्नानासी । यानेंही स्वामीसी नेले तेथें ॥ ६ ॥ स्नान करुनी येतां अंतेज्याचें मूल । दरडी-

---

१ खापर = खंपर = खं+पर = आकाशाच्या पलिकडचें = ब्रह्म

वरून आले भूमीवरी ॥ ७ ॥ तप्त वाळूवरी रडे लोळे त्यासी । पाहोनी दृष्टीसी बाई गेली ॥ ८ ॥ मागें स्वामी येती उचलोनीयां घेती । नेवोनीया देती ज्याचे त्यासी ॥ ९ ॥ पुन्हा स्नान करुनी गृहासी पातले । कृष्णापा बोलीले स्वामीलागीं ॥ १० ॥ बाईचें अंतर पाहीलें कीं आतां । तिळप्राय चित्ता द्रव नाहीं ॥ ११ ॥ दया तेथें देव शास्त्रही प्रमाण । भूतदयेवीण मुक्ती नाहीं ॥ १२ ॥ अभिमान ज्यासी नर्क होय त्यासी । सांगती बाईसी स्पष्ट मग ॥ १३ ॥ ऐसींच चरित्रें केलीं अभिनव । धरोनीया भाव भीम सांगे ॥ १४ ॥

**॥ श्रीराम ॥** येकनाथस्वामी रामायण लिहीतां । ध्यानीं स्तब्ध होतां देव लीही ॥ १ ॥ येके दिसीं येक श्वपच[1] भावीक । होता तेथें येक नवल जालें ॥ २ ॥ स्त्रीयेलागीं ह्मणे स्वामीसी भोजन । घरीं आणून जाण द्यावें वाटे ॥ ३ ॥ आला दारापुढें मनांत प्रार्थना । करी ह्मणे दीना तारा आजी ॥ ४ ॥ मुख धुतां मान वांकडी होतांना । ह्मणे गुरुराणा येऊं ह्मणती ॥ ५ ॥ स्त्रीयेसी सांगत आनंद बहुत । घर सारें धूत तये वेळीं ॥ ६ ॥ सडासंमार्जन निर्मळ करून । वोलें वस्त्र जाण नेसे कांता ॥ ७ ॥ स्वैंपाक सुंदर केला पाट मांडी । पाचारूं आवडीं ह्मणे आतां ॥ ८ ॥ द्वारीं येवोनीयां स्वामीसी पुसत । तया सांगत शिष्य तेव्हां ॥ ९ ॥ भोजन करोनी केली निद्रा ह्मणती । नेत्रीं अश्रु येती तेव्हां यांचे ॥ १० ॥ गृहा येवोनीया कांतेलागीं ह्मणे । उपेक्षीलें जाण नाथजीनीं ॥ ११ ॥ आतां हें जीवित्व कासया ठेवावें । दार लावी भावें अग्नी द्याया ॥ १२ ॥ प्राणाचा संकल्प केला तेव्हां देव । आले याचा भाव पाहोनीया ॥ १३ ॥ स्वामीचेंची रूप धरोनी बोलीले । द्वार कां लावीलें उघडी वेगीं ॥ १४ ॥ उघडोनीया द्वार घाली दंडवत । नेवोनीया अंत बैसवीले ॥ १५ ॥ भोजन करितां ब्राह्मण मार्गीत ।

---

१ चांडाळ.

पाहोनी ह्मणती भ्रष्टाकार ॥ १६ ॥ वाड्यामाजी आले नाथासी पाहीलें । कीर्तनीं रंगले प्रेमभावें ॥ १७ ॥ ह्मणती नाथरूपें गेला तेथें देव । जावोनीयां पाय धरूं चला ॥ १८ ॥ आले तंव देव जेवोनीया गेले । पात्रही जाहालें गुप्त तेथें ॥ १९ ॥ भक्ती केली तैसा होतो नारायण । भीम आवडीनें लीला गाय ॥ २० ॥

॥ **श्रीराम** ॥ येकनाथकन्या नाम लीलाबाई । प्रीति तिचे ठाईं बहु असे ॥ १ ॥ वरुषें जाली सात लग्नाची योजना । लोक करिती जाणा ठाईंठाईं ॥ २ ॥ विश्वंभर नामें विप्र येक आला । कोणी नाहीं त्याला मागें पुढें ॥ ३ ॥ भोजना बैसतां विचारिती स्वामी । दीन हें जी मी ह्मणे मुखें ॥ ४ ॥ आली दया ह्मणती काय इछा आहे । लग्न करावें हें मनीं वाटे ॥ ५ ॥ गोत्र विचारीलें घटीतार्थी आले । कृष्णापानीं दिल्हें अनुमोदन ॥ ६ ॥ मोठे मोठे आले न देवोनी त्यांसी । देवोनीया यांसी लग्न केलें ॥ ७ ॥ घरींच ठेवीले भजन कीर्तन । अनुग्रह जाण दिला तया ॥ ८ ॥ लीलाबाईचीया नारळ वोटींत । कृपेनें ह्मणत पुत्र होय ॥ ९ ॥ जाला पुत्र त्यांचें नांव मुक्तेश्वर । भारत अपार केलें ज्यांनीं ॥ १० ॥ पुढील कथेसी द्यावें अवधान । संतलीला गहन भीम ह्मणे ॥ ११ ॥

॥ **श्रीराम** ॥ येकनाथस्वामी घरीं कृष्णनाथ । बारावर्षें होते सेवेसाठीं ॥ १ ॥ सप्तशृंगीं होता ब्राह्मण तपस्वी । प्रसन्न त्या देवी माग ह्मणे ॥ २ ॥ तेन्हां ह्मणे मज दावी देवराज । स्वामी चतुर्भुज वैकुंठीचा ॥ ३ ॥ देवी सांगतां तो द्वारकेसी गेला । निग्रहचि केला देवापुढें ॥ ४ ॥ देवें दिल्हें स्वप्न जाई पैठणासी । येकनाथापासीं भेटूं तूज ॥ ५ ॥ आला पैठणासी गंगातीरीं स्नान । करुनीया जाण पाहाताहे ॥ ६ ॥ कृष्णापा पायानें पाणी उडऊन । आंगावरी जाण यांच्या जाय ॥ ७ ॥ ह्मणे रे दांडग्या पाणी कां उडवीसी । कोणाचा आहेसी सांग वेगीं ॥ ८ ॥ येकनाथा घरीं आहे मी सेवेला । शुद्ध केलें

तुला चरणोदकें ॥ ९ ॥ लोलीमराज हें नाम त्या विप्राचें । नाथ दर्शनाचें आर्त बहु ॥ १० ॥ मनामध्यें ह्मणे पारपत्य याचें । नाथापासीं साचे करूं आतां ॥ ११ ॥ तया मागें मागें नाथापासीं आला । ह्मणे देवाजीला दावा वेगीं ॥ १२ ॥ नमनानमनें आलिंगन भावें । देवोनीया देव दाखविती ॥ १३ ॥ धातुमूर्ति पाहातां ह्मणे हें कासया । चतुर्भुज तया दावी मज ॥ १४ ॥ मारी तीन हाका ह्मणी[1] ईलें[2] देव । कैसा नवलाव जाला तेथें ॥ १५ ॥ हाक मारितांचि कृष्णापा येवोन । उभा राहे जाण स्वामीपुढें ॥ १६ ॥ स्वामी ह्मणती जाई आह्मी देवाजीसी । पाचारितां येसी कासया तूं ॥ १७ ॥ गेला दुजी हाक मारितांचि आला । नाथ ह्मणती त्याला मूर्खा जाये ॥ १८ ॥ आनंदेंची ह्मणे उपदेश हा असे । ताठूं नको ऐसें ह्मणती मज ॥ १९ ॥ तृतीय हाकेसी देतांची नमन । स्वामीलागीं जाण केलें प्रीति ॥ २० ॥ स्वामी ह्मणती हाकेसरिसा कां रे येसी । देव काय होसी तूंचि सांग ॥ २१ ॥ तुह्मी केलें तरी होईन मी देव । तुह्मी संतराव न करा काय ॥ २२ ॥ हो हो पाहूं ह्मणतां जाहाले प्रगट । प्रभा हे उत्कृष्ट फांके तेथें ॥ २३ ॥ चतुर्भुज पितांबरधारी रम्य । शंख चक्र पद्म गदा हातीं ॥ २४ ॥ पाहोनी सुंदर रूप मनोहर । केला नमस्कार उभयांनीं ॥ २५ ॥ उठोनी पाहाती तंव कांहीं नाहीं । ऐसी लीला पाही भीम गाय ॥ २६ ॥

**॥ श्रीराम ॥** येकनाथें बहु करुणा केली जेव्हां । स्वप्नीं आले तेव्हां देवराव ॥ १ ॥ बोध करोनीया केलें समाधान । ह्मणती आमुचें लग्न करी आतां ॥ २ ॥ मग नाथें केलें रुक्मिणस्वैंवर । देवाचाही वर असे तयां ॥ ३ ॥ सतकांड केलीं रामायणें ऐसीं । वाचितां रामासी सुख होये ॥ ४ ॥ अकस्मात राम ह्मणतां प्राण गेले । शिष्यही मिळाले बहुसाल ॥ ५ ॥ लीलाबाई आली आक्रोश करीत । नेत्र उघडीत स्वामी

---

१ ह्मणजे. २ येईल.

तेव्हां ॥ ६ ॥ ह्मणती लीले बोध तुज सर्वांहून । त्याचें काय चिन्ह दाखवीसीं ॥ ७ ॥ वृथाच कां शोक करिसी हें सांग । ज्ञान तुझें सोंग ऐसें जालें ॥ ८ ॥ ह्मणे स्वामी जना ऐसें केलें तुह्मी । माझें मनोधर्मीं ऐसें आहे ॥ ९ ॥ कीर्तन करीत गंगातीरा जावें । आह्मासी सांगावें तेथें कांहीं ॥ १० ॥ अवश्य ह्मणोनी उभेच राहोन । करीत कीर्तन चालीयले ॥ ११ ॥ गंगेंत येवोनी करोनीया स्नान । स्वात्मसुख जाण केलें तेथें ॥ १२ ॥ मग रामरूप जालीया घरासी । येवोनी मानसीं विचारीती ॥ १३ ॥ उत्तरकांडाची समाप्ती राहीली । गांगोबास केली आज्ञा त्याची ॥ १४ ॥ घोडीं तो राखीत होता भोळा भक्त । ग्रन्थाची समाप्त त्याचे हातें ॥ १५ ॥ सर्व गर्वहात केलें गुरुरायें । भीम सदां गाय संतलीला ॥ १६ ॥

॥ **श्रीराम** ॥ येकनाथाचीया चितेंत पिंपळ । जाला तो केवळ दाहा दिसां ॥ १ ॥ अद्यापी अश्वत्थ आहे तो तैसाची । जावोनी पाहाती विश्व जन ॥२॥ येक शिंपी भक्त शिष्य तो स्वामीचा । नेम होता त्याचा तोही ऐका ॥ ३ ॥ धोत्रजोडा प्रतिवर्षी उंच येक । स्वामीलागीं देख नेसवी तो ॥ ४ ॥ गेला होता नागपुराला खेपेसी । आधीं घे स्वामीसी जोडा उंच ॥ ५ ॥ खेप घेवोनीया गांवापासीं आला ॥ माजासी बांधला होता जोडा ॥ ६ ॥ जाला काळ ऐसें ऐकतांची पडे । ह्मणे आतां जोडे नेसे कोण ॥ ७ ॥ गंगेपासीं आला तो नाथ पाहीले । आनंदें बैसले देखतांचि ॥ ८ ॥ पायांवरी करी दीर्घ दंडवत । स्वामीही भेटत प्रेमानंदें ॥ ९ ॥ जोडाही नेसले समाधान जालें । शिष्यें विनवीलें गुरुराया ॥ १० ॥ स्वामी तुह्मी मेला ह्मणून वाटेसी । दुष्टानें आह्मासीं निवेदीलें ॥ ११ ॥ स्वामी ह्मणती कोणी मेलेही ह्मणती । अमर जाणती जनीं कोणी ॥ १२ ॥ नाथासी नमन करोनी गृहांत । ये कळे

---

१ माज=कबर.

नाथ गेले सत्य ॥ १३ ॥ ह्मणे म्यां देखीले धोत्रेंही नेसले । पाहावया आले मिळोनीया ॥ १४ ॥ तंव तये स्थानीं कांहीं नाहीं जाणा । धन्य गुरुराणा ह्मणती सर्व ॥ १५ ॥ येकनाथस्वामी तयांचीं चरित्रें । गाईलीं पवित्रें अल्प ज्ञानें ॥ १६ ॥ कथा संतमुखें जाहाल्या श्रवण । तितुक्या मात्र जाण लिहिल्या भावें ॥ १७ ॥ यशवंतसुत संतांचा अंकित । भाव धरुनी गात लीला ऐसी ॥ १८ ॥

॥ **श्रीराम** ॥ **संपूर्णमस्तु** ॥

---

# वामनस्वामी

॥ **श्रीराम** ॥ वामन गोसांवी पंडीत माहान । कासीयात्रे जाण जात होते ॥ १ ॥ मनांत कासीचे पंडीत जिंकावे । ऐसें मनोभावें असे पाहा ॥ २ ॥ क्षेत्राच्या समीप तीन कोसावरी । अश्वत्थाचे पारीं निद्रा केली ॥ ३ ॥ विश्वेश्वरें तेथें नवल दाखवीलें । विप्रासी पाहीले ढाळो ढाळी ॥ ४ ॥ येक विप्र ह्मणे दुजया विप्रासी । त्यां मोठ्या ढाळीसी सोड आतां ॥ ५ ॥ तो ह्मणे कोणता सांग ब्रह्मग्रह । वृक्षाखाळे आहे पाहा वेगीं ॥ ६ ॥ जावोनी कासीस जिंकील सर्वांसी । मग या ढाळीसी येईल तो ॥ ७ ॥ ऐकतांची नेत्रा आले अश्रुपात । अभिमानें सत्य अधोगती ॥ ८ ॥ यात्रात्रई केली बहु नम्रपणें । मग आले जाण देशाप्रती ॥ ९ ॥ पुढील कथेसी द्यावें अवधान । भक्ती हे गहन भीम ह्मणे ॥ १० ॥

॥ **श्रीराम** ॥ वामन गोसांवी येवोनी गृहासी । पुढें मावंद्यासी आरंभीलें ॥ १ ॥ वैष्णव हे होते ह्मणोनी ब्राह्मण । वैष्णवचीं जाण बोलावीलें ॥ २ ॥ स्नाना गेले सर्व तेथें येक स्मार्त । आला अकस्मात

दशग्रंथी ॥ ३ ॥ येक दिवसाचें होतें उपोषण । क्षुधातुर जाण बहु जाला ॥ ४ ॥ विचारितां तया ह्मणे मी वैष्णव । टिळे लावी सर्व त्यांची ऐसे ॥ ५ ॥ पाठीवरी मात्र आडवा लागला । भोजनासी गेला विप्रासवें ॥ ६ ॥ पात्रेंही वाढीलीं बैसला सन्मानें । तेव्हां आंगावरून वस्त्र पडे ॥ ७ ॥ शेजारी पाहोनी गेला तो उठोनी । राखेसी आणोनी पात्रीं घाली ॥ ८ ॥ वामन गोसांवी पाहोन तयाला । उठवोनी नेला येकीकडे ॥ ९ ॥ विप्र ते समई भोजन करोन । तांबूल घेवोन पाहा- ताती ॥ १० ॥ वामन गोसांवी विभूति लावोनी । बैसती भोजनीं तयासहीत ॥ ११ ॥ तये वेळीं केला श्लोक तोही ऐका । भीम ह्मणे निका प्रसंग हा ॥ १२॥

### श्लोक

कंटाळलों मी तुमच्या मतातें । देखोनि सर्वत्र असंमतातें ॥
पाहेन मी माधव सर्व भूतीं । अद्वैतविद्या हरिच्या विभूती ॥ १ ॥

---

# केशवस्वामी

॥ **श्रीराम** ॥ केशवस्वामीची कथा ऐका गोड । देवासी आवड बहु ज्याची ॥ १ ॥ औरंगाबाजेंत रघुनाथपंत । प्रपंचीं परमार्थ केला ज्यानीं ॥ २ ॥ त्यांचें घरीं होते शागीर्दीस जाणा । कीर्तनभजनावरी प्रीति ॥ ३ ॥ भक्ती पाहून ते देती अनुग्रह । त्यानींच विवाह केला होता ॥ ४ ॥ गुरुभक्तीवरी अत्यंतची प्रेम । अहिर्निसीं नाम गाय भावें ॥ ५ ॥ येके दिसीं धोत्रें धोवयासी जाती । भजन करीती आनं- दानें ॥ ६ ॥ अविंधाची स्वारी मार्गी जात होती । देव वाढविती संत- महिमा ॥ ७ ॥ केशव गोसांवी त्याच्या स्कंदावरी । बैसले श्रीहरी येवो-

नीया ॥ ८ ॥ अविंधाची दृष्टी गेली अकस्मात । लावण्य अद्भुत बाळा-
वरी ॥ ९ ॥ कोणाचें हें बाळ पाहूं कोठें नेतो । मागें मागें जातो
येकायेकीं ॥ १० ॥ धोत्रें धुतां भजन करिती सप्रेमें । पुढें पुरुषोत्तम
नाचताहे ॥ ११ ॥ अविंध पाहोनी पुढें जात असे । तंव त्या न दिसे
बाळ तेथें ॥ १२ ॥ येवोनी विचारी नाम काय भावें । केशव स्वभावें
सांगताती ॥ १३ ॥ पाई दंडवत घाली ह्मणे बाळ । देखीलें सावळे
काये सांगूं ॥ १४ ॥ ऐकतांची नेत्रीं आले यांच्या अश्रु । ह्मणती सर्वे-
श्वरु लीला त्याची ॥ १५ ॥ सर्वस्व टाकोनी शिष्य जाला याचा । महिमा
दर्शनाचा न वर्णवे ॥ १६ ॥ देवाचें दर्शन जाहाले जयासी । मुकला
संसारासी तोची जाणा ॥ १७ ॥ घरा आल्यावरी स्वामीसी सांगती ।
आलिंगन देती गुरुराव ॥ १८ ॥ केशवा रे माझें गुरुपण आतां ।
घेई बा तत्वता कृपायुक्त ॥ १९ ॥ राघवस्वामीचे केशवस्वामी तेच ।
जाले जाणा साचे भीम ह्मणे ॥ २० ॥

॥ **श्रीराम** ॥ केशवस्वामीचे घरीं येकादसी । उपासना ज्यांसी
साह्य सदां ॥ १ ॥ अस्तमानीं सुंठ शर्करा मिश्रीत । देवासी दावीत
प्रेमानंदें ॥ २ ॥ सर्वांसी प्रसाद वांटोनी कीर्तना । उभे राहावे जाण
चारी प्रहर ॥ ३ ॥ येके येकादसी सुंठ आणायासी । वाण्याच्या घरासी
शिष्य गेला ॥ ४॥ घरीं वाणी नव्हता पुत्र त्याचा होता । बचेनाग न
कळतां दिल्हा त्यानें ॥ ५ ॥ घरास आणोन बारीक करोन । शर्करा
मिळऊन नेती तेथें ॥ ६ ॥ स्वामीनीं नैवेद्य दावोनी देवासी । प्रसाद
सर्वांसी वांटीयला ॥ ७ ॥ कीर्तनासी उभे राहीले तों वाणी । घरासी
जावोनी तेथें आला ॥ ८ ॥ केशवस्वामींच्या पदीं प्रेमें लोळे । पाझरती
डोळे तयाचेची ॥ ९ ॥ ह्मणे स्वामी तुह्मा न कळत वीष । पोरें दिल्हा
असे बचेनाग ॥ १० ॥ ह्मणती तूं कीर्तन ऐके स्वस्थ मनें । वीष हा
भगवान बाधूं न दे ॥ ११ ॥ प्रातःकाळीं मूर्ती कृष्णवर्ण जाली ।
दुधें अभिषेकीली विप्रमुखें ॥ १२ ॥ कीर्तनांत जे जे अभंग जाहाले ।

अविंधें लिहीले वरिच्यावरी ॥ १३ ॥ भक्तांचीं चरित्रें देवाजीस प्रीये । ह्मणुनी भीम गाय अहिर्निसीं ॥ १४ ॥

॥ **श्रीराम** ॥ केशवस्वामी हे पंढरीस जाती । गावोनी नाचती आनंदानें ॥ १ ॥ जयाच्या कीर्तनीं नाचताती देव । प्रेमाचा गौरव न सांगवे ॥ २ ॥ सर्व श्रोतयांच्या नेत्रीं अश्रुधारा । रोमांच शरीरावरी येती ॥ ३ ॥ येका पंडितानीं केला प्रश्न यांसी । ह्मणती या खुणेसी सांगा आह्मा ॥ ४ ॥ केशवस्वामी हे बोलीले तयाला । अभिमान हा गेला पाहिजे जी ॥ ५ ॥ पंडित बोलीला अभिमान टाकीला । सांगावे खुणेला त्वरें आतां ॥ ६ ॥ ह्मणती अभिमान टाकीला संपूर्ण । तरी जोडे घेवोन उभे राहा ॥ ७ ॥ क्रोधयुक्त ह्मणती गोसावी लबाड । भलतीच बडबड करितो पाहा ॥ ८ ॥ जालीया कीर्तन गृहा गेले सर्व । पुढेंही अपूर्व जालें ऐका ॥ ९ ॥ येके दिसीं तेची पंडित देवासी । जातां दर्शनासी देखती यां ॥ १० ॥ ह्मणती रे केशवा पायपोस शिरीं । घेवोनीया द्वारीं उभे राहे ॥ ११ ॥ विसा ब्राह्मणाचे जोडे गोळा केले । शिरींच धरीले आनंदानें ॥ १२ ॥ चार घड्या देवदर्शन घेवोनी । आनंदें येवोनी पाहती या ॥ १३ ॥ जोडे शिरावरी घेवोनी नाचती । भजन करिती प्रेमयुक्त ॥ १४ ॥ पाहोनी पंडित ह्मणे खरा संत । पायासी लागत धन्य ह्मणे ॥ १५ ॥ बोले तैसा चाले अभिमान नाहीं । तोचि संत पाही भीम ह्मणे ॥ १६ ॥

॥ **श्रीराम** ॥ केशवस्वामी हे गेले येक्या गांवीं । जन हे सद्भावी होते तेथें ॥ १ ॥ नित्य समारंभ होय कीर्तनाचा । घोष हा नामाचा न वर्णवे ॥ २ ॥ स्त्रिया पुरुष बहु येती कीर्तनासी । आनंद मानसीं सर्वांचीये ॥ ३ ॥ येके दिसीं मोठा समाज जाहाला । पठाण चालीला होता मार्गीं ॥ ४ ॥ ऐकोनी गजेर गेला पाहावया । सन्मानोनी तया बैसवीती ॥ ५ ॥ दुर्बुद्धी धरोनी बैसला कीर्तना । कृष्णलीला जाणा वर्णिती हें ॥ ६ ॥ राधेचें अत्यंत प्रेम देवाजीसी । कथा हे उल्हासीं

गात होते ॥ ७ ॥ भिंतीवरी तेथें चित्र देवाजीचें । होतें आणि राधेचें समीपची ॥ ८ ॥ राधा विडी देती न घेतीच देव । ऐसा तेथें भाव केला होता ॥ ९ ॥ पठाण बोलीला चित्रें विडी घ्यावी । कथा हे मानावी तेव्हां सत्य ॥ १० ॥ नाहीं तरी शतरुपये येकेका । पासोनीया देखा घेऊं आतां ॥ ११ ॥ द्वार बंद केलें जन गडबडीले । अश्रुपात आले सर्वांलागीं ॥ १२ ॥ केशवस्वामीनीं देवा आळवीले । नेत्र गहीवरले तये वेळीं ॥ १३ ॥ कीर्तनाची प्रीत जरी तुझा असे । तरी दावा यास लीला आजी ॥ १४ ॥ कथा दुखदाती जाहाली सर्वांसी । होय सुखरासी ऐसें करा ॥ १५ ॥ भक्तवाक्य साह्यो करी नारायण । विजे ऐसा जाण भास जाला ॥ १६ ॥ पाहाती तों विडी मुखीं देवाजीचें । नवल चित्राचें पाहोनीया ॥ १७ ॥ पठाण गडबडा पायांवरी लोळे । जळें पूर्ण डोळे जाले त्याचे ॥ १८ ॥ देव हे तुह्मीच अपराधी मी आहे । दंड करा पाहे दीनासी या ॥ १९ ॥ जयापासीं द्रव्य घ्यावेसें जितुकें । मानसांत निके आले होतें ॥ २० ॥ तितुकेंचि तयासी द्यावे आनंदानें । आज्ञा मान्य करून दिल्हे पाहा ॥ २१ ॥ तोही केला भक्त केशवस्वामीनीं । संतलीला वर्णी भीम सदा ॥ २२ ॥

॥ **श्रीराम** ॥ केशवस्वामीची कीर्ति जाली मोठी । पाछाहानें भेटी नेले यांसी ॥ १ ॥ ह्मणे कंदोरीसी[1] बैसा तुह्मी संत । येक आत्मा द्वैत नाहीं कांहीं ॥ २ ॥ सानेका[2] आणोनी ठेवीयल्या पुढें । संकट हें गाढें प्राप्त जालें ॥ ३ ॥ वराहरूपी जो भगवान तयाचें । चिंतन हें साचें केले यांनीं ॥ ४ ॥ चिंतीतांचि लघु वराहरूपासी । धरूनी हातासीं आले यांच्या ॥ ५ ॥ मुसकटीतुनिया काढोनी सोडिती । दोन चार क्षितीवरी जाले ॥ ६ ॥ पाछाह बोलीला हें काय हें काय । ह्मणती आत्मा आहे भेदातीत ॥ ७ ॥ संताचें छळण घडलें ह्मणोन । बहुत

---

१ महंमदाची मुलगी फातिमा हिच्या उहसाचें जेवण. २ बशी, ताटली.

सन्मान केला मग ॥ ८ ॥ तेथोनीया आले मग पंढरीस । तयाचा निर्वंश जाला मागें ॥ ९ ॥ देवासी निंदीतां न ये कोप कांहीं । भक्त-निंदा पाहीं साहावेना ॥ १० ॥ केशवस्वामीचीं चरित्रें अद्भुत । त्यांत संकळीत भीम गाय ॥ ११ ॥

**॥ इति श्री केशवस्वामींच्या कथा संपूर्णमस्तु ॥ शुभं भवतु ॥**

---

# निरंजनस्वामी

**॥ श्रीराम ॥** निरंजनस्वामी कऱ्हाडांत होते । सर्वांभूतीं पाहात गजानन ॥ १ ॥ येके दिसीं गेले कृष्णेच्या स्नानासी । ढेकुण धोत्रासी देखीयला ॥२॥ ह्मणती गजानन बुडेल हा आतां । घरासी मागुता नेऊं यासी ॥ ३ ॥ धरोनी गृहांत आणोनी सोडीला । ह्मणती कुटुंबाला जाणोनी घ्या ॥ ४ ॥ पुन्हा स्नान करुनी गेले ऐसी दया । ह्मणोनीया तया भेटे देव ॥५॥ निद्रा केली तेथें देवें भेटी दिली । आणि कृपा केली तये वेळीं ॥ ६ ॥ पुढील कथेसी द्यावें अवधान । संतलीला गहन भीम ह्मणे ॥ ७ ॥

**॥ श्रीराम ॥** निरंजन स्वामी कीर्तन करीती । प्रेम आलें चित्तीं असंभाव्य ॥ १ ॥ आनंदांत मुखीं आलें ज्या देवासी । सोंड नाहीं त्यासी पाहूं नये ॥ २ ॥ कुटाळी ऐकोन केलें उपहास्य । ह्मणती पुसूं यास उदईक ॥ ३ ॥ प्रातःकाळीं स्नान करोनी बैसले । निंदक मिळाले सभोंवते ॥ ४ ॥ शालिग्रामसीळा वासुदेवमूर्ति । पूजा हे करिती मनोभावें ॥ ५ ॥ त्यासी गजानन भावना करोन । दुर्वांकुर जाण वाहाती भावें ॥ ६ ॥ ब्राह्मण बोलती पाहों द्या देवासी । हे वक्रतुंडासी

आठविती ॥ ७ ॥ बळेंचि तेधवां पाहाती येवोन । शालिग्रामांतून शुंडा आली ॥ ८ ॥ चमत्कार तेंव्हां पाहोनीया सर्व । नमस्कार भावें घाली- ताती ॥ ९ ॥ भक्तानीं देवाजी होये केला तैसा । संता साह्ये ऐसा भीम ह्मणे ॥ १० ॥

---

# आनंदमूर्ति

॥ **श्रीराम** ॥ आनंदमूर्तीची कथा ऐका आतां । जो कां गुरु- भक्तां शिरोमणी ॥ १ ॥ कृष्णातीरीं ब्रह्मनाळ गांव तेथें । गुरुपासीं होते सेवेलागीं ॥ २ ॥ सद्गुरूचें नांव रघुनाथगोसांवी । रामाची करावी भक्ती सार ॥ ३ ॥ अस्तमानवरी जप कृष्णातीरीं । नैवेद्य त्यावरी देवा- जीस ॥ ४ ॥ दशमी आणि भाजी भक्षावी आपण । ऐसा नित्य जाण नेम ज्यांचा ॥ ५ ॥ श्रावणमासांत ह्मणती येके दिनीं । भाजी आजी आणी मेथीचीच ॥ ६ ॥ आज्ञा ह्मणोनीया शोध करूं गेले । मेथीसी शोधीले मळोमळीं ॥ ७ ॥ कोणी ह्मणती मेथी आहे पैलतीरीं । पाहाती तों उतारी कोणी नाहीं ॥ ८ ॥ पोहायाचा कांहीं अभ्यासही नाहीं । नि- श्चयानें पाहीं गेले पाहा ॥ ९ ॥ भरल्या पुरांतुनी चालतची गेले । भाजी घेउनी आले नवल मोठें ॥ १० ॥ करोनीया सिद्ध वाढोनीया ताट । सद्गुरु निकट आणीयले ॥ ११ ॥ विचारिती गुरु भाजी हे कोठील । वर्तमान केलें श्रुत सर्व ॥ १२ ॥ अनंदा कृष्णेनें बुडवीलें असतें । तरी कैसें होतें सांग बापा ॥ १३ ॥ ह्मणती भाजी खावी ऐसा हेत तुह्मा । कृष्णा कैसी आह्मा बुडवी सांगा ॥ १४ ॥ आलिंगन दिलें कृपा पूर्ण केली । भीमें हें वर्णिली भक्तीसार ॥ १५ ॥

॥ **श्रीराम** ॥ आनंदमूर्तीसी सद्गुरूनीं पूर्ण । स्वरूपीं अभिन्न केले पाहा ॥ १ ॥ रामरूप गुरु जाले तये वेळीं । जोडुनी बध्धांजुळी विनवीले ॥ २ ॥ चरणसंपुष्टें दिधलीं तयासी । वंदोनी तयासी ठेवीयेले ॥ ३ ॥ सोवळ्याची वरी वेष्टणें देवोनी । पुजेंत ठेवोनी प्रेमभावें ॥ ४ ॥ शिष्य जाले बहु गेले काशीयात्रे । केले त्रय यात्रे यथासांग ॥ ५ ॥ काशीमध्यें वास केला कांहीं दीन । तेथें वार्ता जाण प्रगटली ॥ ६ ॥ ब्राह्मण असतां चर्मीजोडा सत्य । घेऊनी सोवळ्यांत पुजीताती ॥ ७ ॥ मिळोनी ब्राह्मण ह्मणती पाहूं काये । आमुची गीता आहे बोलीले हे ॥ ८ ॥ पाहूं गीता ह्मणतां न देतीच पाह्या । पेटले आग्रह्या बहुसाल ॥ ९ ॥ बळेंचि वेवोनी पाहाती सोडून । यांनीं गुरुध्यान केलें तेव्हां ॥ १० ॥ चर्मीजोडा त्याची भगवद्गीता जाली । भक्तवाचा केली सत्य देवें ॥ ११ ॥ धन्य संतराव महिमा अभिनव । सर्वांसी सद्भाव जाला तेव्हां ॥ १२ ॥ आले ब्रह्मनाळा रामनवमीमध्यें । सर्वी जाले वंद्य रामा ऐसे ॥ १३ ॥ अद्यापी तयांची साक्षा आहे पूर्ण । कृष्णातीरीं जाण वृंदावनें ॥ १४ ॥ रामनवमीमध्यें डोलताती जाण । संतमहिमा गहन भीम ह्मणे ॥ १५ ॥

---

## मालोपंत

॥ **श्रीराम** ॥ मालोपंत संत विजापुराअंत । जाहाले विख्यात निश्चयानें ॥ १ ॥ पाछाहाचे होते कारभारी मुख्य । पांडुरंगीं सख्य ऐका कैसें ॥ २ ॥ कार्तीकीची वारी जावें पंढरीस । नाचावें उल्हासें देवापुढें ॥ ३ ॥ ऐसें प्रतिवर्षीं चालत असतां । अभक्तांच्या चित्ता साहावेना ॥ ४ ॥ जावयाचे दीन येतां अविंधासी । जावोनी तयासी सांग-

ताती ॥ ५ ॥ फौजेचे हिसेब तंटा आहे मोठा । सर्वही गळांठा होऊं पाहे ॥ ६ ॥ मालोपंता यंदा राहोनीया ध्यावे । पंढरी न जावे ह्मणिजे ठीक ॥ ७ ॥ सर्व कारकून मिळोन रायासी । परोपरी त्यासी समजाविती ॥ ८ ॥ इतुक्यांत हे आले निरोप मागाया । पंढरीस जाया आनंदानें ॥ ९ ॥ ह्मणती आज्ञा द्यावी पंढरीस जातो । सत्वरची येतो जावोनीया ॥ १० ॥ ह्मणे राव आज्ञा नाहीं जावयाची । ऐसें ऐकतांची बोलीयले ॥ ११ ॥ माझी वारी आहे जाईन मी आतां । बोलोनी तत्वता गृहा गेले ॥ १२ ॥ मागें यांच्या जप्ती पाठवीली पूर्ण । बंद केले जाण मागें पुढें ॥ १३ ॥ येक दोन दिवस जालीया उपरी । हुरहुर अंतरीं लागलीसे ॥ १४ ॥ प्रांतःकाळीं केलें तुळसीचें निमित्य । निघोनीया जात आनवाणी ॥ १५ ॥ गांडीस धोतर येक अंगोस्तर । ह्मणोनी सत्वर जाऊं दिले ॥ १६ ॥ गेले चार कोस येका गांवीं तेथें । सर्व अर्जमांत[1] आले भेटी ॥ १७ ॥ तेथें सरंजाम सर्व सिध्ध केला । पंढरीस गेला भक्तराज ॥ १८ ॥ चंद्रभागे स्नान देवाचें दर्शन । प्रपंचाचें भान सोडीयलें ॥ १९ ॥ मागें वर्तमान दोन प्रहर होतां । गेले ऐसी वार्ता जाली तेथें ॥ २० ॥ रक्षक पाहाती कोठें न दिसती । त्यांनीं रायाप्रती श्रुत केलें ॥ २१ ॥ अद्भुतची क्रोध तेव्हां आला जाणा । रांडापोरें आणा ह्मणे त्याचीं ॥ २२ ॥ संकट अद्भुत होतां देव आले । मालोपंत जाले पांडुरंग ॥ २३ ॥ पाछाहाचे दृष्टी पडीले अकस्मात । कोप केला शांत वचनमात्रें ॥ २४ ॥ राव ह्मणे पंढरीस गेला ह्मणून । आला होता पूर्ण कोप आह्मा ॥ २५ ॥ सर्व हिसेबाचे तंटेही वारीले । फौजेसही दिल्हे रोजमारे ॥ २६ ॥ दुष्ट कारकून बंदीं घाली त्यासी । बोलीले रायासी गृहा जातो ॥ २७ ॥ पंढरीची यात्रा येईल तेव्हां भेट । वारीयले तंटे सर्व कांहीं ॥ २८ ॥ वस्त्रें अलंकार घेवोनीया आले । गृहांत राहीले पूर्ववत ॥ २९ ॥ सर्वही करिती यथास्थित परी । कांतेचे मंदीरीं

---

१ अर्जदार.

न जातीच ॥ ३० ॥ पंढरीचा नेम यात्रा आल्यावरी । येऊं सेजेवरी बोलीयले ॥ ३१ ॥ भक्तकांता देव मानीताती माता । आवडी भगवंता न वर्णवे ॥ ३२ ॥ येकमासवरी अहोरात्र देव । कीर्तन गौरव केला बहु ॥ ३३ ॥ यात्रा आनंदानें करोनी हे आले । बागेंत राहीले स्वैंपाकासी ॥ ३४ ॥ माळी बोलाऊन धाडीती गृहासी । गृहीं पाहे यांसी बैसलेत ॥ ३५ ॥ दोन मालोपंत जाले वार्ता ऐसी । फांकतां रायासी जाणवलें ॥ ३६ ॥ केला पका शोध राव आला गृहा । मालोपंत पाहा पुढें आले ॥ ३७ ॥ यांसीही घेऊनी आले बागेअंत । दृष्टादृष्टी होत गुप्त जाले ॥ ३८ ॥ मालोपंतीं सर्वां बुका लावीयला । पाछाह तयाला पुसताती ॥ ३९ ॥ परस्परें सर्व कळतां वर्तमान । आले भगवान भक्तसाह्या ॥ ४० ॥ गजेस्कंदीं मग उभयता बैसोन । वारंवार चरण वंदी राव ॥ ४१ ॥ घरासी सन्मानें वाजत गाजत । येवोनीया स्वस्थ जाले मग ॥ ४२ ॥ बंदी होते जे जे तेही मुक्त केले । भक्तीसी लावीले सर्व पाहा ॥ ४३ ॥ यशवंतसुत संतांचा अंकीत । सदा यश गात भक्ताचेंची ॥ ४४ ॥

---

# उद्धवचिद्घन

॥ **श्रीराम** ॥ उधवचिद्घन गेले शाहारास । सन्मानोनी त्यासी राहाविती ॥ १ ॥ पुढें रामनवमी आली होती ह्मणूनी । जावयाची यानीं त्वरा केली ॥ २ ॥ सर्वांनीं आग्रह करुनी राहावीले । उछाहासी केले आवडीनें ॥ ३ ॥ प्रतिपदे देवस्थापना करोन । गजरे भजन करिताती ॥ ४ ॥ पताका मृदंग लावोनी वाद्यासी । जाती मारुतीसी समारंभें ॥ ५ ॥ रस्त्यांतून जातां स्वारी अविंधाची । येतां दृष्टी त्याची

फिरली ह्मणे ॥ ६ ॥ कोणरे निशाणे लावोनी येताती । वाद्यें वाजवीती आह्मापुढें ॥ ७ ॥ क्रोध येतां ह्मणे ध्यावे या लुटोनी । तेव्हांच पळोनी गेले सर्व ॥ ८ ॥ येकटे हे उभे आले मारुतीस । धनीच आह्मास नाहीं ह्मणती ॥ ९ ॥ मारुतीच्या पुढें निग्रहची केला । देहाचा सोडीला संकल्पची ॥ १० ॥ आला कपी भार गांवांत न माये । आले भक्त-साह्ये करावया ॥ ११ ॥ कुराण पढत होतां मशीदींत । वानर काढीत मसीदीसी ॥ १२ ॥ उष्ण आले अंगावर पुढें पाहे । मोठा कपी आहे पुढें उभा ॥ १३ ॥ हात उगारोनी केला भुःभुकार । भयाभीत थोर जाला मग ॥ १४ ॥ आला मृत्य ह्मणे कोण रक्षी प्राण । संतांचें छळण घडलें आजी ॥ १५ ॥ संतांचीच आण ह्मणतां कपी गेला । चालतची आला याजपासीं ॥ १६ ॥ लोटांगण घाली ह्मणे मी अ-न्याई । लोळताहे पाई दीना ऐसा ॥ १७ ॥ देवोनी अभय उठवोनी त्यासी । केली आज्ञा ऐसी उत्छाहाची ॥ १८ ॥ मग रामनवमी अ-द्भुत जाली । भीमें हें वर्णिली संकळीत ॥ १९ ॥

---

# नामदेव

॥ **श्रीराम** ॥ नामदेवाचीया कथा ह्या वहुत । भक्तीमाळेअंत वर्णीयल्या ॥ १ ॥ राहील्या त्या संकळीत येक दोन । सांगेन भक्तीनें अभंगांत ॥ २ ॥ दामशेट बाप शांत जाल्यावरी । प्रपंच अंतरीहुनी गेला ॥ ३ ॥ बापाचाची मित्र होता सावकार । बोलीला उत्तर नामयांसी ॥ ४ ॥ नागपुरा पुत्र कापड आणाया । जाती तूंही तया-संगें जाई ॥ ५ ॥ दाहा सहस्राचें तुज भांडवल । देतों मी सांभाळ बुडऊं नको ॥ ६ ॥ बरे काका ह्मणे परी येक ऐका । मागेन मी पैका

तेथें द्यावा ॥ ७ ॥ सांगोनी पुत्रासी समागमे यासी । जाती कापडासी आणावया ॥ ८ ॥ क्षेत्र पैठणास येतां नामदेव । मनांत उछव आला यांचें ॥ ९ ॥ ह्मणे दादा माझा पैका द्यावा येथें । उदीमाचें भरतें दिसताहे ॥ १० ॥ रागें रागें त्यांनीं द्रव्य देऊन गेले । ह्मणती बुडवीले ह्मातान्यानें ॥ ११ गंगातीरीं नित्य ब्राह्मणभोजन । उछाहचि जाण आरंभीला ॥ १२ ॥ उभे राहोनीया कीर्तन करावें । सर्वांनींही यावे श्रवणासी ॥ १३ ॥ नागपुराहूनी कापड घेवोनी । पाहाती दुरोनी पताकासी ॥ १४ ॥ नामदेव गेले सामोरे मानेसी । आणीलें तयांसी सन्मानोनी ॥ १५ ॥ ब्राह्मण भोजना बैसतां ह्मणती । पाणी सोडा प्रीति नामदेवा ॥ १६ ॥ तेव्हां ह्मणती दादा आजी पाणी सोडा । क्रोध आला गाढा तयालागी ॥ १७ ॥ दाहा सहस्त्रासी पाणी कैसें सोडूं । हाडें तुझी मोडूं द्रव्यासाठीं ॥ १८ ॥ विठल गर्जोनी जेववीले विप्र । आनंद अपार नामदेवा ॥ १९ ॥ प्रात:काळीं उठुनी पंढरीस गेले । वृधा निवेदीलें जालें तैसा ॥ २० ॥ कोपारूढ जाला पैठणासी आला । सामोरे तयाला गेले मग ॥ २१ ॥ मागील्याच ऐसें यानेंही करोन । ह्मणे द्रव्य देणें झडकरी ॥ २२ ॥ त्याच दिसीं झाडा द्रव्याचाही जाला । काकानेंही केला निग्रहची ॥ २३ ॥ नामदेवा तेव्हां स्वप्न दिलें देवें । गंगेमाजी यावे घेवोनीया ॥ २४ ॥ प्रांत:काळीं नामदेव गंगातीरीं । काका धरून करीं गेले अंत ॥ २५ ॥ पाहाती तों वाडा सुंदर तयांत । पठाण पाहात बैसलासे ॥ २६ ॥ नामदेव गेले सांगाते जेवीले । देवाजी बोलीले विप्र कोठें ॥ २७ ॥ न ये अंत ह्मणुनी सिधा दिला यासी । बोले नामयासी बाटलास ॥ २८ ॥ पुन्हा उदकांत जावोनी देखती । पंढरी पाहाती अकस्मात ॥ २९ ॥ गृहासी येवोनी जंव सिधा पाहे । तंव द्रव्य आहे द्विगुणीत ॥ ३० ॥ नामदेवा ह्मणे कोण तो पठाण । ह्मणे भगवान नेणसी तूं ॥ ३१ ॥ ऐकतांची नेत्रा आले अश्रुपात । सर्वस्व वांटीत तये वेळीं ॥ ३२ ॥ तोही केला संत समागम ऐसा । भीमाच्या मानसा संतलीला ॥ ३३ ॥

॥ श्रीराम ॥ नामदेव पंढरीस होते तेथें । ज्ञानेश्वर येत तये वेळीं ॥ १ ॥ कबीरही गोराकुंभारही आला । संतांचा मिळाला समुदाय ॥ २ ॥ कार्तिकीची यात्रा जाली मग जाया । निघताती मायातीत संत ॥ ३ ॥ नामदेवा समागमें घेवोन । तीर्थावळी जाण करावया ॥ ४ ॥ मार्गी जातां येका गांवांत राहातां । विप्र येक होता भक्त तेथें ॥ ५ ॥ ज्ञानेश्वर गोराकुंभार कबीर । पाहोनीया विप्र बोले भक्ती ॥ ६ ॥ भोजनासी सांगे चौघासी आवडी । मनांतील गोडी काय सांगूं ॥ ७ ॥ घरासी येवोनी कांतेलागी ह्मणे । स्वैंपाक करणें संतालागी ॥ ८ ॥ तेही पतिव्रता पाक करी भावें । स्नानालागी जावें ह्मणे यांसी ॥ ९ ॥ गेला स्नाना मागें पुत्रालागी ह्मणे । जळण आणोन देई वेगीं ॥ १० ॥ आणावया जाये सर्पदंश होय । हाकेसरिसी जाय कांता तेथें ॥ ११ ॥ प्राण गेला तया आणोन निजवी । पतीसी समजावी वर्तमान ॥ १२ ॥ उभयता धैर्य धरोनी ह्मणती । संत घरां येती भोजनासी ॥ १३ ॥ तयांचें भोजन होवोन जातील । मग पाहूं बाळ सार्थकासी ॥ १४ ॥ आणिले बोलाऊन पात्रेंही वाढीलीं । नामदेवें केली विचारणा ॥ १५ ॥ ह्मणे बाळ वेगीं भोजना बोलावा । ऐकतांची तेव्हां न ये ह्मणती ॥ १६ ॥ गेला शाळे त्याहावया यावयाचा । नाहीं जागा साचा जेवा तुह्मी ॥ १७ ॥ नामदेव ह्मणे बाळ आल्यावीण । न होये भोजन आमुचें तों ॥ १८ ॥ भोजना सांगतां आला होता मागें । बोलावा त्या वेगें तेव्हां जेऊं ॥ १९ ॥ जेवीनात ऐसा निश्चयेची जाला । तेव्हां अश्रु त्याला आले पाहा ॥ २० ॥ विप्र ह्मणे बाळ काळानें ग्रासीला । आणूं कैसा त्याला कोठोनीया ॥ २१ ॥ नामदेव वीणा घेऊन बैसती । देवा आळविती प्रेमभावें ॥ २२ ॥ पंढरीचे संत ह्मणताती आह्मा । याची लाज तुम्हा असो द्यावी ॥ २३ ॥ आले देवराव बाळ उठवीलें । भोजन जाहालें आनंदानें ॥ २४ ॥ भक्ताचें माहात्म वाडवीतो देव । भीमासी सद्भाव गावयाचा ॥ २५ ॥

॥ **श्रीराम** ॥ नामदेव संतासवें मारवाड । देश अवघड तेथें गेले ॥ १ ॥ उदकाचें सांकडें आड येक खोल । संतराव आले तयापासी ॥ २ ॥ योगबळें ज्ञानदेवादिक जाण । करोनीया स्नान आले वरी ॥ ३ ॥ नामदेवा ह्मणती स्नान करी आतां । येणें श्रीअनंता आळवीलें ॥ ४ ॥ ऐकें बा श्रीहरी माझें तीर्थव्रत । तुजवीण चित्त नाहीं कोठें ॥ ५ ॥ योगयागतत्त्व तूंचि मायबाप । दीनावरी कोप न करावा ॥ ६ ॥ चद्रंभागे पाय अंतरले तुजे । संतासवे मज दिल्हें तुह्मी ॥ ७ ॥ यांनीं मोकलीले स्नानासी सारीले । भीमेसहीत आले पाहीजे जी ॥ ८ ॥ नेत्रीं अश्रुधारा देहभान नाहीं । कळवळोनी पाहीं आले देव ॥ ९ ॥ आडांतुनी पाणी वरी आलें जाण । वाहों लागे पूर्ण आसनाखालीं ॥ १० ॥ नामदेवा देवें केलें सावधान । ह्मणती करी स्नान भक्तराया ॥ ११ ॥ आणीकही काये इछा आहे सांग । ह्मणे पांडुरंग नामदेवा ॥ १२ ॥ नामदेव ह्मणे ऐक देवराया । उदक या ठाया असावें हें ॥ १३ ॥ विठोबारे तुझी महिमा हे राहेल । जनही वर्णील कीर्ती तुझी ॥ १४ ॥ भक्ताचें वचन नुलंघवे देवा । प्रवाह ठेवावा ऐसें जालें ॥ १५ ॥ आचापी ते नदी वाहे तया देसीं । संतमहिमा ऐसी केली देवें ॥ १६ ॥ आले पंढरीस ह्मणती पांडुरंगा । शतकोटी अभंगा करीन मी ॥ १७ ॥ करितां अभंग राहीले तेयासी । जन्म द्यावा ऐसी देवा इछा ॥ १८ ॥ तेही कथा पुढें रसाळ ऐकावी । देव भक्तां गोवी भीम ह्मणे ॥ १९ ॥

---

# तुकाराम

॥ **श्रीराम** ॥ तुकारामाचीया कथा अभंगांत । गाईयल्या हेत धरोनीया ॥ १ ॥ देहुमाजी मायबाप नामें त्यांची । निष्ठावंत साची होती जाणा ॥ २ ॥ याती जाणा शूद्र मोरोबा हें नाम । कणकाई उत्तम पत्नी त्यांची ॥ ३ ॥ होती सेतामध्यें अत्यंतची भोळी । तंव यात्रा आली आळंदीची ॥ ४ ॥ नामघोष करीत यात्रेकरु जाती । हे त्यासी पुसती कोठें जाता ॥ ५ ॥ ह्मणती यात्रेकरितां जातो आळंदीस । तुह्मी यावे ऐसें बोलीयेले ॥ ६ ॥ ऐकतांची कांता जावोनी गृहासी । पीठ बांधी कैसी चार शेर ॥ ७ ॥ घेवोनी गांठोडी उभयता निघाली । आळंदीस आली ज्ञानोबाचे ॥ ८ ॥ कीर्तन ऐकती आनंदें करोन । संतमुखांतून वाक्यें येती ॥ ९ ॥ धन्य ते कौसल्या धन्य तिची कुशी । जे रामरायासी प्रसवली ॥ १० ॥ धन्य दशरथ धन्य ते यशोदा । खेळवी गोविंदा अंकावरी ॥ ११ ॥ धन्य तेची पोटीं ज्याच्या आले देव । ऐकतां सद्भाव यांसी जाला ॥ १२ ॥ ह्मणती गोसांव्यासी आमुच्या पोटासी । कैसा हृषीकेशी ईल सांगा ॥ १३ ॥ गोसांवी बोलीले देवापासीं जावें । देवा पोटा यावें ऐसें ह्मणा ॥ १४ ॥ गेली देवाल्यांत ह्मणती ज्ञानोबासी । देवा ये पोटासी हाची छंद ॥ १५ ॥ तीन दिवस जाले तैसीच बैसली । ज्ञानोबास जाली चिंता प्राप्त ॥ १६ ॥ विप्रवेष धरून तयांस ह्मणती । देव तुह्माप्रती दाखवीतो ॥ १७ ॥ येथें देव कैचा आहे पंढरीस । ह्मणोनी तयांस उठवीले ॥ १८ ॥ अवलीळा तया आणीले पंढरी । ह्मणती याचे द्वारीं बैसा आतां ॥ १९ ॥ विठोबारे पोटा यावे ऐसें ह्मणा । उपदेश जाणा केला हाची ॥ २० ॥ अदृश्य जाहाले पाहात पाहातां । ऐसी जाली कथा भीम ह्मणे ॥ २१ ॥

॥ श्रीराम ॥ तुकोबाचे मायबाप राउळांत । जावोनी पाहात पांडुरंग ॥ १ ॥ विठोबा ये पोटा हाचि छंद घेती । निग्रह करिती अद्भुतची ॥ २ ॥ पांडुरंगा जालें संकट बहुत । रखुमाईस ह्मणत काय करूं ॥ ३ ॥ यांचें पोटीं पाहीं दुजा पुत्र नाहीं । उपायेच कांहीं नाहीं यासी ॥ ४ ॥ रखुमाबाई बोले नामदेवावरी । बाकी आहे खरी अभंगाची ॥ ५ ॥ नामदेवा ह्मणती घ्यावा जन्म तुह्मी । झाडाबाकी आह्मी करूं येथें ॥ ६ ॥ नाहीं तरी आह्मा घ्यावा लागे जन्म । ऐसाच निसीम भाव यांचा ॥ ७ ॥ नामदेव ह्मणे गर्भवास कांहीं । घेणार मी नाहीं ऐसे आहे ॥ ८ ॥ आणि देहासकट न्यावे वैकुंठासी । ऐसें जरी करीसी तरी असो ॥ ९ ॥ कबुल करोनी देव त्या ह्मणती । स्वप्नांत सांगती येतो पोटा ॥ १० ॥ नवा महिन्या तुह्मी देखाल बाळासी । देवची पोटासी आला ह्मणा ॥ ११ ॥ आनंदें करोनी दिवस लेखीती । बोलती पोटासी देव येती ॥ १२ ॥ नऊ महिने होतां कीर्तनीं बैसतां । लुगड्यावरी पाहातां बाळ दिसे ॥ १३ ॥ न घेतीच तेव्हां पुजाऱ्यासी स्वप्न । दिल्हें देवें जाण ऐसेपरी ॥ १४ ॥ जैसें तीं सांगती तैसें करोनिया । पाठवावें तया देहूलागी ॥ १५ ॥ पुसतां ह्मणती देवाबरोबरी तुळेल हो तरी घेऊं आह्मी ॥ १६ ॥ चंद्रभागेचीया वाळवंटाअंत । रोवीला अद्भुत धंट[1] पाहा ॥ १७ ॥ देवाजीची मूर्ति येका पारड्यांत । बाळ हें ठेवीत येकामाजी ॥ १८ ॥ देवाजीच्या तुका[2] उतरतां नाम । जाले तुकाराम विश्वामाजी ॥ १९ ॥ आनंदें बाळासी घेती मग जाण । सर्वांनीं सन्मान केला बहु ॥ २० ॥ गौरवोनी मग देहूसी धाडीली । भीमें हे वर्णीली संतलीला ॥ २१ ॥

॥ श्रीराम ॥ तुकाराम दिवसां मासां थोर जाले । तेव्हां लग्न केलें मायबापें ॥ १ ॥ विठोबाची मूर्ती त्यांनींच आणोनी । देवालय

---

१ मोठी तराजू, कांटा. २ वजनाला.

करूनी स्थापीयली ॥ २ ॥ तयापुढें तुकाराम नृत्य करीती । देवाजीसी प्रीति बहु ज्याची ॥ ३ ॥ घरीं वेवसाव वैश्यधर्म असे । धाडीयले यांस कोकणांत ॥ ४ ॥ मीठ ध्यावे तेथें गहू घेती जाण । देशांत आणोन विकिती पाहा ॥ ५ ॥ जाला सर्व तोटा येवोनी गृहासी । सांगती बंधुसी वर्तमान ॥ ६ ॥ प्रपंचांत मन नाहीं तिळमात्र । लीला हे विचित्र भीम ह्मणे ॥ ७ ॥

॥ **श्रीराम** ॥ तुकाराम भक्ती करीती आवडी । पांडुरंगीं गोडी दृढ ज्याची ॥ १ ॥ स्वप्नांतची गुरु जाहाला उपदेश । धरिला विश्वास दृढ नामीं ॥ २ ॥ जागृतींत तोची निश्चय धरोनी । अभंग तेथोनी भीम ह्मणे ॥ ३ ॥

### अभंग तुकारामाचा

संत गुरुरायें मज कृपा केली । परी नाहीं घडली सेवा कांहीं ॥ १ ॥
सांपडवीलें वाटे जातां गंगास्नाना । मस्तकीं तो जाणा ठेविला कर ॥ २ ॥
भोजना मागती तुप पावशेर । पडिला विसर स्वप्नामाजी ॥ ३ ॥
बाबाजी आपुलें सांगितलें नाम । मंत्र दिला रामकृष्णहारी ॥ ४ ॥
राघवचैतन्य केशवचैतन्य । सांगीतली खूण माळीकेची ॥ ५ ॥
माघ शुद्ध दशमी पाहोनी गुरुवार । केला अंगिकार तुका ह्मणे ॥ ६ ॥

॥ **श्रीराम** ॥ तुकाराम देहुमाजी होते तेथें । गांवातील खेपे जात होते ॥ १ ॥ बंधु ह्मणे यांच्या समागमे जावें । मालासी आणावें भरोनीया ॥ २ ॥ ऐशी रुपायाचे बैल दिले दोन । रुपये देवोन पांच शत ॥ ३ ॥ मार्गी जातां मोगलाई येका गांवीं । राहीले स्वभावी वस्तीसची ॥ ४ ॥ तेथें येक विप्र होता त्याची कांता । रूपवंत असतां काय जालें ॥ ५ ॥ गांवींच्या पठाणें देखतांची दृष्टी । हेत त्याचे पोटीं जाला जाणा ॥ ६ ॥ विप्रावरी कांहीं आळ आणोनीया । दंड बांधी तया पांच शत ॥ ७ ॥ आठ दिवसाआंत द्यावे रुपायासी । नाहीं तरी

स्त्रीसी द्यावे ह्मणे ॥ ८ ॥ कागद घेवोनी धांडोरा पिटिला । द्रव्य या विप्राला नका देऊं ॥ ९ ॥ आठ दिवस जाले द्रव्य न दे कोणी । चिंतातुर मनीं विप्र जाला ॥ १० ॥ तुकारामें दृष्टी पाहोनी तयासी । देवोनी द्रव्यासी मुक्त केला ॥ ११ ॥ बैल येक तेथें विकोनी खर्चासी । देवोनी तयासी बोलीयले ॥ १२ ॥ चला पंढरीस नका राहूं येथें । दुष्टसंग तेथें राहूं नये ॥ १३ ॥ येक बैल आहे मीही येतो संगे । पाहूं पांडुरंग तुह्मी आह्मी ॥ १४ ॥ घेवोनीयां तया आले पंढरीस । विकोनी बैलास तये स्थानीं ॥ १५ ॥ ब्राह्मणासी तेंही द्रव्य देवोनीया । ऐसी भूतदया नाहीं कोठें ॥ १६ ॥ सोबती जे होते नागपुरा गेले । खेप घेवोनी आले घरोघरीं ॥ १७ ॥ यांचा बंधु ह्मणे तुकाराम कोठें । सांगतांची कष्ट जाले यांसी ॥ १८ ॥ पांडुरंगें सोंग तुकारामाचेंची । घेवोनी मालासी घरा आले ॥ १९ ॥ पांचा सहस्राचा माल आणोनीया । बैल पाहातां तया ऐसेचि ते ॥ २० ॥ बंधुसी आनंद होवोनी गळ्यासी । घालोनी मिठीसी सुखी जाला ॥ २१ ॥ भोजनादि सर्व उपचार करोन । खोलीत जेवोन निजा ह्मणे ॥ २२ ॥ ह्मणती विठोबास केला म्या नवस । आधीं पंढरीस जाणें असे ॥ २३ ॥ बाहेर निजोनी अदृश्य जाहाला । मग बंधु आला पंढरीस ॥ २४ ॥ भेटे तुकाराम सांगे वर्तमान । अश्रु आले पूर्ण नेत्रीं यांच्या ॥ २५ ॥ मग बंधुसहीत आले देहूसची । महिमा अद्भुतची भीम ह्मणे ॥ २६ ॥

॥ **श्रीराम** ॥ तुकाराम जात होते पंढरीस । करिती उल्हासें नामघोष ॥ १ ॥ मार्गावरी पक्षी बैसले बहुत । गेले अकस्मात उडोनीया ॥ २ ॥ उभे राहोनीया देवा आळवीती । चांडाळ मी क्षितीं जालो यांसी ॥ ३ ॥ आंगावरोनीया येवोनी बैसले । तरीच जिणें भलें देवराया ॥ ४ ॥ निश्चय करोनी उभेच राहात । पक्षीही बैसत अंगावरी ॥ ५ ॥ मग आनंदानें चारा खा ह्मणोन । पंढरीस जाण

आले पाहा ॥ ६ ॥ चंद्रभागे स्नान क्षेत्रप्रदक्षणा । घेताती दर्शना भीम ह्मणे ॥ ७ ॥

॥ **श्रीराम** ॥ तुकाराम चंद्रभागे स्नान करून । शिळा पाहाती जाण धोवयासी ॥ १ ॥ लांब धोंडा तेथें तेलीयाचीं कातां । पाहाताती धुतां तयेलागीं ॥ २ ॥ भजन करीत तेथें उभे होते । लुगडे धुई माते बोलीयले ॥ ३ ॥ सासुसासऱ्यासी होती शिव्या देत । परमार्थ तये ते सांगताती ॥ ४ ॥ वेर्थ या वाणीस श्रम कां देतीस । विठल नामास घेई आतां ॥ ५ ॥ ऐसा नरदेह नाहीं यावयाचा । वेर्थ नको वाचा श्रमी करूं ॥ ६ ॥ तरुणी बोलीली सवाष्णीनीं नाम । घेऊं नये नेम ऐसा आहे ॥ ७ ॥ भ्रतार गेलीया ह्मणसी काय राम । ऐसें तुकाराम बोलीयले ॥ ८ ॥ लाट फिरवितां आली उरावरी । प्राणाची बोहरी जाली पाहा ॥ ९ ॥ चंद्रभागेवरी आणीला जाळाया । हेही तया ठायां आली मग ॥ १० ॥ रुदन करोनी ह्मणे तुकोबासी । बोलाउनी त्यासी आणा येथें ॥ ११ ॥ आणितां बोलाऊन केलें दंडवत । नाम घीन याते उठवावे ॥ १२ ॥ जाती शवापासीं हात फिरऊन । बोलिलें वचन तयालागीं ॥ १३ ॥ तुझी कांता नाम घेते आतां ऊठ । ह्मणतांची स्पष्ट उठिला तो ॥ १४ ॥ देवाजीनीं भाव ऐसा दाखवीला । संत निंदी त्याला ऐसें आहे ॥ १५ ॥ सर्वांसी सद्भाव लावोनी भक्तीसी । भीम ह्मणे ऐसी संतलीला ॥ १६ ॥

॥ **श्रीराम** ॥ तुकाराम मग देहूसी येतांना । मार्गी जातां जाणा भिक्षेलागीं ॥ १ ॥ गांव नाहीं होता वाडा धनगराचा । तेथें आले वाचा गर्जतची ॥ २ ॥ व्याघ्रा ऐसा ग्रामसिंह देखतां या । आला धांवोनीया गुर्गुरीत ॥ ३ ॥ तयासी ह्मणती येथें हूंच नाहीं । तेथें कां बा पाही आहे सांग ॥ ४ ॥ ऐकतां उत्तर श्वाना शांती आली । सर्वा भूतीं जाली येक दृष्टी ॥ ५ ॥ धन्य संतराव श्वान केलें संत ॥ भीम हें वर्णीत लीले पाहा ॥ ६ ॥

॥ **श्रीराम** ॥ तुकाराम आले देहूस आनंदें । अभंग स्वछंदें लिहिताती ॥ १ ॥ विप्रीं केला द्वेष वह्या बुडविती । जावोनी बैसती तये स्थानीं ॥ २ ॥ इंद्रायणीतीरीं निद्रा केली तेथें । तेरा दीन होते शिळेवरी ॥ ३ ॥ देवाजीस ह्मणती अभंग हे तुह्मी । कासयास स्वामी केले सांगा ॥ ४ ॥ बुडवायाचे होते तरी कां आह्मासी । बुद्धि दिली ऐसी करायाची ॥ ५ ॥ नेत्रीं अश्रुधारा प्रेमें गहीवरले । देवाजीही आले तये वेळीं ॥ ६ ॥ ह्मणती तुकाराम अभंग हे तुझे । प्राणाहून मज प्रीय जाण ॥ ७ ॥ तेरावे दिवसीं काढोनी वह्यासी । जळ पाहा त्यासी न भिजवी ॥ ८ ॥ देव ह्मणती मज जीवाहुनी प्रीय । भिजवील काय जळ यासी ॥ ९ ॥ देवोनीया वह्या देव गेल्यावरी । विप्राचें शरीरीं कुष्ट भरे ॥ १० ॥ तेही शरण आले अभंग वाचीले । दिव्यदेही जाले भीम ह्मणे ॥ ११ ॥

॥ **श्रीराम** ॥ तुकाराम दाभाड्याचें तळेगांव । तेथें नेले भावें-करूनी यांसी ॥ १ ॥ गांवांतील लोक भाविक तयानीं । कथा प्रतिदिनीं करविती ॥ २ ॥ स्त्रिया पुरुष सर्व कीर्तनासी येती । श्रवण करिती आवडीनें ॥ ३ ॥ येक बाई मात्र कीर्तनासी न ये । क्रूर होती पाहे बहुसाल ॥ ४ ॥ तिमासाचें बाळ पुत्र होता जाला । ह्मणोनी कथेला न जाये ते ॥ ५ ॥ सेजारणीमुखें ऐकतां कीर्तीसी । मनीं जावें ऐसी इच्छा जाली ॥ ६ ॥ ह्मणे बाई मूल कथेंत रडेल । गोसांवी बोलेल न सोसवे ॥ ७ ॥ शेजारीण ह्मणे अफु दे तयास । येई कीर्तनास घेवो-नीया ॥ ८ ॥ बाळासही सवे नव्हती अफुची । ईस द्यावयाचि नक-ळेची ॥ ९ ॥ पैसीयाची अफु आणोनी दीधली । कीर्तनासी आली ऐकावया ॥ १० ॥ कथेमाजी बैसे शेजारीण पुसे । थान दे बाळास झडकरी ॥ ११ ॥ उचलोनी स्तनीं लावी जो बाळासी । निशेष प्राणासी ठाव नाहीं ॥ १२ ॥ बाळ मेलें ह्मणे कथा द्वाड याची । लज्या अंतरींची टाकीयेली ॥ १३ ॥ तुकारामापासीं बाळ आणीयले । पुढें

ठेवीयले आणि बोले ॥ १४ ॥ बाळ उठवावें नाहीं तरी कथा । न करी तत्वता आजीहूनी ॥ १५ ॥ नाम देवाजीचें न घे ह्मणवोनी । शफत करोनी सांग आतां ॥ १६ ॥ तुकाराम तेव्हां बोलीले तयेसी । कथा होता ऐसी शफत करूं ॥ १७ ॥ बैसली जावोन कीर्तन चालीलें । यानीं आळवीलें देवाजीसी ॥ १८ ॥ ह्मणती देवा तुह्मा नावडे कीर्तन । ह्मणोनी हें विघ्न उभे केलें ॥ १९ ॥ आतां शेवटील प्रसंग हा आला । ऐके बा विठला मायबापा ॥ २० ॥ नेत्रीं अश्रुधारा कंठ सद्गदीत । देहभान तेथ न राहेची ॥ २१ ॥ ऐसीयांत बाळ देवानी उठवीले । जना दाखवीलें भक्तसाह्ये ॥ २२ ॥ सर्वांसी आनंद जाला तये वेळीं । भीमे हे वर्णिली संतलीला ॥ २३ ॥

॥ **श्रीराम** ॥ तुकाराम चार प्रहर कीर्तन । नित्य करिती जाण अविश्रम ॥ १ ॥ सावकार येक जागे सारे रात । द्रव्यापासीं हेत रक्षणाचा ॥ २ ॥ तुकारामा ह्मणे तुह्मा चारी प्रहर । जागणें जी सार आहे नित्य ॥ ३ ॥ घराच्या भोंवते फिरावें जी तुह्मी । मग स्वस्थ आह्मी निद्रा करूं ॥ ४ ॥ मान्य करोनीया करिती भजन । तंबोरा घेवोन भोंवताले ॥ ५ ॥ मध्यरात्री आले तस्कर तयासी । पुसतांची त्यासी संत ह्मणती ॥ ६ ॥ तुकारामें त्यांसी करोनी नमन । बोलती तयासी गमन कोठें ॥ ७ ॥ द्रव्यालागी आह्मी आलों जातो आंत । तुह्मी राहावें स्वस्थ उभे येथें ॥ ८ ॥ भिंतींसीच उभे करोनीया जाती । अंगावरी देती पाय यांच्या ॥ ९ ॥ अंत गेले द्रव्य घेवोनी निघाले । पुढें कैसें जालें नवल ऐका ॥ १० ॥ सावकार जागा होवोनीया पाहे । द्रव्य गेलें हाय हाय ह्मणे ॥ ११ ॥ बाहेर येवोनी धरिले तुकारामा । ह्मणे द्रव्य तुह्मापासी घेऊं ॥ १२ ॥ द्रव्यासाठीं अजी प्राण घेईन तुजा । किंवा देईन माजा तुजपुढें ॥ १३ ॥ संकट जाणोनी ह्मणती पांडुरंगा । ऐसें केलें कां गा दीनासी या ॥ १४ ॥ चोर गेले तेही दिशाभुल जाले । वाड्यामाजी आले अकस्मात ॥ १५ ॥ देवोनीया द्रव्य केला नमस्कार । संत

महिमा थोर बोलताती ॥ १६ ॥ सावकारासहीत चोर केले भक्त । लीला हे अद्भुत भीम ह्मणे ॥ १७ ॥

॥ **श्रीराम** ॥ तुकाराम देहुमाजी होते घरीं । कांता क्रूर भारी असे जाणा ॥ १ ॥ बोलीयली यांस उस जा आणाया। लेंकुराची माया नाहीं कैसी ॥ २ ॥ तेथोनी निघाले फडामाजी गेले । उंस त्यानें दिले मोळी येक ॥ ३ ॥ घेवोनी मस्तकीं चालीले रस्त्यांत । गांवांतील येत मुलें मागे ॥ ४ ॥ तयां येक येक देतचि चालीले । वाड्यामाजी आले कांता पाहे ॥ ५ ॥ येक यांजपासी राहीला तो स्त्रीसी । देतां क्रोध तिसी आला भारी ॥ ६ ॥ घेवोनीया यांचे पाठीवरी हाणे । टुकडे जाले तीन तये वेळीं ॥ ७ ॥ पाहाती तों मुलें गांवांतील दोन । दिल्हे उचलोनी त्यांचे हातीं ॥ ८ ॥ येक आपुलीया चिरंजीवा हातीं । देवोनी हांसती आनंदानें ॥ ९ ॥ बोलीले कांतेसी विभाग हा ठीक । केलासी त्वा देख यथास्थित ॥ १० ॥ तुझ्या संगें सुख होतें तैसें दुख । देतीस तू देख वरिच्यावरी ॥ ११ ॥ गांवांतील जनीं पाहोनीया ऐसें । बहुतचि उंस आणुन देती ॥ १२ ॥ अक्रोध सर्वदां समान पाहाणें । भीम ह्मणे खूण संतांची हे ॥ १३ ॥

॥ **श्रीराम** ॥ तुकाराम जाता पाहा पंढरीस । आले सातार्‍यास अकस्मात ॥ १ ॥ बहुती मिळोनी करविती कीर्तन । राजा आला जाण ऐकावया ॥ २ ॥ बैसला करोनी चित्त स्वस्थ परी । उगे कारभारी न बैसती ॥ ३ ॥ क्षणक्षणा पाहा कानासी लागती । कीर्तन करिती आनंदें हे ॥ ४ ॥ राव आणि रंक सारिखाची यांसी । ह्मणती राजयासी तये वेळीं ॥ ५ ॥ गाढवाचा ऐसा कथा ऐक नीट । ऐसें तेंव्हां स्पष्ट बोलीयले ॥ ६ ॥ कथा जाल्यावरी मोतीयाची माळ । दिल्ही जी कुटील मतीयुक्त ॥ ७ ॥ जाणोनी अंतर तोडोन टाकीली । अस्ता नाहीं जाली तीळप्राय ॥ ८ ॥ रायासी बोलती गाढ वाचा ऐसा । शब्द हा आमुचा आला होता ॥ ९ ॥ नारदाची वाचा गाढ कीर्तनांत । तया ऐसी प्रीत

धरी बापा ॥ १० ॥ रायें पायावरी दंडवत केलें । बहुत सन्मानीले भीम ह्मणे ॥ ११ ॥

॥ **श्रीराम** ॥ तुकाराम मग आले पंढरीस । चंद्रभागे असे पूर आला ॥ १ ॥ नावकरी अवघे द्रव्यवाना नेती । हे तैसे राहाती ऐलतीरीं ॥ २ ॥ मध्यरात्र जाली पांडुरंग आले । पाण्यावरून नेले चालतची ॥ ३ ॥ देवे ज्यासी हातीं धरोनी तारीती । तोचि धन्य क्षितीं भीम ह्मणे ॥ ४ ॥

॥ **श्रीराम** ॥ पंढरीची यात्रा करोनी गृहासी । येवोनी देवासी गाती सदां ॥ १ ॥ तुकाराम सदा अभंग लिहिती । सर्व भूतीं पाहाती पांडुरंग ॥ २ ॥ कांतेच्या वस्त्रासी जाले दंड बहु । चिंघा जाल्या पाहूं लागले ते ॥ ३ ॥ इतुक्यांत भाऊ मूळ आला त्यानें । गेला तो घेवोन माहेरासी ॥ ४ ॥ दाहा रुपयाचें लुगडें नेसवीलें । देहूस धाडीले आनंदानें ॥ ५ ॥ जुनें जें होतें तें तेथेंचि राहीलें । पुढें कैसें जालें तेंही ऐका ॥ ६ ॥ प्रात:काळीं कांता बैसे अंग धोया । लुगडें चोळी तया फेडीताहे ॥ ७ ॥ अडभिंतीवरी सोडून ठेवित । आपण करीत स्नान खालीं ॥ ८ ॥ तुकाराम वोटीवरी भजनांत । वृद्ध स्त्री अशांत आली तेथें ॥ ९ ॥ लुगडें जाले चिंघा बोलें तुकोबासी । जरी काया झांकीसी आजी माझी ॥ १० ॥ जुनेपुराणेंच वस्त्र दे कांतेचें । पांडुरंग तुमचे साहेकरी ॥ ११ ॥ आली दया बहु पाहाती गृहांत । अडभित तेथ लुगडें आहे ॥ १२ ॥ हाळुच जावोनी अणोनीया दिल्हें । समाधान जालें तये मोठें ॥ १३ ॥ ह्मणे तुवां माझी झांकीयली काया । कांतेसी तुझीया दील देव ॥ १४ ॥ निघोन ते गेली कांताही नाहाली । पाहों जों लागली भिंतीवरी ॥ १५ ॥ लुगडें चोळी नाहीं लज्यायुक्त जाली । गृहामाजी गेली तये वेळीं ॥ १६ ॥ ह्मणे संतराव लुगडें काय जालें । जुनेंही राहीलें माहेरींच ॥ १७ ॥ तुकारामा तेन्हां विस्मय जाहाला । ह्मणती देवाजीला स्मरे आतां ॥ १८ ॥ क्रोध आला तये ह्मणे दिलें

कोणा । सांगावें कवणा गाऱ्हाणें हें ॥ १९ ॥ गांवामध्यें लग्न सोयरे मिळोनी । अक्षत घेवोनी आले तेथें ॥ २० ॥ वऱ्हाडणी स्त्रीया ह्मणती तुकारामा । बाई कोठें आह्मा सांगा वेगीं ॥ २१ ॥ ह्मणती घरांतची आहे हाक मारा । दडे हे अंधारा माजीं तेव्हां ॥ २२ ॥ वऱ्हाडणी ह्मणती बाई बाहेर या । अक्षता घ्यावया भोजनाच्या ॥ २३ ॥ ऐकतांची नेत्रीं आल्या अश्रुधारा । ह्मणे दीनोद्धारा पाव आतां ॥ २४ ॥ सद्गदीत कंठ ह्मणे देवाजीस । मागें बहुतांस पावलासी ॥ २५ ॥ द्रोपदीस वस्त्रें दिली तुंवा ह्मणती । मज ऐसी नव्हती वस्त्रातीत ॥ २६ ॥ बहीणीचे नातें दर्शनही होतें । पावलां तयेतें नवल काय ॥ २७ ॥ अनाथ मी दीन पतीत सेवाहीन । संतदासी ह्मणून लज्जा रक्षा ॥ २८ ॥ माझ्रीया अपराधा नाहींच तुळणा । आगा नारायणा मायबापा ॥ २९ ॥ तुझीया भक्ताची करीन मी सेवा । विपरीत भावा सांडोनीया ॥ ३० ॥ तुज ऐसें अजीहूनी भ्रतारासी । मानोनी आज्ञेसी पाळीन मी ॥ ३१ ॥ खरे संत जरी असतील हेच । झांकीसी तरीच काया माझी ॥ ३२ ॥ बहुत करुणा केलीसे आवडी । पितांबर घडी दिली देवें ॥ ३३ ॥ नेसोनी आनंदें बाहेर येवोनी । अक्षत देवोनी गेल्यावरी ॥ ३४ ॥ तुकाराम पाईं ठेवीलें मस्तक । वस्त्र अमोलीक पाहाताती ॥ ३५ ॥ ते गेले तेधवां हे आले ह्मणती । जैसें बीज क्षितीं पेरीतां ये ॥ ३६ ॥ यशवंतसुत भवसिंधुअंत । तरावया गात संतलीला ॥ ३७ ॥

॥ **श्रीराम** ॥ तुकाराम येक्या गांवां गेले होते । भजन करीत अहिर्निसीं ॥ १ ॥ तेथें येक संत मोठे दंभधारी । देवार्चन भारी होते त्यांचें ॥ २ ॥ माळा मुद्रा सोंग बहुत पाहोन । जाले शिष्य जाण सर्व जन ॥ ३ ॥ त्यांच्या दर्शनासी आले तुकाराम । अंतरीं निष्काम पुढें उभे ॥ ४ ॥ त्याने तोंडावरी घेवोनीयां वस्त्र । ध्यान हें तत्पर करीती हे ॥ ५ ॥ मनामध्यें ह्मणती गांव शिष्य जाला । इनाम सर्वाला मागू आतां ॥ ६ ॥ त्यामध्यें उंस लाविता पीकेल । गुळही होईल बहु-

तची ॥ ७ ॥ परी येक उंस धर्म करूं नये । ऐसें मनीं होय कल्पनेसी ॥ ८ ॥ नेत्र उघडीतां यांनीं नमन केलें । त्यानींही पुसिले केव्हां आला ॥ ९ ॥ उंस न जायची येकही धर्मासी । आलों त्या संधीसी दर्शनासी ॥ १० ॥ ऐसें ऐकतांची घाली लोटांगण । ह्मणे नारायण दुजा नाहीं ॥ ११ ॥ तयासही बोध करून केला भक्त । महिमा अद्भुत भीम ह्मणे ॥ १२ ॥

॥ **श्रीराम** ॥ तुकाराम होते कीर्तन करीत । राजयाची तेथ स्वारी आली ॥ १ ॥ दोनसे राऊत समागमे शूर । ठेवोनी बाहेर आंत आले ॥ २ ॥ कीर्तनांत स्वस्थ येवोन बैसती । पाछाहाची होती पाळत या ॥ ३ ॥ अकस्मात पांच सहस्र राऊत । आले समजावीत राजयासी ॥ ४ ॥ तुकाराम ह्मणती स्वस्थ बैसा आता । पांडुरंग चिंता आहे याची ॥ ५ ॥ सन्नीध येतांची रूप राजयाचें । धरोनीया साचे आले देव ॥ ६ ॥ पांचा सहस्राची धूळधाण केली । लुटही आणिली बहुसाल ॥ ७ ॥ घोडा सेवकाच्या हातांत देवोन । कीर्तनांत जाण गेले मग ॥ ८ ॥ जालीयां कीर्तन रायानें पाहीलें । देवानें रक्षीले अरीष्टांत ॥ ९ ॥ मग तुकारामा करोनी नमन । ह्मणे तुह्मी धन्य संतराव ॥ १० ॥ राव गेला मग हे आले पंढरी । संतलीला बरी भीम गाय ॥ ११ ॥

॥ **श्रीराम** ॥ तुकाराम कथा करीतां बोलतां । सुखदुख ह्मणती संता सम ॥ १ ॥ येक बाई तीनें ऐकुनी घरासी । नेवोनीया यांसी काय केलें ॥ २ ॥ उसळत पाणी घाली तुकारामा । यांचा दृढ प्रेमा पांडुरंगीं ॥ ३ ॥ याचे कांहीं उष्ण न लागेच अंगीं । बाईचे सर्वांगीं फोड आले ॥ ४ ॥ रडों लागे तेव्हां दया अलियांसी । दिधलें तीर्थासी विठोबाचे ॥ ५ ॥ लावितां आंगासी जाली होती तैसे । संतलीला ऐसी भीम ह्मणे ॥ ६ ॥

॥ श्रीराम ॥ तुकाराम पंढरीस होते तेथें । माहायात्रे जात होती यात्रा ॥ १ ॥ दुर्बळ ब्राह्मण कुटुंबवछल । खर्चावया जवळ कांहीं नाहीं ॥ २ ॥ तुकारामें पत्र दिलें गंगेलागीं । पिशवीमध्येभागी घालोनीया ॥ ३ ॥ ह्मणती भागीर्थींत टाकी माझें पत्र । सांभाळावी मात्र पिशवी माझी ॥ ४ ॥ खर्चावया तुज देईल हे जाण । विप्र आनंदानें चालीयला ॥ ५ ॥ यात्रेसमागमे मुकामासी जाये । पिशवीअंत पाहे खर्ची आहे ॥ ६ ॥ यात्रात्रई मग केली यथासांग । वाचोनीयां मग पत्र टाकी ॥ ७ ॥ अकस्मात गंगेतून हात आला । घेवोनीयां गेला पत्रालागीं ॥ ८ ॥ तैसेंची उत्तर लेहोनीया जाण । कडेसी आणोन टाकीयलें ॥ ९ ॥ तेंही घेवोनीया ठेवी पिशवीअंत । खर्चीही चालत पूर्ववत ॥ १० ॥ पंढरीस आला तुकोबा भेटला । ह्मणे संतलीला न वर्णवे ॥ ११ ॥ पत्र आणी उत्तर अभंग हे दोन । आनंदें पाहाणें भीम ह्मणे ॥ १२ ॥

**॥ तुकारामांचें पत्र ॥**

परिस हो माते माझी विनवणी । तुझीये चरणीं चित्त माझें ॥ १ ॥
जाता मुक्ती मेल्यां मोक्ष तुझे तीरीं । अरत्र परत्री सुखरूप ॥ २ ॥
तुका विष्णुदास संताचें पोसणें । वागपुष्प तेणें पाठवीलें ॥ ३ ॥

**॥ गंगेचें उत्तर ॥**

आजीचा दिवस धन्य मज जाला । सद्गुरु भेटला पत्रासवे ॥ १ ॥
मज माझे तीरीं स्नान जे करिती । ते दोष लागती माझे आंगीं ॥ २ ॥
माझे आंगीचा मळ काढी कोण । येका तुजवीण विष्णुदासा ॥ ३ ॥
ऐका यात्रेकरी सांगावा निरोप । नमस्कार बाप तुकोवासी ॥ ४ ॥

॥ श्रीराम ॥ तुकाराम मग आले चिंचवडा । देव आले पुढा भेटावया ॥ १ ॥ गजाननभक्त त्यांचें नाम देव । असे दृढभाव मनामाजी ॥ २ ॥ तुकारामें पात्रें दोन वाढवीलीं । पांडुरंगा केली विनवणी ॥ ३ ॥ आले पांडुरंग बोलीले देवासी । मंगळमूर्तीसी येवों

द्यावें ॥ ४ ॥ यांनींच प्रार्थना मग करोनीयां । आणिलें देवराया भोजनासी ॥ ५ ॥ वक्रतुंड आले देवानीं पाहीले । धन्य बोलीयले तुकारामा ॥ ६ ॥ आनंदेंची मग देहूस येवोन । कीर्तन भजन करिताती ॥ ७ ॥ इंद्रायणीतीरीं कीर्तन करीत । वैकुंठासी जात देहासहित ॥ ८ ॥ धन्य तुकाराम धन्य त्यांची लीला । भीम वर्णायाला अल्पमती ॥ ९ ॥

---

# संतोबा पोंवार

॥ **श्रीराम** ॥ संतोबा पोंवार भक्त जाले मोठे । वैराग्यही श्रेष्ठ केलें ज्यांनीं ॥ १ ॥ भीमातीरीं होते रांझणगांवांत । सांडसाचें ह्मणत नाम ज्याचें ॥ २ ॥ राजयाची दया पूर्ण यांजवरी । फौज संगे बरी पांच सहस्र ॥ ३ ॥ हात्ती घोडे होते वैभव बहुत । कीर्तन ऐकत प्रेमभावें ॥ ४ ॥ तुकारामाचेची वैराग्यसंपन्न । अभंग हे जाण ऐकतांची ॥ ५ ॥ जाहालें वैराग्य ह्मणे वेर्थ गेलों । प्रपंचीं बुडालों सर्वस्वेंसीं ॥ ६ ॥ कांता पतिव्रता नाम जीचें सती । निष्ठा तिची होती नामा ऐसी ॥ ७ ॥ माहेरासी गेली होती मागें यांनीं । सर्वस्व लुटोनी फडशा केला ॥ ८ ॥ धोतर अंगोळ्र मात्र अंगावरी । वैराग्य अंतरीं तीव्र ज्याचें ॥ ९ ॥ मुळा मुठा तेथें भीमेसी मिळती । संगमी हे येती अकस्मात ॥ १० ॥ गांवही सान्निध भीमेपैलीकडे । येकांत आवडे बहु जाणा ॥ ११ ॥ गांवामध्यें यावे भिक्षेपुरतें मात्र ॥ हस्तामाजी पात्र तारकची ॥ १२ ॥ बहु भिक्षा यतां न घ्यावी तत्वता । लाभीयांच्या

चित्ता सुख तेणें ॥ १३ ॥ गोपीचंदा ऐसें पाहा हें वैराग्य । जाहाले निसंग भीम ह्मणे ॥ १४ ॥

॥ **श्रीराम** ॥ संतोबा पोंवार त्यांचे कांतेलागी । वर्तमान वेगीं समजतांची ॥ १ ॥ बंधुलागी ह्मणे मज धाडा त्वरें । जाहाली तयार जावयासी ॥ २ ॥ लाखो रुपायांच्या वस्ता अंगावरी । नाजुकही भारी होती जाणा ॥ ३ ॥ पडदे सोडोनीया बैसे पालखींत । सेवक राऊत समागमे ॥ ४ ॥ वरासी आली तों सर्वस्वाचें दान । पहिलेंच येणें केलें होतें ॥ ५ ॥ यांजपासी येतां बोलीले तयेसी । फिरोनी माहेरासी जावे तुवां ॥ ६ ॥ वस्ताभावा सर्व तुझीया जन्माची । आहे बेगमीची केली आहे ॥ ७ ॥ आह्मी जालों वेडे न धरावी आस्ता । लागलों पर-मार्थाचीये वाटे ॥ ८ ॥ लोकीकाची चाड सोडीयली आह्मी । आमुची आस्ता तुह्मी न धरावी ॥ ९ ॥ बोलीयली सती पतीसी वचन । तुह्मासी सांडोन न जाये मी ॥ १० ॥ देह आणि प्राण अर्पिला तुह्मासी । देवही आह्मासी दुजा नाहीं ॥ ११ ॥ ऐसें आहे तरी निघे पडद्यांतून । वस्ता अंगावरून उतराव्या ॥ १२ ॥ आज्ञा ह्मणोनीया निघाली बाहेरी । अळंकार उतरी अंगावरून ॥ १३ ॥ यानीं त्याचा धर्म केला तये वेळीं । पातळ आणि चोळी दिली शुभ्र ॥ १४ ॥ आले होते त्यासी लावीले वाटेसी । बैसे पतीपासीं निर्भयत्वें ॥ १५ ॥ धन्य हें वैराग्य उभयतांसारीखें । भीम गाये मुखें ऐसीयांसी ॥ १६ ॥

॥ **श्रीराम** ॥ संतोबा पोंवार कांतेसी ह्मणती । झोळी घ्यावी हातीं उठा अतां ॥ १ ॥ रांझणगांवांत जाये भिक्षा माग । मुखें पांडुरंग आळवावा ॥ २ ॥ घेवोनीयां झोळी गेली गांवाअंत । विठल गर्जत घरोघरीं ॥ ३ ॥ लोकाचीया नेत्रा अश्रुपात येती । ह्मणती धन्य सती पतिव्रता ॥ ४ ॥ आली स्वामीपासीं नैवेद्य जाहाला । भजनीं रंगला संतराव ॥ ५ ॥ येकेदिसीं ह्मणती पारगांवा जाये । भिक्षा घेवोनी ये

तेथोनीयां ॥ ६ ॥ कोसभरी होतें तेथेंही चालीली । अकस्मात आली घरीं येका ॥ ७ ॥ तयेची बहीण होती घराआंत । विठल ऐकत बाहेर ये ॥ ८ ॥ पाहोन गळ्यासी लागली येवोन । घरांत नेवोन बैसवीले ॥ ९ ॥ ह्मणे माय नख न पडे तुझें दृष्टी । पाय दिला सृष्टी नव्हतां कधीं ॥ १० ॥ ते तूं अनवाणी भिक्षा घरोघरीं । पाई फोड भारी आले तुझे ॥ ११ ॥ ह्मणे ऐसें केल्यावीण नारायण । कैसा भेटे जाण विषयांत ॥ १२ ॥ देहादि प्राणाचा लोभची सोडावा । तेव्हांची जोडावा पांडुरंग ॥ १३ ॥ पक्कानें आणोन झोळी भरीयली । पतीपासी आली श्रमयुक्त ॥ १४ ॥ पाहोनी ह्मणती येकाच गृहीची । आणिली तेथोंचि नेई आतां ॥ १५ ॥ टाकोनी या घरोघरीं मागून ये । ऐकतांची जाये भीम ह्मणे ॥ १६ ॥

॥ **श्रीराम** ॥ संताचीच कांता पुन्हा आली तेथें । झोळी वोती हातें तयेपुढें ॥ १ ॥ मग घरोघरीं मागोनी भिक्षेसी । मार्गीं श्रम तिसी बहु जाले ॥ २ ॥ उष्णकाळ मोठा पाई फोड आले । हळु हळु चाले माय तेव्हां ॥ ३ ॥ अस्तमान जाला भीमातीरा आली । पाहों जों लागली उदकासी ॥ ४ ॥ वरता पर्जन्य पडे बहुसाल । भरली तुंबळ दोंही थड्या ॥ ५ ॥ पाहोनीया सती ह्मणे कर्म गाढें । वोढवलें पुढें कैसें करूं ॥ ६ ॥ स्वामी क्षुधातुर माझीया श्रमाचें । सार्थक नव्हेच्च काय करूं ॥ ७ ॥ आतां या पुरांत घालीन मी उडी । पांडुरंग थडी पाववील ॥ ८ ॥ कारितां निश्चय आले तेथें देव । ह्मणती धन्य भाव सतीचा या ॥ ९ ॥ भोपळ्याचें पेटें[1] खांद्यावरी आहे । कोळी जाले पाहे देवराव ॥ १० ॥ आले सतीपुढें कारिती नमन । विठा कोळी ह्मणून सांगताती ॥ ११ ॥ तुह्मा ऐसीयांचा सेवक मी आहे । पार करीन पाहे क्षणामाजीं ॥ १२ ॥ ऐसीया वेळेसी चुकवावे जेव्हां । सेवक मी

१ सांगड.

तेव्हां कासयाचा ॥ १३ ॥ सती ह्मणे तुज कांहीं द्यावयासी । नाहीं मजपासीं काय करूं ॥ १४ ॥ ह्मणती पांडुरंग तुह्मी दिल्हें ऐसें । कोणी दिलें नसे मजलागीं ॥ १५ ॥ तुमचें उत्तीर्ण न हो आह्मी जाण । आतां कांहीं देणें नलगे माये ॥ १६ ॥ बा रे तूं इमानी बहुत आहेस । भीम ह्मणे ऐसें माता बोले ॥ १७ ॥

**॥ श्रीराम ॥** संतोबा पोंवार पाहातातो वाट । कांतेलागीं कष्ट जाले आजी ॥ १ ॥ पाणी आलें भीमे टाकील ते उडी । पांडुरंग थडी पाववील ॥ २ ॥ इकडे देवराव झोळी घेती शिरीं । बाई स्कंदा-वरी बैसवीली ॥ ३ ॥ क्षणामाजी ऐलतीरासी येउनी । खाले उतरोनी जावे ह्मणती ॥ ४ ॥ सती ह्मणे बा रे भिक्षेतील तुज । अन्न द्यावें मज ऐसें वाटे ॥ ५ ॥ देव ह्मणती मीही भुकेलों त्याचाची । आम्हा प्रसादाची प्रीति मोठी ॥ ६ ॥ पतिव्रता ह्मणे स्वामीपासीं येई । दर्शनही घेई अनयासें ॥ ७ ॥ आज्ञा ह्मणे जावें लंगोटी पीळोन । मागोन येईन प्रसादासी ॥ ८ ॥ गेली माता वरी संतपाई शीर । ठेवोनी साचार बोलीयेली ॥ ९ ॥ जालें वर्तमान सर्व निवेदीलें । नेत्रीं अश्रु आले संतोबाचा ॥ १० ॥ विठाकोळी मज दाखवी ह्मणती । भीमातीरा येती पाहावया ॥ ११ ॥ उभयतां तया हाका मारीतांना । दृष्टी न पडे जाणा येती वरी ॥ १२ ॥ संतोबा ह्मणती कांतेसी दर्शन । दिल्हें कैसें जाण माजे आधीं ॥ १३ ॥ सर्वस्वाचा त्याग केला तुजसाठीं । न पडेसी दृष्टी कां गा माझ्या ॥ १४ ॥ कांतेहून काय आहे मी अभागी । ह्मणे येई वेगीं देवराया ॥ १५ ॥ तुह्मी आल्याविण न खाये मी अन्न । येतो हें वचन आहे तुझें ॥ १६ ॥ निश्चय करोनी उभयतां बैसती । मग देव येती तयापासीं ॥ १५ ॥ देवोनी दर्शन भोजन करोन । केलें समाधान उभयांचें ॥ १८ ॥ तुह्मापासीं सदां आहे मी जाणावें । नम-स्कार भावें केला यांनीं ॥ १९ ॥ देव गेले ऐसें अभय देवोनी । संत-

साभिमानी मुळीचा आहे ॥ २० ॥ यशवंतसुत संतलीला गाये । आठऊनी पाय सद्गुरूचे ॥ २१ ॥

---

# माणकोजीबावा बोधले

**॥ श्रीराम ॥** माणकोजीबावा बोधला विख्यात । धामणगावांत भक्त जाला ॥ १ ॥ पंधरा दिवसीं येतां येकादसी । यावे पंढरीसी तेथोनीया ॥ २ ॥ प्रातःकाळाहून यावे पांच गांवें । पांडुरंग भावें आलिंगावा ॥ ३ ॥ येके दिनीं घरीं भजन करीत । दारीद्रही प्राप्त बहु जाले ॥ ४ ॥ कांता पतिव्रता नाम ममताई । गरोदर पाहीं जाहाली ते ॥ ५ ॥ दिवस जालीया प्रसुतही जाली । पुत्र प्रसवली भक्त-कांता ॥ ६ ॥ बावा बोलीयले ऐशा विपत्तींत । आला हा पोटास येम जाणा ॥ ७ ॥ तेंचि नाम तया ठेवीयलें यम । भजन निःसीम करीती हे ॥ ८ ॥ कांतेच्या स्तनांत दुग्ध नाहीं जेव्हां । पथ्यपाणी तेव्हां पाले खावे ॥ ९ ॥ कांता ह्मणे माझा बाप सुखी आहे । घरीं त्याच्या आहे सर्व सिद्धी ॥ १० ॥ शेळी तरी येक मागोनी तयासी । देईल तुह्मासी देखतांची ॥ ११ ॥ बरें ह्मणोनीया त्याच्या गांवा गेले । त्यानें द्वार दिलें पाहोनीयां ॥ १२ ॥ परुसदारानें सासुनें नेऊन । भाकरी आणोन दिल्या चारी ॥ १३ ॥ येथें कांहीं तुह्मा मिळायाचें नाहीं । तुमचा राग पाहीं करिती हे ॥ १४ ॥ तेथोन निघाला मार्गीं जों राहीला । देवाजीनें केला नवलाव ॥ १५ ॥ शेळी कुवी घरीं देवोनीया गेले । नाम सांगीतलें श्वशुराचें ॥ १६ ॥ बावा घरीं आले शेळीस पाहीलें । ह्मणती देवें केलें नवल हें ॥ १७ ॥ दुध जों काढीलें न सरेची ऐसें । देती शेजाऱ्यास

आनंदानें ॥ १८ ॥ पुढें कांहीं दिसा सासूनें चोरून । गाईस घेवोन पाठवीले ॥ १९ ॥ येतां गाय शेळी नाहींसीच जाली । भीम ह्मणे केली देवें लीला ॥ २० ॥

॥ **श्रीराम** ॥ माणकोजीबावा त्यांचा पुत्र थोर । लग्नही साचार केलें त्याचें ॥ १ ॥ हाकीमाचें शेत दोंस्या रुपायाचें । होतें तें गव्हाचें पीक त्यांत ॥ २ ॥ बैल घरीं नाहीं लोकची पेरिती । ब्यांचीही विश्रांती संता घरीं ॥ ३ ॥ भिक्षा मागोनीया बींही गोळा केलें । दोन मण जालें गोळा तेव्हां ॥ ४ ॥ अस्तमानीं येती मारुतीदर्शन । उपासी ब्राह्मण शत आले ॥ ५ ॥ नमन तयांसी करोनी गृहासी । आले यमाजीसीं बोलीयले ॥ ६ ॥ गहूं पेरायाची वेळ आली आतां । दळवीले तत्वता क्षणामाजी ॥ ७ ॥ दुपती गाय येक होती ते वाण्यासी । विकोनी तुपासी आणीयेलें ॥ ८ ॥ तृप्त विप्र जाले निघोनीया गेले । आशिर्वाद दिले तये वेळीं ॥ ९ ॥ कडू भोपळ्याचें बीज शेताअंत । आज्ञेनें पेरीत पुत्रराज ॥ १० ॥ अद्भुतचि पीक तेव्हां आलें त्यासी । नलगे राखायासी निर्भय जें ॥ ११ ॥ नव्याची पुनव घरोघरीं सण । यांचें घरीं जाण कांहीं नाहीं ॥ १२ ॥ कांतेच्या नेत्रासी आले अश्रु जेव्हां । यमाजीसी तेव्हां पाचारीलें ॥ १३ ॥ विठोबाचें नांवें घेवोनी भोपळे । तोडोनी वहीले आण आतां ॥ १४ ॥ आणोनी फोडितां सणाचें साहित्य । निघालें तयांत वेगळालें ॥ १५ ॥ सण यथासांग केला देवरायें । सदा भक्तसाह्य ह्मणोनीया ॥ १६ ॥ कोणी येक दुष्ट हाकीमासी बोले । शेत बुडवीलें बोधल्यानें ॥ १७ ॥ बोलावोनी यांस नेले वाड्याअंत । ह्मणती पैका त्वरीत देई आतां ॥ १८ ॥ पांडुरंग द्रव्य देईल ह्मणती । खोलींत कोंडिती भक्तराया ॥ १९ ॥ ह्मणे याची रांडपोर आणा येथें । मार द्यावा त्यांतें ऐसें बोले ॥ २० ॥ पांडुरंग तेव्हां सराप होवोनी । दोनसे देवोनी रुपायासी ॥ २१ ॥ गेले मग बावा आणोनी बाहेरी । सन्मानोनी करी नमनासी ॥ २२ ॥ सरापाचें घरीं ठेविले रुपये । व्यर्थ संतराय

दुखवीले ॥ २३ ॥ वस्त्रें दिलीं सर्व सन्मान घेवोन । सरापा येवोन विचारीती ॥ २४ ॥ तो ह्मणे वाड्यांत गेलों नाहीं अजी । पांडुरंगें पाही नवल केलें ॥ २५ ॥ भक्ताचें माहात्म वाढवीतो देव । भीमासी सद्भाव गावयाचा ॥ २६ ॥

**॥ श्रीराम ॥** माणकोजीबावा येके दिनीं शेती । जावोन बैसती राखावया ॥ १ ॥ जोंधळ्याचें पीक आलें होतें भारी । यात्रा हे पंढरी जात होती ॥ २ ॥ ह्मणती यात्रेकरी बावा शेतकरी । कणसें द्यावी चारी लेंकुरासी ॥ ३ ॥ बावा बोलीयले विठोबाचें शेत । कणसें ध्यावी स्वस्थ पाहीजे तीं ॥ ४ ॥ ह्मणती यात्रेकरी शेत हें देवाचें । लुटवितो साचें भक्तराज ॥ ५ ॥ हाजारोंच यात्रा लुटिलें शेत सारें । नाहीं उरों दिलें कणीस येक ॥ ६ ॥ थोटें ताटें मात्र राहीलीं शेतांत । करणी हें अद्भुत भीम ह्मणे ॥ ७ ॥

**॥ श्रीराम ॥** पुढें येकादशी आले पंढरीसी । पुर हा भीमेसी आला होता ॥ १ ॥ द्रव्यवान यात्रा नावकरी नेती । बावासी न नेती उतरोनी ॥ २ ॥ अस्तमानीं नावा पैलतीरा नेल्या । पाहातां यां आल्या अश्रुधारा ॥ ३ ॥ ह्मणती पांडुरंगा ऐसें काय केलें । पाय अंतरले आजी कांहो ॥ ४ ॥ वीस कोस आलों दर्शनाचा हेत । कंठ सद्गदीत आळवीती ॥ ५ ॥ प्रहर रात्र जाली आले पांडुरंग । विप्रवेषें मग बोलीयले ॥ ६ ॥ चाल पैलतीरा स्कंदावरी बैस । बावा ह्मणती असे शूद्र जी मी ॥ ७ ॥ आमुचे देव तुह्मी प्रत्यक्ष ब्राह्मण । तुमचें हें चरण अमुच्या शिरीं ॥ ८ ॥ धरोनीयां हातीं चालतची नेले । नाम सांगीतलें विठल हें ॥ ९ ॥ ऐलतीरा येती राऊळांत जाती । पांडुरंग प्रीति आलिंगीला ॥ १० ॥ भक्तसाहे सदां आहे नारायण । भीम गाय गुण निरंतर ॥ ११ ॥

**॥ श्रीराम ॥** माणकोजीबावा पंढरीस असतां । देवाजीस चिंता सर्व ज्याची ॥ १ ॥ मध्यरात्रीं देव सांगती स्वप्नांत । मीच येतो तेथें

गांवीं तुझ्या ॥ २ ॥ याची खूण हेचि रितीं पेवें भरती । थोड्या ताटा येतीं कणसें पाहा ॥ ३ ॥ जागृत होवोनी यात्राही करोनी । गांवासी येवोनी काय केलें ॥ ४ ॥ यमाजी पुत्रासी सांगताती स्वप्न । तो ह्मणे पाहाणें पेवें आतां ॥ ५ ॥ रितीं पेवें तेव्हां उकरोनी पाहे । तोंडावरी आहे धान्य त्यांत ॥ ६ ॥ येकांत तांदुळ दुज्यांत गहूं । वेगळाले पाहूं लागला तो ॥ ७ ॥ गुळाच्याही ढेपा निघाल्या येकांत । तुपाच्या देखत जोड्या दृष्टी ॥ ८ ॥ शेत पाहों गेले थोड्या ताट्या कणसें । आलीं देवें ऐसें नवल केलें ॥ ९ ॥ बावा ह्मणती हें तों देवाजीचें सर्व । ज्याचें त्या अर्पावें ऐसें आहे ॥ १० ॥ पांडुरंगमूर्ती तेथेंचि स्थापोनी । उछाह करोनी फडशा केला ॥ ११ ॥ संतलीला ऐसी देवा प्रीत मोठी । भीम गाय गोष्टी त्याच सदां ॥ १२ ॥

॥ **श्रीराम** ॥ माणकोजीबावा भजन करीत । वोटीवरी होते ऐसीयांत ॥ १ ॥ देव उदारत्व पाहावया आले । बैरागी जाहाले पूर्ववयी ॥ २ ॥ बावानीं पाहातां साष्टांग नमन । करोनी सन्मान बैसवीलें ॥ ३ ॥ विचारिती तया काय इछा आहे । तेचि आज्ञा पाहे करा दीना ॥ ४ ॥ देव बोलीयले तुझी सून देईं । आज्ञा ह्मणून पाईं नमन केलें ॥ ५ ॥ कांतेस ह्मणती ममते सून देईं । पतिव्रता पाही बोले तेव्हां ॥ ६ ॥ पुत्रा आणि सुने विचारावें आधीं । मग कार्यसिद्धी करा स्वामी ॥ ७ ॥ सून भागीरथी पतिव्रता सती । तये विचारिती संतबावा ॥ ८ ॥ तुज अतीतासी आज देतो मुली । याची इछा जाली आहे ऐसी ॥ ९ ॥ पतिव्रता ह्मणे मायबापें तुह्मा । अर्पियले आह्मा धर्मरीती ॥ १० ॥ तुमच्या स्वाधेन केला आहे देह । आतां चित्तास ये तैसें करा ॥ ११ ॥ बावा ह्मणती आतां पुत्रा विचारावें । मग संपादावें धर्मकार्य ॥ १२ ॥ शेतीं होता पुत्र गेले तयापासी । वर्तमान त्यासी निवेदीलें ॥ १३ ॥ तो ह्मणे अवश्य आलें माझ्या मना । विलंब हा जाणा न करावा ॥ १४ ॥ मग आले घरां अतीता पूजोनी । सुनेसी

अर्पोनी आनंदानें ॥ १५ ॥ अतीताचे मागें चालीयली सती । भय नाहीं चित्तीं तिळप्राय ॥ १६ ॥ रानांत जावोनी तीस ह्मणती जाये । ते ह्मणे न होय ऐसें आतां ॥ १७ ॥ तुह्मासी अर्पण केला आहे देहे । न सोडी मी पाय आतां स्वामी ॥ १८ ॥ आधीं काय तुह्मी होता जी अज्ञान । आतां काय ज्ञान जालें तुह्मा ॥ १९ ॥ बोलती मी देव अदृश्य होईन । माग कांहीं जाण आतां मज ॥ २० ॥ बोले पतिव्रता भय कां दावीता । अदृश्यची होतां प्राण दीनें ॥ २१ ॥ तुह्मा समागमें धाडीन प्राणासी । पृथ्वीचे पृथ्वीसी देह दीन ॥ २२ ॥ संकटचीं मोठें जालें देवाजीला । दर्शन हें तीला दिलें मग ॥ २३ ॥ ह्मणती अंतकाळीं नेईन वैकुंठा । धन्य माते निष्ठा आहे तुझी ॥ २४ ॥ आयुष्य आहे तों संतसेवा करी । बोधल्याची भारी प्रीत मज ॥ २५ ॥ ऐसा उदार तो खरा संत तोची । पुत्र कांता त्याची धन्य आहे ॥ २६ ॥[१]पतिव्रता ह्मणे जैसें आणिले मज । तैसें द्यावें आज नेवोनीया ॥ २७ ॥ तुह्मा वांचोनीया न जाये माघारी । निश्चयें श्रीहरी वश्य केला ॥ २८ ॥ मग पूर्वरूप धरोनी तयेसी । घेवोनी गृहासी आले देव ॥ २९ ॥ नेवोनी घरांत सर्वांसी दर्शन । देवोनीया जाण सुखी केले ॥ ३० ॥ शंख चक्र पीतांबर वनमाळा । घवघवींत डोळां पाहाताती ॥ ३१ ॥ पुजा करोनीया भोजनही तेथें । केलें भगवंतें प्रेमानंदें ॥ ३२ ॥ नमन करितां अदृश्य जाहाले । भीमें हें वर्णीलें यथामती ॥ ३३ ॥

**॥ श्रीराम ॥** माणकोजीबावा कीर्ती ज्याची मोठी । पांडुरंगीं दृष्टी निरंतर ॥ १ ॥ पाछाहासी कोणी निवेदीलें ऐसें । हिंदु पीर असे आणावे त्यां ॥ २ ॥ बोलावोनी यांसी नेलें गृहाअंत । ह्मणे करामत पाहूं याची ॥ ३ ॥ सा[२]नेक वाढोनी रुमालें झांकोनी । पुढेंच आणोनी

---

१ देईन २ वर्षा.

ठवीयली ॥ ४ ॥ अविंध बोलीला जेवा संतराव । आठवीला देव पंढरींचा ॥ ५ ॥ रुमाल काढितां पुष्पेंच जाहालीं । लोटांगण घाली अविंध तो ॥ ६ ॥ गांवाची सनद करोनी दिधली । अद्यापी चालीली आहे पाहा ॥ ७ ॥ गांवासीं सन्मानें पाठवीले यांसी । भीम गाय ऐसी संतलीला ॥ ८ ॥

**॥ श्रीराम ॥** माणकोजीबावा धामणगांवांत । कीर्तन करीत अहर्निसीं ॥ १ ॥ सरापाची दासी नित्य येत होती । कीर्तनाची प्रीति बहु तये ॥ २ ॥ बंधु बंधु जेव्हां विभक्त जाहाले । विभाग लागले करावया ॥ ३ ॥ सर्व वाटे तेव्हां जाहालीयावरी । उरली हेचि बरी तुळसी दासी ॥ ४ ॥ उभयतां भांडती दासी घेऊं ह्मणून । लोक ह्मणती विकून पैका घ्यावा ॥ ५ ॥ दोन कोसावरी होता गांव तेथें । विकीले तयेतें पाहा त्यांनीं ॥ ६ ॥ शंभर रुपये घेवोनीया दिली । हे तेथें राहीली पुढें ऐका ॥ ७ ॥ जयाचीये घरीं दिली ते अभक्त । हे तेथें करीत भजन सदा ॥ ८ ॥ रात्रींच निघावें धामणगांवा यावें । कीर्तन ऐकावें प्रेमयुक्त ॥ ९ ॥ पुन्हा प्रातःकाळीं जावें भजन करीत । काम धंद्याआंत नाम ह्मणे ॥ १० ॥ घरीची द्वेष करिती मारही दिधला । परी न सोडीला पांडुरंग ॥ ११ ॥ ह्मणती पैका अमुचा वेर्थची बुडाला । कोणी घेईल ईला तरी देऊं ॥ १२ ॥ येके दिनीं पाहा प्रहर दिसांत । कोंडीली खोलींत द्वेषेंकरूनी ॥ १३ ॥ तये वेळीं ईच्या नेत्रा आले अश्रु । ह्मणे सर्वेश्वरु विसरला ॥ १४ ॥ कथेचे वेळेसी देईन मी प्राण । कीर्तना जाईन वायोरूपें ॥ १५ ॥ निश्चय होतांची जगाचा जो बाप । बोधल्याचें रूप धरुनी आला ॥ १६ ॥ बैसाबा देवोनी बोलताती यांसी । वेड आमुचे दासी लावीयलें ॥ १७ ॥ द्रव्य आमुचें घ्यावें दासीस या न्यावें । देव मनोभावें संतोषले ॥ १८ ॥ शंभर रुपये देवोनीयां त्यासी । घेवोनी दासीसी चालीयले ॥ १९ ॥ आले वाड्यापासी कीर्तनाची वेळ । मागें जों पाहीले नाहींत हे ॥ २० ॥वा-

ज्यांत जों आली बाबा बैसलेत । केलें दंडवत चरणासी ॥ २१ ॥ ह्मणे बाबा तुह्मी पुढें केव्हां आला । आश्चर्यची याला जालें तेव्हां ॥ २२ ॥ सर्व वर्तमान निवेदीलें तीनें । ऐकतां नयन सजळ जाले ॥ २३ ॥ ह्मणती पांडुरंगें केलें हें नवल । भक्ताचा कणवाळ भीम ह्मणे ॥ २४ ॥

॥ **श्रीराम** ॥ माणकोजीबावा सर्व भूतीं दया । उपमाची तया नसे कांहीं ॥ १ ॥ कीर्तन करीती सप्रेमें नाचती । पांडुरंग चित्तीं दुजें नाहीं ॥ २ ॥ कुटाळी मिळोनी केली ऐसी करणी । बावाचें कीर्तनीं तेही येती ॥ ३ ॥ गांवामध्यें येक सर्पदंशें मेला । उचलोनी आणीला कीर्तनांत ॥ ४ ॥ बावा ह्मणती सर्वी टाळी वाजवावी । ध्वजा उभारावी भक्तीची हे ॥ ५ ॥ पांडुरंग सर्व संकट टाळील । वाजवा सकळ आनंदानें ॥ ६ ॥ कडकडाट जेव्हां टाळीचाची होत । तोही वाजवीत नवल पाहा ॥ ७ ॥ निर्जीवां सजीव केलें पांडुरंगें । भक्तसाह्य आंगें ह्मणोनीया ॥ ८ ॥ अभक्त जे होती त्यासी भक्ती जाली । भीमें हे वर्णिली भक्तीसार ॥ ९ ॥

॥ **श्रीराम** ॥ बोधल्याच्या कथा येथोनी समाप्त । सर्व अभंगांत वर्णीयल्या ॥ १ ॥ संतमुखें ज्या ज्या होत्याच ऐकिल्या । तितुक्याच वर्णील्या यथामती ॥ २ ॥ न्यून असेल तें संपूर्ण करावें । संतलीला भावें ऐकती जे ॥ ३ ॥ यशवंतगुरुबापाच्या प्रसादें । अभंग हे छंदें भीम गाये ॥ ४ ॥

**॥ बोधल्याबावाच्या कथा संपूर्ण ॥**

---

# ॥ कथा अनंताची ॥

**॥ श्रीराम ॥** संतसभेमध्यें अनंताची कथा । सांगतां ऐकतां सुख देवा ॥ १ ॥ धर्मरक्षणार्थ अवतार धरितां । शेषासी तत्वता बोलीयले ॥ २ ॥ तुह्मी आह्मी जन्म घेऊं पृथ्वीवर । ऐकतां उत्तर देवाजीचें ॥ ३ ॥ रामावतारांत सुख दिलें फार । ने घे मी साचार जन्म देवा ॥ ४ ॥ बोलीयले देव होतासी लाहान । आतां ज्येष्ठ मान दिला तुज ॥ ५ ॥ ऐकोनीया तेची जाले बळीराम । मानही उत्तम दिल्हा देवें ॥ ६ ॥ त्याची भक्ती पूजा नकरीच धर्म । ह्मणोनीया श्रम जाले त्यासी ॥ ७ ॥ देवाच्या चित्तांत पूजा अनंताची । धर्म करी साची तेव्हां सुख ॥ ८ ॥ काम्यक वनांत होते धर्मराज । देव तेथें सहज आले जेव्हां ॥ ९ ॥ नमन पूजन यथासांग केलें । मग विचारीलें देवाजीसी ॥ १० ॥ धर्मे देवाजीसी केला प्रश्न कैसा । सुख होय ऐसा योग सांगा ॥ ११ ॥ देव बोलीयले अनंताची पूजा । व्रत सार वोजा करी बापा ॥ १२ ॥ मीची तो अनंत दुजे कांहीं नाहीं । भाव धरूनी पाही करी आतां ॥ १३ ॥ कैसी कथा कोणें व्रत सांगा केलें । धर्मे विचारीलें भीम ह्मणे ॥ १४ ॥

**॥ श्रीराम ॥** धर्माच्याची प्रश्न जाणोनीया देव । सांगताती सर्व कथा सार ॥ १ ॥ सुमंत नामाचा विप्र येक होता । कांता पति-व्रता होती त्याची ॥ २ ॥ तिसी जाली कन्या नाम हें सुसीळ । माते ऐसी लीला होती तिची ॥ ३ ॥ पुढें तिचें लग्न केलें आनंदानें । विप्र जो कौंडण्य त्यासी दिली ॥ ४ ॥ सुमंताची कांता गत जाली जेव्हां । दुजी केली तेव्हां कर्कशाची ॥ ५ ॥ जावई मुलीस न्याहोवया आले । कर्कशे कथिलें सुमंतानें ॥ ६ ॥ दिव्य वस्त्रें आणि पक्वान्नें करोनी । सांगाते देवोनी पाठवावें ॥ ७ ॥ कर्कशेनें गळीत चिंद्याचें गांठोडें ।

कदान्न रोकडे बांधोनी दे ॥ ८ ॥ मार्गीं जातां दिव्य सरोवर होतें । स्नानासही तेथें उतरली ॥ ९ ॥ कौंडण्य ऋषी हे स्नानसंध्या करिती । सरोवरीं सती पाहाताहे ॥ १० ॥ देवस्त्रिया आणि अप्सरा अनंत । व्रत पूजा करीत भक्तिभावें ॥ ११ ॥ सुसीला तयासी जावोनीया पुसे । काय सांगा कैसें मजलागीं ॥ १२ ॥ ह्मणती अनंताचें व्रत पूजा आहे । भुक्ती मुक्ती पाहे देतो भावें ॥ १३ ॥ यहलोकीं सुख देईल अनंत । पुढें मोक्ष प्राप्त भीम ह्मणे ॥ १४ ॥

॥ **श्रीराम** ॥ भाद्रपद शुध चतोरदशीसची । अनंताची ऐसी पूजा आहे ॥ १ ॥ रेशमाचा दोरा चौदा गांठीयुक्त । पुजोनी हातांत बांधावा तो ॥ २ ॥ सांगाल तैसेंची करीन मी व्रत । द्यावें मज आतां येचक्षणीं ॥ ३ ॥ भावार्थ पाहोनी दिला दोरा त्यानीं । हातांत बांधोनी प्रेमयुक्त ॥ ४ ॥ आली पतीपासीं तो पुसे तयेसी । ह्मणे विलंबासी लावीले कां ॥ ५ ॥ मग पतिव्रता सर्वही वृत्तांत । पतीसी सांगत मनोभावें ॥ ६ ॥ यानें तें अलक्ष करोनीया ह्मणे । प्रारंब्ध प्राधान्य आहे येथें ॥ ७ ॥ फराळाचें सोड ह्मणतां कौतुक । अनंतानें देख केलें तेथें ॥ ८ ॥ उचिष्ट कदान्नें होतीं तीं सोडीलीं । पक्वान्नेंच केलीं अनंतानें ॥ ९ ॥ चिंद्याचें गांठोडें तेंचि दिव्य वस्त्रें । जाहालीं विचित्रें तये वेळीं ॥ १० ॥ वामहस्तीं होता अनंत गृहासी । येतां संपत्तीसी देखीयलें ॥ ११ ॥ आनंद जाहाला अनंत बोळला । भक्तीभाव जाला पूर्ण पाहा ॥ १२ ॥ सुसीलेचा भाव ह्मणे अनंतानें । केली कृपा पूर्ण आह्मावरी ॥ १३ ॥ पुढें कथा गहन आहे तें ऐकावी । भीम भवगोवी नव्हे मग ॥ १४ ॥

॥ **श्रीराम** ॥ अनंताची पूजा अनंताचें ध्यान । मुखीं नामस्मरण अनंताचें ॥ १ ॥ सुसीला हे सती कौंडण्य पतीसी । ह्मणे संपत्तीसी दिलें देवें ॥ २ ॥ अनंताची कृपा ह्मणोनी संपत्ती । आली ह्मणतां पती कोप आला ॥ ३ ॥ कोठें तो अनंत दावी बरें आतां । तेव्हां

दावी हाता तयालागीं ॥ ४ ॥ चौदा गांठीयुक्त दोरा दावीयला । क्रोधें घे तयाला तोडोनीया ॥ ५ ॥ अग्निमाजी तया टाकीतांची सती । धांवोनीया जाती ध्यावयासी ॥ ६ ॥ दुग्धानें तो अग्नि विझवोनी पाहे । अर्धा जळुनी जाये तये वेळीं ॥ ७ ॥ क्षोभला अनंत संपत्तीही जात । घरही जळत विप्र पाहे ॥ ८ ॥ तस्करें येवोनी सर्व हरण केलें । क्षणामाजी आलें दरीद्र या ॥ ९ ॥ पतिव्रता सती अन्न वर्ज करीं । निश्चयची भारी धरीला जेव्हां ॥ १० ॥ ह्मणे जी अनंता पतीलागीं हेत । होवोनी अनंत पूजी जरी ॥ ११ ॥ तरीच हा प्राण राहील जी देवा । देवें अभिनवा केलें तेव्हां ॥ १२ ॥ विप्र कांतेलागीं ह्मणे सांग कांहीं । ऐसें कांहो पाही जालें असे ॥ १३ ॥ ह्मणे अवकृपा जाली अनंताची । भीम ह्मणे साची निष्ठा तींची ॥ १४ ॥

॥ **श्रीराम** ॥ विप्रा अनुताप जाहाला अद्भुत । ह्मणे तो अनंत भेटे जेव्हां ॥ १ ॥ तेव्हांची मी अन्न घेईन ह्मणोनी । निघाला काननीं पाहावया ॥ २ ॥ प्राणाचा संकल्प करोनी चालीला । तों कूर्म देखीला जळाअंत ॥ ३ ॥ तया ह्मणे कोठें अनंत पाहीला । तो ह्मणे देखीला नाहीं आह्मी ॥ ४ ॥ परी तुज जेव्हां भेटेल अनंत । तेव्हां हा वृत्तांत माझा पुस ॥ ५ ॥ जळाअंत मज दाहा हा बहुत । होतो किंनिमित्य विचारावे ॥ ६ ॥ बरें ह्मणोनीया पुढें जाता गाये । दुग्ध प्राशीताहे अपुलें तें ॥ ७ ॥ तयेसही पुसे अनंत ते ह्मणे । अभागी नयनें न देखे मी ॥ ८ ॥ तुजला अनंत भेटेल निश्चयें । माझा हा पर्याय पुसे त्यासी ॥ ९ ॥ अल्प दुग्ध माझें मीच कां प्राशीतें । परोपकारातें कांहो न ये ॥ १० ॥ बरें ह्मणोनीया तेथोनी निघाला । तों वृक्ष देखीला अंबीयाचा ॥ ११ ॥ फळें बहुतची परी कृमीयुक्त । नाहींच भक्षीत कोणी तया ॥ १२ ॥ पुढें पाहे तंव पुष्करणी दोन । उदकाचें पान कोणा नाहीं ॥ १३ ॥ येकायेकी अंत जळ जाय जाण । अर्थ हा गहन भीम ह्मणे ॥ १४ ॥

॥ श्रीराम ॥ अनंताचा छंद पुढें मृग पाहे । तया पुसताहे वर्तमान ॥ १ ॥ तो ह्मणे रात्रींत राजा होतो कैसें । दिवसा मृग ऐसें कर्म काय ॥ २ ॥ अनंत भेटेल तेव्हां हें पुसावें । येतांना सांगावें मजलागी ॥ ३ ॥ पुढें येक गज उन्मत्त देखीला । तोही बोलीयेला द्विजोत्तमा ॥ ४ ॥ उन्मत्त कांहो मी पुसावें अनंता । पुढें जों पाहातां विप्र देखे ॥ ५ ॥ वृद्ध बहु आणि अर्धांग जळालें । नवल देखीलें कौंडण्यानें ॥ ६ ॥ पुसे त्यासी अंग कोणें हो जाळीलें । सांगावें वहिलें द्विजोत्तमा ॥ ७ ॥ तो ह्मणे अपुल्या पुसावें मनासी । कष्ट हें भोगीसी याच साठीं ॥ ८ ॥ सतीलागीं कष्ट देवोनी अनंत । टाकोनी अग्नींत फिरसी कां ॥ ९ ॥ दुजयासी दुःख देवोनीया सुख । इछीती ते मूर्ख तुज ऐसें ॥ १० ॥ काया वाचा मनें जीवमात्रां सुख । द्यावें तेव्हां देख देव भेटे ॥ ११ ॥ अपुल्या जीवासी दुःख दिलें कोणी । तेही नाठवोनी सुख द्यावें ॥ १२ ॥ क्रोधें दुःख होतें अनुभवासी येतें । तरीही तयातें न सोडीती ॥ १३ ॥ ऐसें तो बोलीयला आणि गुप्त जाला । पुढील कथेला भीम गाये ॥ १४ ॥

॥ श्रीराम ॥ अनंतानें ऐसें चिन्ह दाखऊनी । न दिसे नयनीं विप्रोतमा ॥ १ ॥ मग शोक करी कंठ सद्गदीत । नेत्रांतुनी येत अश्रु-धारा ॥ २ ॥ धांव धांव आतां भेट दे अनंता । ब्रह्महत्त्या आतां घेऊं नको ॥ ३ ॥ मी तों अपराधी अन्याई पतीत । परी कृपावंत आहेसी तूं ॥ ४ ॥ आचरण वय विद्या वंश कांहीं । पराक्रम तूंही न पा-हासी ॥ ५ ॥ रूपवंत धनवंत न पाहासी । भक्ती भुलतोसी ऐसें आहे ॥ ६ ॥ मी जालों अशक्त परी कांता माझी । भक्ती करी तुझी मनोभावें ॥ ७ ॥ खरी भक्ती तीची असेल हो जरी । तरी मज हारी भेट देई ॥ ८ ॥ ऐसा प्रेमयुक्त गहींवरें बोलत । तेथेंची अनंत प्रग-टले ॥ ९ ॥ चतुंभुज शंखचक्रगदापद्म । मूर्ति अभिराम वर्ण-वेना ॥ १० ॥ मुकुट कुंडलें गळां वैजयंती । कौस्तुभाची दीप्ती

फांकलीसे ॥ ११ ॥ पितांबरशोभा गगनाचा गाभा । अंगकांतीप्रभा सांवळा जो ॥ १२ ॥ थवथवीत मूर्ती पाहातांची विप्र । ह्मणे धन्य नेत्र अजी माझे ॥ १३ ॥ जन्मोजन्मीं बहु होतें पुण्य केलें । दर्शन जाहालें भीम ह्मणे ॥ १४ ॥

॥ **श्रीराम** ॥ बोलीयले देव तुझीया कांतेच्या । भावार्थे तयेच्या भेटे तुज ॥ १ ॥ आतां घरां जाये वाट पाहे सती । व्रत बरव्या रीतीं करी आतां ॥ २ ॥ मज बहु प्रीति आवडे हें जाण । पुजाविधी करणें येथासांग ॥ ३ ॥ आज्ञा ह्मणोनी विप्रें पाईं मस्तकासी । ठेवोनी देवासी पुसताहे ॥ ४ ॥ मार्गी जाली चिन्हें या भाव काय । सांगतां हे माये भाविकाची ॥ ५ ॥ विद्याभिमानें तो न सांगे कोणासी । सेवा शिष्यापासी घेवोनीया ॥ ६ ॥ त्या दोषें तो कूर्म जळामाजी दाहा । होत असे पाहा तयालागीं ॥ ७ ॥ गाय हेंचि पृथ्वी बीज धरी ह्मणुन । आपुलें आपण दुध प्राशी ॥ ८ ॥ अंब्याचा वृक्ष तो होता धनवंत । कृपण बहुत ह्मणोनियां ॥ ९ ॥ राजा प्रजा पीडी ह्मणोनी तो मृग । पंडीत तो अंगें गज जाला ॥ १० ॥ पुष्करणी जाण उभयतां बहिणी । येकमेकी जणी वाणेदानें ॥ ११ ॥ विप्र भेटला तो मीच होये जाण । संवज्ञार्थ खूण सांगीतली ॥ १२ ॥ सुटिकाही त्यांची माझीया चिंतनें । जातांना सांगणें तयालागीं ॥ १३ ॥ सांगोनीया ऐसें जाहालें अदृश्य । सांडोनी आलस्य भीम गाये ॥ १४ ॥

॥ **श्रीराम** ॥ मार्गी येता मग सर्वांसी सांगत । चिंतावा अनंत मुक्त व्हाल ॥ १ ॥ मग आला गृहा सुसीळेसीं ह्मणे । अनंतदर्शन जालें मज ॥ २ ॥ देवें सांगितलें व्रत करावया । सुखाच्या उपाया हेंचि आहे ॥ ३ ॥ येहलोकीं सुख देईन तुह्मासी । अंतीही मोक्षासीं पाववीन ॥ ४ ॥ मग आनंदानें व्रत पूजा केली । संपत्तीही आली होती तैसी ॥ ५ ॥ ह्मणोनी हें व्रत धर्मा त्वां करावें । सर्व सुख व्हावें सह-

जांत ॥ ६ ॥ पूर्वी कुबेरानें केलें होतें जाण । सगरासी पूर्ण भक्ती याची ॥ ७ ॥ हरिश्चंद्रादिक सूर्यवंशी भोज । सोमवंशी राजे करीती हें ॥ ८ ॥ मीच तो अनंत दुजे कांहीं नाहीं । भाव धरुनी तूंही करी धर्मा ॥ ९ ॥ ऐसें सांगोनीया गेले द्वारकेसी । आली चतोर्दशी भाद्रपदीं ॥ १० ॥ यथासांग व्रत धर्मरायें केलें । राज्य प्राप्त जालें तयालागीं ॥ ११ ॥ वराहपुराणीं ऐसी कथा आहे । विष्णुव्रत पाहें प्रिय देवा ॥ १२ ॥ कथा हे जे गाती भावार्थे ऐकती । तयासीं श्रीपती तुष्ट होय ॥ १३ ॥ येहलोकीं सुख पुढें होय मोक्ष । कथेच्या प्रत्यक्ष श्रवणेंची ॥ १४ ॥ यशवंतसुत धरोनीया हेत । अभंगींच गात चरित्र हें ॥ १५ ॥

**॥ इति श्री अनंतव्रताची कथा संपूर्ण ॥**

---

# दामोदर देव

**॥ श्रीराम ॥** दामोदरदेव संत मोठे जाले । ब्रह्मची पाहीलें विश्व ज्यांनीं ॥ १ ॥ सर्वाभूतीं येक वासुदेव पाहाती । आत्माच देखती संतराव ॥ २ ॥ रानामध्यें व्याघ्र उग्र होता मोठा । त्याचे पाईं कांटा मोडलासे ॥ ३ ॥ सुजलासे पाय दुख जालें त्यासी । गेले हे त्यापासी अकस्मात ॥ ४ ॥ व्याघ्रें दुरोनीया पाय दाखवीला । कळवळा आला पूर्ण यांसी ॥ ५ ॥ जवळी जावोनी निशंक बैसले । कांट्यासी काढीले तयाचीये ॥ ६ ॥ औषध बांधोनी पाये बरा केला । धन्य संतलीला भीम हाणे ॥ ७ ॥

# महा मुद्गलभट्ट

॥ श्रीराम ॥ माहामुद्गल हे भट्ट जाले संत । होते रामभक्त निसीमची ॥ १ ॥ माता निष्ठावंत अनुग्रह तीनें । दिला यांसी पूर्ण भावयुक्त ॥ २ ॥ राममंत्र तेराक्षरी सांगितला । निजध्यासें जाला साक्षात्कार ॥ ३ ॥ अष्टोत्तर शत आर्या केल्या स्पष्ट । राघव संतुष्ट जाला तेणें ॥ ४ ॥ जयांच्या आर्यांचें करितां पारायण । पातकें संपूर्ण जाती पाहा ॥ ५ ॥ येके दिसीं गेले होते संचारासी । मिळवोनी द्रव्यासी येत होते ॥ ६ ॥ चोरें पाळतीले घालेण पाहोनी । आरण्य जाणोनी येती जंव ॥ ७ ॥ आर्यांतील येक चरण ह्मणती । रक्षी सीतापती येवोनीया ॥ ८ ॥

॥ चरण आर्येचा ॥

धन्विनौ सुरभिश्रीकौ काकपक्षधरावुभौ ।

ऐसें ह्मणतां पुढें आले सीतापती । उन्मीळेचा पती मागें चाले ॥ ९ ॥ घोड्यावरी संत प्रेम हें अद्भुत । स्मरणांत चित्त रंगलेंसें ॥ १० ॥ पाहोनी तस्कर भयभीत जाले । परंतु चालीले राखीतची ॥ ११ ॥ नित्य पाहाती तों मागें पुढें वीर । घरासी सत्वर आले ऐसें ॥ १२ ॥ चोर येवोनीया यांसी विचारिती । दावा जी रक्षिती तुह्मासी तें ॥ १३ ॥ मागें पुढें उभे धनुष्य घेवोनी । निद्राही नयनीं न ये त्यांसी ॥ १४ ॥ येक तो सावळा दुजा गौरवर्ण । रक्षिती संपूर्ण दिवारात्रीं ॥ १५ ॥ ऐकतांची यांच्या नेत्रा आले अश्रु । ह्मणती सीतावरु श्रमी जाला ॥ १६ ॥ चोराचीये पाईं करिती नमनासी । दर्शन तुह्मासीं दिल्हें देवें ॥ १७ ॥

---

१ चोरखिंड

चोरा भाव जाला स्वकर्म सोडीलें । तेही भक्त जाले भीम ह्मणे ॥ १८ ॥

**॥ श्रीराम ॥** माहामुद्गल हे भट्ट आनंदांत । भजन करित अहर्निसीं ॥ १ ॥ सप्तशृंगीं येक विप्र होता कुष्ट । देवी सांग स्पष्ट तयालागीं ॥ २ ॥ मज कांहीं वेथा न जाये जाणावे । भटजीपासीं जावें पैठणासी ॥ ३ ॥ आला यांजपासीं सर्व निवेदीलें । मातेसी पुसीले तेव्हां यांनी ॥ ४ ॥ माता ह्मणे त्यांसी नेई तूं गंगेसी गळतकुष्ठासी स्नान करवीं ॥ ५ ॥ राम ह्मणवोनी बुडी मारवावी । निरसील गोवी राम माझा ॥ ६ ॥ यांनीं नेवोनीया त्रिवार स्मरण । करवोनी स्नान पाहातांची ॥ ७ ॥ दिव्यदेही जाला कुष्ट सर्व गेला । आनंद जाहाला संतराया ॥ ८ ॥ घरीं येवोनीया मातेला सांगती । धन्य नाम क्षितीं राघोवाचें ॥ ९ ॥ त्रिवार ह्मणवितां जाला दिव्यदेही । माता रुष्ट पाहीं जाली तेव्हां ॥ १० ॥ येकवेळ ह्मणतां काय येक नव्हे । कां गा रामराये श्रमवीला ॥ ११ ॥ माते मी आज्ञान नेणेची महात्म । नमन सप्रेमें केलें पाईं ॥ १२ ॥ ऐशा संतलीला गाती जे ऐकती । तेही मुक्त होती भीम ह्मणे ॥ १३ ॥

**॥ श्रीराम ॥** माहामुद्गल हे भट्ट वृंदवना । यात्रेलागीं जाणा विचारीती ॥ १ ॥येथें कोण देव आहे हें पुसती । सर्वही सांगती राधा-कृष्ण ॥ २ ॥ न जाती दर्शना रामभक्त पूर्ण । जयरामध्यान अह-र्निसीं ॥ ३ ॥ बहुतचि तेव्हां आग्रह सर्वांनीं । नेले संतजनीं देवा-लयांत ॥ ४ ॥ तेव्हां नेत्र यांनीं बळकट लावीले । देवापुढें नेले अकस्मात ॥ ५ ॥ आलों देवापुढें ऐसें विचारीलें । मग आरंभीलें स्तवनासी ॥ ६ ॥ साता भोकाचें हें कांडें द्या टाकोनी । जयालागीं वेणु ह्मणताती ॥ ७ ॥ धनुष्यबाणासी धरा स्वामी हास्तीं । राधा आवडती लाऊन द्या ॥ ८ ॥ जगन्माता आमुची सीता सती आणा । गुरेंखीया-पणा सोडोनी द्या ॥ ९ ॥ भूप आयोध्येचे राम व्हाल जरी । मस्तक हा

तरी लवे जाणा ॥ १० ॥ भक्ताच्या वाक्याची प्रीत नारायेणा । जाला रामराणा तये वेळे ॥ ११ ॥ उघडोनी डोळे केली पूजा मग । भक्ती हे अभंग भीम ह्मणे ॥ १२ ॥

॥ **श्रीराम** ॥ माहामुद्गल हे भटजीनीं ध्यान । करोनी संपूर्ण बोलीयले ॥ १ ॥ अनाथासी थोर करोनी दावीले । तुह्मी वाढवीले दीनालागी ॥ २ ॥ आतां हें कोदंड सोडा वेणु धरा । मयोराचा करा मुगुट जी ॥ ३ ॥ आवडती राधा बोलावा जवळी । व्हा जी वनमाळी पूर्ववत ॥ ४ ॥ येथील हें ध्यान नव्हे ह्मणोनीया । प्रार्थना हे पायां केली स्वामी ॥ ५ ॥ पारि मी नमन करोनी जाईन । मग व्हावें पूर्ण देवराया ॥ ६ ॥ भक्ताच्या मुखांत जैसें जैसें येत । देव तैसा होत भीम ह्मणे ॥ ७ ॥

॥ श्लोक ॥

सच्छिद्रं त्यज वेणुमुन्नतगुणं चापं करे धार्यताम् ।
राधां वामविलोकनां त्यज सखे सीतां सतीं स्वीकुरु ।
गोपत्वं विरहय्य यादवपते भूपत्वमंगीकुरु ।
रामं श्यामतनुं परात्परगुरुं देहं तदाहं भजे ॥ १ ॥
विहाय कोदंडशरान् मुहूर्तान् ।
गृहाण पाणौ मणिचारुवेणुम् ।
मयूरबर्हाणि निजोत्तमांगैः ।
सीतापते त्वां प्रणमामि पश्चात् ॥ २ ॥

---

# अंबाबाई

॥ **श्रीराम** ॥ नामदेवाची हे कन्या अंबाबाई । भक्तीची नवाई ऐका तिची ॥ १ ॥ पंढरीस नामदेवाघरीं होती । तेव्हां आला पती न्याहावया ॥ २ ॥ कार्तीकीची यात्रा होती दोन महिने । नामदेवा ह्मणे आणाल कीं ॥ ३ ॥ मातेसी विचारी आणिसील काय । ते ह्मणे उपाय माझा नाहीं ॥ ४ ॥ आणूं तुज ऐसें कोणीच न बोले । जाणें बोढवलें ऐसीयांत ॥ ५ ॥ पांडुरंगापासीं जाय गळा पडे । दीर्घस्वरें रडे आळवोनी ॥ ६ ॥ विठोबारे माझ्या आणावें त्वां मज । रखी माझी लाज सख्या माझ्या ॥ ७ ॥ कार्तीकीची यात्रा साधुसंत येती । अभागी मी पती नेऊं आला ॥ ८ ॥ जरि देवा मज न आणीसी जाण । स्त्रीहत्या घालीन तुजवरी ॥ ९ ॥ ऐसें बोलोनीया मस्तक चरणीं । ठेवोनी तेथोनी चालीयली ॥ १० ॥ आली सासन्यासी ध्यानसे देवासी । विठल मानसीं अहिर्निसीं ॥ ११ ॥ कामधंद्यामाजीं विठल विठल । छंद सर्वकाळ हाचि जये ॥ १२ ॥ कार्तीकीची यात्रा सन्निधची आली । धाबीरीच जाली सती तेव्हां ॥ १३ ॥ पंढरीचे वाटे जावोनीया पाहे । पांडुरंगमाय भेटे केव्हां ॥ १४ ॥ पताकाचे भार संतांचे संभार । कीर्तन गजर होत असे ॥ १५ ॥ चंद्रभागे स्नान नक्षत्रप्रदक्षणा । करितांची जाणा मोक्षपद ॥ १६ ॥ स्वप्नांतही हाचि निजध्यास निसी । विठलाची पिसी जाली पाहा ॥ १७ ॥ कधीं हा देवाजी ह्मणे देळ मूळ । जाहला व्याकूळ जीव माझा ॥ १८ ॥ उद्या येकादशी न होतां दर्शन । प्राण हा धाडीन तुह्मापासीं ॥ १९ ॥ शरीर हें यांचें घेवोत हे सुखें । देहावीण देखे पांडुरंगा ॥ २० ॥ सासुसासऱ्याचा जाच बहुपरी । संकल्पची करी जीवीत्वाचा ॥ २१ ॥ पांडुरंगें तीच्या भावाचें स्वरूप । धरोनी सरूप आला तेथें ॥ २२ ॥ गरुडाचे घोडे करोनीया आला ।





बहिर्णीसी भेटला तये वेळीं ॥ २३ ॥ ते ह्मणे रे दादा घरचीं क्रूर सारी । नेसी कैसे परी मज सांग ॥ २४ ॥ समाधान यांचें करोनीया न्यावें । मान्य केलें देवें तये वेळीं ॥ २५ ॥ मामासी भेटोनी शेलापागोत्यासी । देवोनी अंबीसी धाडा ह्मणे ॥ २६ ॥ अत्यंत दरिद्री वस्त्रें खुष जाला । ह्मणे त्या मुलीला पंढरीसी ॥ २७ ॥ सासु क्रूर मोठी ह्मणे मी न धाडी । तयेलाही साडी नेसवीली ॥ २८ ॥ मेहुण्याचा कोप जाणोनी तयासी । पोषाकची त्यासी दिला पाहा ॥ २९ ॥ मग बोलीयले अंबाबाईसवें । भावोजीनीं यावें यात्रेलागी ॥ ३० ॥ श्वशुर बोलीला भांडवल होतें । दुकानची तेथें घालीतो मी ॥ ३१ ॥ पुत्र आणि सून ठेवावी पंढरी । ऐसी माझी खरी इछा आहे ॥ ३२ ॥ सहस्त्र रुपये जरी कोणी देता । सुन आणि सुता ठेवितो मी ॥ ३३ ॥ पंढरीहूनीया नाणीतोच मग । ऐसें पांडुरंगें ऐकतांची ॥ ३४ ॥ खलिती काढोनी ठेवियेली पुढें । नवल हें गाढे केलें पाहा ॥ ३५ ॥ पंढरीस मग जावया निघती । घोड्यावरी सती बैसवीली ॥ ३६ ॥ पुढें पांडुरंग मागें तिचा पती । क्षणामाजी येती पंढरीस ॥ ३७ ॥ वाळवंटीं आले बाई उतरोन । खलीती देवोन पतीपासी ॥ ३८ ॥ उभयता तुह्मी पुढें व्हावें आतां । येतों मी तत्वता मागोनीया ॥ ३९ ॥ मागें जों पाहाती अदृश्य जाहाले । पांडुरंगें केलें नवल ऐसें ॥ ४० ॥ नामदेवा दोघे नमन करोनी । वर्तमान कानीं निवेदीलें ॥ ४१ ॥ ह्मणती नामदेव पांडुरंग आले । भक्तीसी भुलले मुली तुझे ॥ ४२ ॥ अक्षई तुह्मासी येथेंची ठेवीले । वेरझार केलें शून्य देवें ॥ ४३ ॥ यशवंतसुत संतलीला गात । प्रेम हें चित्तांत धरोनीया ॥ ४४ ॥

---

# नामदेव

॥ **श्रीराम** ॥ नामदेव द्वारकेस जातां मार्गीं । कैसे भक्तीरंगीं रंगले हे ॥ १ ॥ येक गांव होता तेथें येक बाई । क्रूर होती पाही बहुत ते ॥ २ ॥ येक पुत्र येक कन्या होती तीस । जाच करीतसे सुने बहु ॥ ३ ॥ पुत्रा आणि सुने ऐक्य होउं न दे । जीर्ण वस्त्रासी दे तयेलागी ॥ ४ ॥ घराच्या बाहेरी जीर्ण झोपड्यांत । ठेवोनी तयेते जाची बहु ॥ ५ ॥ उपवर परी उपायची नाहीं । माहेरींही कांहीं ठाव नसे ॥ ६ ॥ पुत्रासी गृहांत निजऊनी द्वारीं । पडते ह्मातारी ऐसें असे ॥ ७ ॥ गांवांतील बहू पुत्रासी सांगत । परी मातृभक्त असेची तो ॥ ८ ॥ कन्या पतीगृहीं जाली गरोदर । प्रसुत विचार पडे तेथें ॥ ९ ॥ होता पती मात्र दुजे नाहीं कोणी । तेन्हां बोले वाणी पतीसी ते ॥ १० ॥ माझीये मातेसी आणा बोलाऊन । तेन्हां घोडें यानें पाठवीलें ॥ ११ ॥ कन्येपासीं ईचा होता जीवप्राण । पुत्रालागीं ह्मणे जाते आतां ॥ १२ ॥ सर्वही धान्यासी लिंपणें घालोनी । महिन्याचें मोजोन दिलें यासी ॥ १३ ॥ त्वरीत मी येते ह्मणोनी निघाली । गृहामाजी गेली कन्येच्या ते ॥ १४ ॥ मागें ग्रामस्तांनीं यास बोलाऊन । निषेध करोन बोलीयले ॥ १५ ॥ तुझी माता ये तों पत्नी ने गृहांत । सर्वही साहीत्य आह्मी देतों ॥ १६ ॥ ग्रामस्तीं दंपत्यपूजनची केलें । धान्यही दिधलें उभयांसी ॥ १७ ॥ मग आनंदानें येकत्र जाहाली । प्रीतिही वाढली उभयांची ॥ १८ ॥ देवें दया केली गर्भवती जाली । सासुही राहीली बहु दीन ॥ १९ ॥ कन्ये कांहीं रोग जाहाला ह्मणून । षण्मास हे जाण राहे तेथें ॥ २० ॥ पुढें आली गांवासन्निध ह्मणोनी । पुत्रासी येवोनी सांगताती ॥ २१ ॥ ऐसें ऐकतांची कांतेसी बाहेरी । घालोनीया करी पूर्ववत ॥ २२ ॥ घरीं येवोनीया सुनेसी पाहीले । बहू द्वेषा केले

वर्णवेना ॥ २३ ॥ तेथें नामदेव आले अकस्मात । आवडीं ग्रामस्त
राहाविती ॥ २४ ॥ कीर्तनासी यांच्या येती सर्व जन । पुत्रासी घेवोन
हेहीं आली ॥ २५ ॥ कथा ऐकतांची वैराग्य जाहालें । पुत्रालागीं बोले
तयें वेळीं ॥ २६ ॥ जावें द्वारकेसी समागमें यांच्या । गुंतलो मायेच्या
पासीं आह्मी ॥ २७ ॥ प्रात:काळीं पुत्रासहीत निघाली । सुनहीं चालीली
समागमे ॥ २८ ॥ नित्य कीर्तनाचा बोध जेव्हां होये । सुन ऐकताहे
भावयुक्त ॥ २९ ॥ दिवस जाहाले प्रसुतीची वेळ । झार्डाही प्रबळ गांव
नाहीं ॥ ३० ॥ विसाच कोसाची मजल ह्मणोन । यात्राही त्वरेनें जाऊं
लागे ॥ ३१ ॥ मागें मागें राहे चालवेना ईसी । आली दाहा कोसी
जैसी तैसी ॥ ३२ ॥ टाकोनीया ईसी सर्व गेले जेव्हां । मार्गावरी तेव्हां
बैसली हे ॥ ३३ ॥ पुढें दाहा कोस मागें दाहा कोस । झाडी हे
कर्कश भयेंकर ॥ ३४ ॥ तेथें हे बैसली प्रसुतीची वेळ । जाहाली
व्याकुळ बहु जेव्हां ॥ ३५ ॥ दीर्घस्वरें रडे मोवताले पाहे । ह्मणे
कृष्णमाये धांव आतां ॥ ३६ ॥ कृष्णाबाई आई धांव लवलाई । कोणी
नाहीं पाहीं मज आतां ॥ ३७ ॥ सासु पती तेही गेले टाकोनीया ।
आतां दावी पाया देवराया ॥ ३८ ॥ बहुतां पावसी ऐसें कीर्तनांत ।
नामदेव संत गात होते ॥ ३९ ॥ खरे संत त्यांचें गाणें खरें असे ।
तरी पाव ऐसें बोलताहे ॥ ४० ॥ ऐसी वेळ कोणा मागें नसे आली ।
धांव वनमाळी झडकरी ॥ ४१ ॥ नेत्रीं अश्रुधारा सद्‌गदीत कंठ । मारी
हाक स्पष्ट अटाहास्यें ॥ ४२ ॥ कळवळा देवासी नावरेच पोटीं ।
आले जगजेठी अकस्मात ॥ ४३ ॥ दिव्य रूप देवें धरोनी स्त्रीयेचें ।
अभिनव साचें केलें तेथें ॥ ४४ ॥ माहाल तेथेंचि करोनी उत्पन्न ।
तयामाजीं जाण नेले तीसी ॥ ४५ ॥ बाळंतपण हे देव कीरताती ।
पाय तिचे धुती काय सांगूं ॥ ४६ ॥ नामदेव गेले द्वारके जेधवां ।
तेथें जाले तेव्हां कैसें पाहा ॥ ४७ ॥ देवाच्या दर्शना नामदेव जाती ।
कपाटें लागती अकस्मात ॥ ४८ ॥ तेथेंचि हे उभे राहीले मनांत ।

विस्मय बहुत जाला यांसी ॥ ४९ ॥ ह्मणती मी अभक्त लावीले कपाटा। नाहीं मज निष्ठा खरें देवा ॥ ५० ॥ पंढरी सोडोनी आलों येथें कां मी । ह्मणोनीया तुह्मी शिक्षा केली ॥ ५१ ॥ परी जगामध्यें जाली अपकीर्ती । प्राणाची समाप्ती करूं येथें ॥ ५२ ॥ हेही मोक्षपुरी येथें देहपात । करावा हें मत तुझें वाटे ॥ ५३ ॥ निग्रह करितां वाणी जाली ऐसी । मी गेलों मार्गासी ऐक बापा ॥ ५४ ॥ ह्मातारीची सून प्रसुत मार्गांत । जाली मीही तेथ गेलों आहे ॥ ५५ ॥ वीस कोस झाडी लागली तयांत । राहीली मी तेथ आहे जाण ॥ ५६ ॥ बाळंतपण हें करितो मी तीचें । दर्शन आमुचें तेथें तुज ॥ ५७ ॥ मग नामदेव तीर्थसंपादणी । करोनी तेथोनी चालीयले ॥ ५८ ॥ झाडींत मुकाम केला नामदेवें । रात्रीमाजीं सर्व निजले तेव्हां ॥ ५९ ॥ मध्यरात्रीं देवें देवोनी दर्शन । माहालांत जाण नेले यांसी ॥ ६० ॥ कृष्णाबाई मूल करोनी स्वाधेन । अदृश्य भगवान जाले मग ॥ ६१ ॥ माहालही तेथें नाहींसाचा जाला । विचित्र हे लीला देवाजीची ॥ ६२ ॥ सासु पती कांता मूल येक करून । गृहासी नेऊन घालवीली ॥ ६३ ॥ मग सासु सुनेवरी लोभ करी । संतलीला बरी वर्णीयली ॥ ६४ ॥ यशवंतसुत संतलीला गात । पंढरीस येत नामदेव ॥ ६५ ॥

---

## ॥ जनाबाई ॥

**॥ श्रीराम ॥** नामदेवाचीये घरीं जनाबाई । भक्तीची नवाई ऐका तीची ॥ १ ॥ संतसमागमें विठलाचा छंद । अंतर्बाह्य वेध लागलासे ॥ २ ॥ निजध्यासें जाला साक्षात्कार मोठा । अद्भुतची निष्ठा वर्णवेना ॥ ३ ॥ गोवऱ्या आणाया जावें माळावरी । तेथें भजन करी

आनंदानें ॥ ४ ॥ टाळ्या वाजऊनी नृत्यची करावा । देहेभाव जाव। तये वेळे ॥ ५ ॥ तेव्हां देवाजीनीं यावें अकस्मात । तिचें काम करित पांडुरंग ॥ ६ ॥ पितांबराअंत गोवऱ्या वेंचीत । प्रेमासी भुलत भीम ह्मणे ॥ ७ ॥

**॥ श्रीराम ॥** जनाबाई येके दिनीं दळायासी । बैसली मानसीं पांडुरंग ॥ १ ॥ नाचणे दळाया दिले होते ईस । भान नसे तीस दळायाचें ॥ २ ॥ नेत्र लावोनीया भजन करीत । पांडुरंगीं चित्त मग्न जालें ॥ ३ ॥ नामदेवमाता गोणाबाई तेथ । येवोनी पाहात जनी तेव्हां ॥ ४ ॥ ह्मणे वेडी जाली दळण राहीलें । सावधान केलें तये वेळे ॥ ५ ॥ ऐसें दोन वेळे सावधान केलें । मग लाते दिले पाठी-वरी ॥ ६ ॥ जनाबाई लात बैसतांची मग । आले पांडुरंग दळा-वया ॥ ७ ॥ क्षणामाजी देवें दळोनीया पीठ । सुपामाजी नीट भरीयलें ॥ ८ ॥ जाहाले अदृश्य आली गोणाबाई । पाहे पीठ अई सुपामध्यें ॥ ९ ॥ ह्मणे जने कैसें इतुक्यांत दळीसी । अश्रु आले ईसी सद्गदीत ॥ १० ॥ देवाल्यांत गेले पाहाती पुजारी । पितांबरावरी पीठ आहे ॥ ११ ॥ साधुसंत सर्व बोलीले त्या वेळीं । चिन्हचि यावेळीं दाखवीलें ॥ १२ ॥ वैकुंठपीठ हे पंढरी ह्मणून । पिठाची हे खूण दावी देव ॥ १३ ॥ परी नाचण्याचें प्रमेय ऐकावें । देवासाठीं व्हावें लज्या-तीत ॥ १४ ॥ निर्लज्जे होवोनी प्रेमें जो नाचेल । वैकुंठ होईल तयासची ॥ १५ ॥ सज्जनाचा अर्थ सज्जन जाणती । प्रपंची पाहाती परब्रह्म ॥ १६ ॥ यशवंतसुत धरोनीया हेत । संतलीला गात भाव-युक्त ॥ १७ ॥

**॥ श्रीराम ॥** जनाबाईसवें जेऊं लागे देव । ऐसा होता भाव दिव्य जीचा ॥ १ ॥ नामदेवें ईस प्रथम वाढोन । देवोनी भोजन करिताती ॥ २ ॥ पुढें घ्यावें पात्र लावी मग नेत्र । त्रितावा पवित्र पांडुरंग ॥ ३ ॥ विठोबारे सख्या येई झडकरी । दीन मी किंकरी आहे

तुझी ॥ ४ ॥ तूं आल्यावांचून न करी भोजन । सजळ नयनं प्रेम मोठें ॥ ५ ॥ आळवितां यावें जेवोनीया जावें । भुलवीला भावें पांडुरंग ॥ ६ ॥ श्रावणमासांत आला सोनवार । जाहालीसें रात्र भोजनासी ॥ ७ ॥ जनीचें त्या वेळे विस्मरण जालें । नामदेवें केलें भोजनासी ॥ ८ ॥ मग मातेलागी बोलती जनीसी । न दिले पात्रासी आज पाहा ॥ ९ ॥ मातेनें उचिष्टें गोळा करोनीया । दिली नेवोनीया जनाबाई ॥ १० ॥ ईच्याही अंगासी सीत आले होतें । पाहोनी पात्रातें उच्चीष्टाच्या ॥ ११ ॥ सिक्यावरी ठेवी देवा न बोलावी । श्रम जालें जीवीं बहुसाल ॥ १२ ॥ पलंगावरी पांडुरंग रुक्मीणीसी । ह्मणती उपवासी आहे आज ॥ १३ ॥ रखुमाई ह्मणे कोणा भक्ता अन्न । न मिळाले ह्मणून वेडे जाला ॥ १४ ॥ अपरात्र जाली करावें शयन । ह्मणती झोप जाण न लागेची ॥ १५ ॥ नित्याचें भोजन राहीलें आमुचें । बोलावणें साचें आलें नाहीं ॥ १६ ॥ बोले रखुमाई नित्याचें भोजन । न इछावा मान जावें आतां ॥ १७ ॥ भोजन तयाचें जालें किंवा नाहीं । देव ह्मणे पाही उपाशी तो ॥ १८ ॥ आई ह्मणे जनी असेल उपाशी । जावोनी तयेसी जेऊं घाला ॥ १९ ॥ कळवळोनी देव जनीपासी आले । उठविती वहिले तयेलागीं ॥ २० ॥ उघडोनी नेत्र पाहीला सावळा । ह्मणे बा विठला कां आलासी ॥ २१ ॥ मज सीत आले शरीराचा भोग । भोगीते मी सांग जावें तुह्मी ॥ २२ ॥ जवळी बैसोनी हात फिरवीले । सीत निवारीलें क्षणामाजी ॥ २३ ॥ उठोनी चरणीं मस्तक ठेवीला । जावें बा विठला निजस्थाना ॥ २४ ॥ न पाचारितां कां आलासी धांवोनी । बोलीले भगवान अन्नासाठीं ॥ २५ ॥ क्षुधा फार मज लागली पोटांत । भोजन त्वरित घालीं मज ॥ २६ ॥ जनी ह्मणे देवा उचिष्टें मजला । दिलीं ह्मणून तुला न बोलावी ॥ २७ ॥ पांडुरंग ह्मणती उचिष्टें आह्मासी । चारीयली कैसीं तेंही ऐक ॥ २८ ॥ शबरीनें मागें उचिष्टची बोरें । चारीली आदरें

भावयुक्त ॥ २९ ॥ तैसेंची गोकुळीं गोपाळानीं केलें । उचिष्ट चारिलें मुखांतील ॥ ३० ॥ संताचें उचिष्ट न ह्मणावें कदां । प्रसाद तो सदां सेऊं आह्मी ॥ ३१ ॥ देव सिंक्यावरून पाटी उतरिती । पक्कान्नें तीं होती हस्तस्पर्शें ॥ ३२ ॥ मग जनाबाई सांगाते घेवोनी । जेवीले ह्मणोनी भीम गाये ॥ ३३ ॥

॥ **श्रीराम** ॥ जनाबाईसंगें जेवोनी तेथेंचि । निजती श्रीपती प्रमासाठीं ॥ १ ॥ उशी तिची देव वोढोनीया घेती । वाकळही प्रीति पांघरले ॥ २ ॥ जनाबाईचीया उशाकडे नाहीं । दिला बाहु पाही देवरायें ॥ ३ ॥ मग गोष्टी माता सांगती मागील । भक्तीची हे भूळ आहे आह्मा ॥ ४ ॥ जनाबाई देवापुढें निजे कैसी । बापापुढें जैसी कन्या निजे ॥ ५ ॥ देवाची भावना कौसल्या यशोदा । तैसीच गोविंदा प्रीत ईची ॥ ६ ॥ दोघेही निष्काम ह्मणूनी परस्परें । प्रीति जाली थोर वर्णवेना ॥ ७ ॥ प्रातःकाळीं देव गडबडीनें गेले । पदक राहीलें गळ्यांतील ॥ ८ ॥ पुजारी पाहातां पदकची नाहीं । गडबडले पाहीं तये वेळे ॥ ९ ॥ हकीमासहीत शोध जों करिती । घरांत [illegible] जनाबाई ॥ १० ॥ पदक कां देव टाकोनीयां गेले । ऐकतांची आले लोक तेथें ॥ ११ ॥ तयांसी पदक देतांची ते नेती । हाकीमा सांगती जनी चोर ॥ १२ ॥ चाळीस शिपाई धाडीले तयानें । जनीस बांधोन आणा ह्मणे ॥ १३ ॥ जनाबाई तेव्हां भजन करीत । अकस्मात दूत आले तेथें ॥ १४ ॥ बांधोनीया हात चालवीली त्यानीं । पाहाती नयनीं लोक सारे ॥ १५ ॥ हाकीमाजवळी अणीयली जेव्हां । विचारितो तेव्हा जनाबाई ॥ १६ ॥ कैसें हें पदक नेलेस चोरोन । सांग आतां जाण सवीस्तर ॥ १७ ॥ ह्मणे पांडुरंगावीण कांहीं नेणे । त्याचें हें करणें तोचि जाणे ॥ १८ ॥ देतो सुळावरी जाहाला शेवट । इछा काये स्पष्ट सांग आहे ॥ १९ ॥ जनाबाई ह्मणे देवाचें दर्शन । घ्यावें ऐसें मन इछीताहे ॥ २० ॥ त्याचे ह्मणे ईसी पाहों द्या देवासी । मग द्या सुळासी

त्वरा करा ॥ २१ ॥ देवापुढें नेली खांद्यावरी सूळ । पाहीलें सकळ देवा ह्मणे ॥ २२ ॥ आमुचा हा भोग भोगूं आह्मी आतां । तुह्मी लोभ आतां असों द्यावा ॥ २३ ॥ शरीराचा भोग शरीर भोगील । जीव हा येईल तुह्मापासी ॥ २४ ॥ ऐसें बोलोनीया तेथोनी चालीली । लोक दाटी जाली पाहावया ॥ २५ ॥ नामदेवा कोणी जावोनी सांगती । तुमची जनी देती सुळावरी ॥ २६ ॥ संत बोलीयेले आपुली प्रतिष्टा । वाढवाया चेष्टा केली देवें ॥ २७ ॥ भक्तासी संकट करोनी रक्षावें । थोरपण व्हावें दाखवाया ॥ २८ ॥ आपुलें थोरपण भक्तसाह्ये ह्मणून । केलें हें संपूर्ण पांडुरंगें ॥ २९ ॥ आह्माहुनी जनी आवडे तयासी । पाहा कौतुकासी होईल तें ॥ ३० ॥ इकडे जनाबाई पुंडलीकापासीं । नेवोनी सुळासी रोवीयले ॥ ३१ ॥ जनाबाई ह्मणे सर्वत्र भजन । करा बाप पूर्ण इछा माझी ॥ ३२ ॥ सर्वत्र भजन कराया लागले । ईस उचलीले तये वेळीं ॥ ३३ ॥ तेव्हां त्या सुळाचें उदकची जालें । पांडुरंगें केलें नवल ऐसें ॥ ३४ ॥ हाकीमासहीत लोटांगणा येती । ह्मणती धन्य भक्ती आहे ईची ॥ ३५ ॥ तुळसींच्या माळा घालीती गळ्यांत । मिरवत आणीत घरीं तेव्हां ॥ ३६ ॥ नामदेवचरणीं ठेविला मस्तक । ह्मणती हें कौतुक केलें देवें ॥ ३७ ॥ यशवंतसुत संतलीला गात । धरोनीया हेत मनामाजी ॥ ३८ ॥

---

# ॥ रामभट पोळे ॥

॥ श्रीराम ॥ रामभट पोळे होते पैठणांत । मोठे रामभक्त निःसीमची ॥ १ ॥ कोदंडरामाची मूर्ती सर्वकाळ । असावी जवळ जीवा ऐसी ॥ २ ॥ आपुल्यासारिखे मूर्तीस उपचार । ज्याचे निरंतर होत होते ॥ ३ ॥ सर्व तीर्थ व्रत रामावीण नाहीं । अहिर्नीसीं पाहीं निजध्यास ॥ ४ ॥ परोपकारासी शरीर लावीलें । श्रीरामा लक्षीले सर्वा भूतीं ॥ ५ ॥ कोणाचेंही काम अडोंच नेदावें । निष्काम करावें मनोभावें ॥ ६ ॥ उंचनीच काम न करावें ऐसें । मनांतची नसे जयाचीये ॥ ७ ॥ वाचें नाम सदां सत्यची बोलावें । कायेनें करावें सुखी सर्वा ॥ ८ ॥ कोणी दुष्ट वाक्य कठीण बोलती । त्याच्या पाया पडती ऐसी स्थिती ॥ ॥ ९ ॥ सदां समाधान हें मुख्य साधन । समाधी हे जाण सहाजांत ॥ १० ॥ तपें शांतीअंत सुखें संतोषांत । व्याधी ह्या तृष्णेंत जाणाव्या हो ॥ ११ ॥ सर्वभूतीं दया तोचि धर्म जाण । रामभटा पूर्ण चिन्हें ऐसीं ॥ १२ ॥ येकेदिसीं पंतोजीच्या शाळेअंत । पोरांसी ह्मणत पानें आणा ॥ १३ ॥ मोठीं मोठीं पानें आणावी वडाची । ह्मणिजे खेळायाचि सुटी तुह्मा ॥ १४ ॥ हर्ष जाला मुलां तेथोनी चालीली । मार्गांत जों आली ऐसीयांत ॥ १५ ॥ रामभटबावा भेटले तयांसी । चलावें पानासी ह्मणती यांला ॥ १६ ॥ बरे ह्मणोनीया त्यांच्या संगें गेले । वडापासी आले मुलांसहित ॥ १७ ॥ ह्मणती मुलें आतां बावा वर चढा । मोठीं मोठीं तोडा पानें पाहूं ॥ १८ ॥ बांधीली कमर त्यांत राममूर्ती । कास घालुनी जाती वृक्षावर ॥ १९ ॥ खालून हीं मुलें दाखवितीं पानें । अवघड ठिकाण होतें तेथें ॥ २० ॥ वळकांबीचीं पानें वांकून तोडीतां । मूर्ती अवचिता पडे खालीं ॥ २१ ॥ पडिला राम ह्मणुन मुलें बोलताती । हे त्यांसी पुसती कैसा

पडे ॥ २२ ॥ खालीं डोई आणि पाय जाले वरी । ऐकोनी अंतरीं काये केलें ॥ २३ ॥ आपुल्या ऐसें रामा आर्जीवरी केलें । सेवटीं हे जाले रामराया ॥ २४ ॥ खालीं डोई वर पाय करोनीया । राम ह्मणोनीया । देह सोडी ॥ २५ ॥ काया वाचा प्राण होतां रामार्पण । धरिले उचलोन वरिच्यावरी ॥ २६ ॥ नखीं कामकोटी मुखीं चंद्रकोटी । पाहातां हे दृष्टी रूप ऐसें ॥ २७ ॥ मुकुटा उपमा न सुचेची आह्मा । वर्णाया श्रीराम श्रुती नेती ॥ २८ ॥ आलींगन दिलें मग रामरायें । मनोरथ पाहे पूर्ण केलें ॥ २९ ॥ ऐसे रामभक्त ऐसे जीवन्मुक्त । भीम त्यासी गात अनुदिनीं ॥ ३० ॥

---

# ॥ निपटनिरंजन ॥

---

**॥ श्रीराम ॥** निपटनिरंजन औरंगाबाजेंत । होते मोठे संत बागेमध्यें ॥ १ ॥ गांवामध्यें जावें रस्त्यांत फिरावें । कोणी देतां घ्यावें धान्य पीठ ॥ २ ॥ येके दिसीं मेख नालाची पायांत । शिरे अकस्मात तये वेळीं ॥ ३ ॥ विदेहस्थिती देहभान नाहीं । समाधीस्त पाही चालीयले ॥ ४ ॥ माळीण पाहोनी ह्मणे पायाअंत । गेलें तें त्वरीत काढा आधीं ॥ ५ ॥ देहावरी आले आणि बोलीयेले । प्रारब्धीं टाकीलें ह्मणती देहे ॥ ६ ॥ जयाचे सत्तेनें पायाअंत गेलें । तोच हें काढील तरी काढो ॥ ७ ॥ ऐसें बोलोनीया आले बागेअंत । होतां समाधीस्त देव आले ॥ ८ ॥ पायांतील मेख उपडोनी काढीली । रक्तधार आली तये वेळीं ॥ ९ ॥ हस्तमात्रें पाय बरा करुनी गेले । ऐसे संतलीले भीम गाये ॥ १० ॥

॥श्रीराम॥ निपटनिरंजन जीवन्मुक्त ज्ञानी । दिलेश्वरा कोणी निवेदीलें ॥ १ ॥ त्यांनीं स्वार यांसी आणाया धाडीले । बागेमध्यें आले यांजपासी ॥ २ ॥ गुंफेंत श्रीकण्या मृन्मय पात्रांत । होते हे भक्षीत तये वेळे ॥ ३ ॥ राउताची हाक ऐकतां तैसेचि । येती बाहेरची खात खात ॥ ४ ॥ दाढी पोटावरी वोघळ पाहीले । कुश्चीळ दावीलें रूप त्यासी ॥ ५ ॥ अभक्तां संतांचें माहात्म न कळे । थु ऐसें बोलीले तोंडावरी ॥ ६ ॥ सिद्ध बोलीयले तुमच्या तोंडांत थु । यो आमुच्या मुखातु नको तुह्मां[1] ॥ ७ ॥ ऐसें बोलतांची राउताच्या मुखीं । जलांश निशेखीं नाहीं होये ॥ ८ ॥ जिव्हाच ते कोरडी जाहाली ते काळीं । शरण तये वेळीं येती यांसी ॥ ९ ॥ दया आली मग मोकळे ही केले । पाईं ते लागले तये वेळीं ॥ १० ॥ मग सिद्ध गेले आपुले झोपडींत । स्वार होउनी स्वस्थ रहाते जाले ॥ ११ ॥ अस्तमानीं राहे प्रहर दिवस । गेले हे दिलीस योगसिद्धी ॥ १२ ॥ मशीदींत मध्य कोनाड्यांत गेले । जावोनी बैसले तये वेळीं ॥ १३ ॥ पाछाह कुराण पढावया आला । अकस्मात याला पाहाताहे ॥ १४ ॥ विचारितां नाम निपट सांगती । बोलावीले प्रीति ह्मणुन आलों ॥ १५ ॥ पाछाहानें तेव्हां केला चमत्कार । सांडोनी कळीवर मक्के गेला ॥ १६ ॥ तेथें सात सिद्ध होते त्या नमन । बद्रीवृक्ष जाण होता तेथें ॥ १७ ॥ निपटही गेले त्या वृक्षीं देखील । बोरें खाती वर्हाले आनंदांत ॥ १८ ॥ पाछाह प्रसाद मागतांची ह्मणत । देऊं मशीदींत चाल आतां ॥ १९ ॥ गेला शरीरांत पाहे कोनाड्यांत । बैसले हे खात बोरें तेथ ॥ २० ॥ बोराचा प्रसाद देतां लोटांगण । घालोनीया ह्मणे ईश्वर हा ॥ २१ ॥ मग सुखगोष्टी तेथें बोलोनीया । पत्र घेवोनीया तया स्वारां ॥ २२ ॥ आले बागेअंत पत्र दिल्हे त्यांसी । गेले ते दिलीसी तये वेळीं ॥ २३ ॥ पाछा-

---

१ तुमच्या तोंडांतला थु तुह्मांस नको तो आमच्या तोंडांत येवो.

ह्मासी सर्व थुंक्याचा वृत्तांत । सांगतां सिद्धाते ह्मणे धन्य ॥ २४ ॥ ऐसी संतलीला गाती जे ऐकती । तेही धन्य होती भीम ह्मणे ॥ २५ ॥

॥ **श्रीराम** ॥ निपटनिरंजन औरंगाबाजेंत । आले रस्त्याअंत येके दीनीं ॥ १ ॥ ह्मणती सर्वां भक्ती लावावी ह्मणून । चतुर्भुज आणून मूर्ती येक ॥ २ ॥ देवालय केलें दर्शनासी यावे । बोलाविती भावें सर्वत्रांसी ॥ ३ ॥ हिंदुमात्र येती अविंध न येती । तेव्हां ह्मणती चित्तीं ऐसें नव्हे ॥ ४ ॥ मूर्ती बागेमध्यें नेवोनी ठेवीली । मशीदची केली तेथें मग ॥ ५ ॥ बोलाविता येती अविंध आनंदें । न येतीच भेदें हिंदु तेथें ॥ ६ ॥ सर्व येती ऐसा उपाय योजावा । भेदची नसावा ऐसें करूं ॥ ७ ॥ मोडोनी मशीद केला शौचेकूप । जाती आपेआप सर्व तेथें ॥ ८ ॥ गांवीचा पठाण हाकीम तयासी । कोप यावा ऐसी युक्त केली ॥ ९ ॥ मशीद मोडोनी केला शौचेकूप । बोलावीले बाप सिद्ध-राया ॥ १० ॥ ह्मणे कूप केला मशीद मोडोन । काय जी कारण सांगा याचें ॥ ११ ॥ देव केला तेथें न येती यवन । मशीदींत जाण हिंदु न ये ॥ १२ ॥ मग शौचेकूप केला तेथें येती । भेदातीत होती नर्कद्वारा ॥ १३ ॥ आह्मी काय यासी करावा उपाय । नर्क जाला प्रीय जनालागी ॥ १४ ॥ बहुतची बोध पठाणासी केला । तोही भक्त जाला संतवाक्यें ॥ १५ ॥ मग बागेअंत भजन करीत । येवोनी बैसत भीम ह्मणे ॥ १६ ॥

---

## मच्छेंद्रनाथ

॥ **श्रीराम** ॥ मचींद्र गोरक्ष होते गुरुशिष्य । सामर्थ्ये विशेष योग मोठा ॥ १ ॥ गोरक्ष गांवांत भिक्षा मागोनीया । द्यावी गुरुवर्या

मर्यादेनें ॥ २ ॥ गुरु देतील तो प्रसाद सेवावा । गुरुसेवा जीवाहूनी प्रीय ॥ ३ ॥ येके दिसीं गेले भिक्षेसी गांवांत । प्रयोजन तेथें हेही आले ॥ ४ ॥ दानपात्रें यांसी वाढोनीया देती । गुरुपासी येती घेवोनीया ॥ ५ ॥ मच्छिंद्रनाथांनीं स्वइच्छा भोजन । केलें आनंदानें गुरुरायें ॥ ६ ॥ दहीवडे त्यांत मिष्ट जाले होते । स्वामी तेची खात आवडीनें ॥ ७ ॥ दुसरे दिवसीं गोरक्षानीं स्नान । करोनी नमन पुढें उभे ॥ ८ ॥ ह्मणती गुरुराया भिक्षे आज्ञा द्यावी । वेळ हे बरवी जाली आहे ॥ ९ ॥ ह्मणती गुरुराव दहीवडे आणी । दुजे कांहीं नाणीं भीक्षा आजी ॥ १० ॥ आज्ञा ह्मणोनीया गांवामाजी गेले । भिक्षेसी लागले मागावया ॥ ११ ॥ घरोघरीं ह्मणती दहीवडे घाला । इछा सद्गुरुला जाली आहे ॥ १२ ॥ धिःकार करोनी कोणी न घालिती । तेव्हां हे बोलती येका घरीं ॥ १३ ॥ दहीवडे जरी करोनीया द्याल । तरी जें मागाल तेंचि देऊं ॥ १४ ॥ बाई येक तीनें ऐकोनीया ह्मणे । देसी तरी देणें सव्य नेत्र ॥ १५ ॥ ऐकोनीया ह्मणती नेत्र जाला धन्य । गुरुसी अर्पण करूं आतां ॥ १६ ॥ तन मन धन गुरुसी अर्पण । त्यांचें त्यांसी देणे या वेळेसी ॥ १७ ॥ नखें रोवोनीया बुबुळ काढीलें । डोळ्यासी फोडीलें गुरुसाठीं ॥ १८ ॥ बाई घाबीरीच होवोनीया बोले । द्वाड मी बोलीलें संतराया ॥ १९ ॥ तोंड ह्मणे द्वाड करोनीया वडे । आणोनीया पुढें ठेवीयले ॥ २० ॥ दहीवडे वेती स्वामीपासीं येती । नेत्रासी लावीती हात येक ॥ २१ ॥ मचींद्रनाथांनीं पुसीयलें यांला । हात कां लावीला नेत्रा सांग ॥ २२ ॥ गोरक्ष बोलीले स्वामी डोळा आला । ह्मणोनी लावीला हात तेथें ॥ २३ ॥ गुरु बोलीयले जरी डोळा आला । आला तरी आला हात काढीं ॥ २४ ॥ काढितांची हात दिव्य नेत्र जाला । सद्गुरूनीं केला नवलाव ॥ २५ ॥ वर्तमान मग निवदीले सारें । आलिंगन येरें दिलें शिष्या ॥ २६ ॥ धन्य गुरुभक्त निष्ठा ज्याची ऐसी । देव तयापासी भीम ह्मणे ॥ २७ ॥

॥ **श्रीराम** ॥ मचिंद्रनाथांनीं गोरक्षासी आज्ञा । केली क्षीर आणा बोटव्याची ॥ १ ॥ भिक्षेलागीं आजी क्षीरची मागावी । आनंद-ला जीवीं शिष्यराव ॥ २ ॥ जावोनी भिक्षेसी क्षीर मागताती । कोणी न घालिती तये वेळीं ॥ ३ ॥ ह्मणती जरी कोणी क्षीर घाल आह्मा । तरी आह्मी तुह्मा देऊं येक ॥ ४ ॥ आमुच्या स्वामींनीं जे दिलें आह्मा-सी । तें आह्मी तुह्मासी देऊं तरी ॥ ५ ॥ येका लेंकरानें सांगोनी मातेसी । दीधले क्षीरीसी तये वेळीं ॥ ६ ॥ मुलासी घेवोनी स्वामीपासी येती । वृत्तांत सांगती गुरुराया ॥ ७ ॥ भक्षोनीया क्षीर समाधानें बाळा । जवळी बोलावीला तये वेळे ॥ ८ ॥ तयाचे कुसीसी लावोनीया बोट । केला ब्रह्मनिष्ठ सिद्धराव ॥ ९ ॥ नाम गैनीनाथ ठेवीलें तयाचें । निवृत्तीही त्याचे शिष्य पुढें ॥ १० ॥ ऐसीया संतांचें नाम घेतां वाचे । ज्ञान होय साचे भीम ह्मणे ॥ ११ ॥

॥ **श्रीराम** ॥ शउ शमन हे पितापुत्र होते । संतसेवे हेत दृढ ज्यांचा ॥ १ ॥ वित्त कांहीं होतें तें गेलें सरोनी । कर्जही काढोनी धर्म केला ॥ २ ॥ फिटे जरी कर्ज धर्म हा आमुचा । नाहीं तरी त्यांचा कां होईना ॥ ३ ॥ कर्जही काढोनी जरी धर्म केला । न फिटतां त्याला दोष नाहीं ॥ ४ ॥ ज्याचें घेती त्यासी फिरोनी न देती । घरींही वि-पत्ती बहु जाली ॥ ५ ॥ सत्वधीर मोठे परी कोणी यांसी । उसणेंही त्यांसी न दे कोणी ॥ ६ ॥ ऐशा समयांत गुरुराज आले । प्रेमें पुढें गेले उभयतां ॥ ७ ॥ मचिंद्र गोरक्ष आणीखीही शिष्य । यांनी त्या सर्वास नमन केलें ॥ ८ ॥ आलिंगनें जाली आदरें घरासी । आणीले गुरूसी प्रेमानंदें ॥ ९ ॥ उपवासी होते भोजनासी कांहीं । घरामध्यें नाहीं कांहीं जेव्हां ॥ १० ॥ रात्र प्रहर जाली चोरीसी करावें । भोज-नासी द्यावे संतराया ॥ ११ ॥ ऐसा करोनीया विचार निघाले । वाणी-याच्या आले घरापासीं ॥ १२ ॥ ॥ माडीवरी जाती गवाक्ष पाहाती । बाप बोले प्रीति पुत्रालागी ॥ १३ ॥ गवाक्षातुनीयां अंत मीच जातो ।

सामुग्रीसी देतों वर घे तूं ॥ १४ ॥ सांपडलों तरी आहेच मी वृद्ध । नाहीं कांहीं खेद मज याचा ॥ १५ ॥ पुत्र बोलीयला जाईन मी अंत । देईन समस्त सामुग्रीसी ॥ १६ ॥ ऐसें बोलेनीया घालोनीया कांस । मनांत उल्हास सद्गुरूचा ॥ १७ ॥ सोप्यांतुनी मग अंत उतरत । सामुग्रीसी देत बापा हातीं ॥ १८ ॥ सर्वही साहीत्य देवोनीया वर । जात क्षणी त्वरें आला अंत ॥ १९ ॥ धरीयले पाय बाप बोढी वरी । न बोढे निर्धारी ऐसें जालें ॥ २० ॥ बापा ह्मणे आतां उपाय राहीला । तोडी मस्तकाला त्वरा करी ॥ २१ ॥ खेद न करावा स्वामी घरां आले । शरीराचें जालें सार्थक या ॥ २२ ॥ गुरुकार्यावरी वेंचलीयां काया । कोठें आहे माया ब्रह्म जालों ॥ २३ ॥ परी येक हेत आहे श्रीगुरूसी । पूजा भोजनासी करा सांग ॥ २४ ॥ माझें वर्तमान कांहीं न बोलावे । संतोषें करावें दास्य त्यांचें ॥ २५ ॥ त्वरा करी ह्मणतां मस्तक कापीला । घेवोनीया गेला बाप घरा ॥ २६ ॥ येकीकडे शीर ठेवोनी कोणासी । न सांगे मानसीं हर्ष दावी ॥ २७ ॥ यथासांग पाक करोनीया पात्रें । वाढीलीं विचित्रें भावयुक्त ॥ २८ ॥ गुरु बोलीयले शमन न दिसे । कोठें गेला असे या वेळेस ॥ २९ ॥ ह्मणे गुरुराया वाण्याच्या घरांत । गुंतवीला तेथ वाणीयानें ॥ ३० ॥ तुह्मीही त्रिवर्गे पत्नीसुनेसहीत । बैसावे त्वरीत येवोनीया ॥ ३१ ॥ बोलीला प्रसाद घेऊं मागूनिया । आग्रहोंचि तया बैसवीले ॥ ३२ ॥ तिघेही पंगती बैसोनी जेविती । उभडची येती पोटीं मोठे ॥३३ ॥ भोजन तांबूल जाले निद्रा केली । भार तेव्हां घाली सद्गुरूसी ॥ ३४ ॥ इकडे वाणीयाच्या घरांत शरीर । पडतां सत्वर लोक आले ॥ ३५ ॥ हाकीमा सांगता सुळावरी देती । ऐसी जाली ख्याती पुढें ऐका ॥ ३६ ॥ प्रभात जालीया सिद्ध चालीयले । शऊही चालीले घालवीत ॥ ३७ ॥ सुळावरुनी वाट होती तेथें आले । नाथांनीं पाहीलें धडाकडे ॥ ३८ ॥ निर्जीव शरीर हस्त केले वर । नमन साचार गुरुराया ॥ ३९ ॥ अश्चीर्ये जाहाले जवळी येवोन । शऊ सांग कोण आहे

रे हा ॥ ४० ॥ ह्मणे हा शमन दास तुमचाची । ऐसी निष्ठा याची असंभाव्य ॥ ४१ ॥ मग वर्तमान सर्व निवेदीलें । मस्तक आणवीलें तेच क्षणीं ॥ ४२ ॥ सुळावरुनी धड काढोनी मस्तक । लावीयले देख गुरुरायें ॥ ४३ ॥ निर्जीव सजीव जाला पूर्ववत । घाली दंडवत नाथपाई ॥ ४४ ॥ गुरुच्या नेत्रासी आल्या अश्रुधारा । ह्मणती धन्य खरा भाव तुझा ॥ ४५ ॥ प्रेमें आलिंगन देती गुरुरायें । कृपा केली पाहे तयावरी ॥ ४६ ॥ जीवन्मुक्त दशा कृपा होतां आली । सद्गुरु माउली अनाथाची ॥ ४७ ॥ हाकीमासी कळतां तोही आला तेथें । सत्कार करीत बहुसाल ॥ ४८ ॥ वाद्यें लावोनीया नेले मिरवत । सोहळा बहुत जाला तेथें ॥ ४९ ॥ ऐसे संतराव ऐसे दयावंत । ऐसे गुरुभक्त भीम गाये ॥ ५० ॥

---

# परिसाभागवत

॥ श्रीराम ॥ परसाभागवत रखुमाईचा भक्त । नित्य गात ध्यात आईसची ॥ १ ॥ साक्षात्कार मोठा बोलावे देवीनें । जाला अभीमान तयालागीं ॥ २ ॥ आईनें परीस दिधला तयासी । मग संपत्तीसी पार नाहीं ॥ ३ ॥ नामदेव विठोबाचे भक्तराज । दरिद्र सहज त्यांचें घरीं ॥ ४ ॥ नित्य यांनीं भिक्षा मागोनी आणावी । तेव्हां पेटवावी चूल मग ॥ ५ ॥ नामदेवकांता मोठी पतिव्रता । नाम हें तत्वता राजूबाई ॥ ६ ॥ परसाभागवत तयाच्या गृहासी । आली अनयासी येके दिनीं ॥ ७ ॥ भक्तकांता दोघी मित्रत्वही होते । ह्मणुनी परीसाते दिल्हे तीनें ॥ ८ ॥ सुवर्ण करोनी त्वरें आणोनी दे । घेवोनी आनंदें घरां गेली ॥ ९ ॥ सुया दोन चारी लावोनी तयासी । आणोनी सिध्या-

सी पाक केला ॥ १० ॥ नामदेव भिक्षा मागोनीया येती । स्वैंपाक पाहाती सिद्ध जाला ॥ ११ ॥ भोजनें जालीया पुसीले कांतेला । कोणी सिधा दिला सांग वेगीं ॥ १२ ॥ ह्मणे भागवत तयाचे कांतेस । मागोनी परीस आणीयेला ॥ १३ ॥ पाहूं ह्मणतां हातीं आणोनी दिधला । गंगानीं झुगारीला भीमेअंत ॥ १४ ॥ परसाभागवता कळतां वर्तमान । नामदेवा ह्मणे परीस द्यावा ॥ १५ ॥ नामदेव ह्मणती कासया परीस । घेवोनी सिद्धीस नाडलासी ॥ १६ ॥ देवापासीं कांहीं न मागावें कधीं । दिली जरी सिद्धि घेऊं नये ॥ १७ ॥ इछेसी सोडोनी भजन पूजन । विभक्ती सांडोन भक्त व्हावे ॥ १८ ॥ तरीच देवराव आपुलासा होये । इछा करितां जाये नारायण ॥ १९ ॥ परिसाभागवता कोप आला मोठा । ह्मणे ठेवा चेष्टा येकीकडे ॥ २० ॥ आपण दरिद्री भाग्य न देखवे । आहे आह्मा सर्व ठाऊक हें ॥ २१ ॥ ऐसें ब्रह्मज्ञान आह्मा आहे ठावें । परिसासी द्यावें त्वरा करा ॥ २२ ॥ न देतांची तुज मज मृत्य आला । निश्चयची केला जेव्हां यानें ॥ २३ ॥ नामदेव चंद्रभागेंत जावोनी । वोंझळ भरोनी आणिले खडे ॥ २४ ॥ सर्वही परीस लोहासी लावीले । सुवर्ण जाहालें सर्वांनींही ॥ २५ ॥ मग नामदेवा घाली लोटांगण । अंगेंची तूं जाण परीस बा ॥ २६ ॥ लोटांगण घाली ह्मणे तूंची देव । आह्मी आहो जीव अभिमानी ॥ २७ ॥ सर्व अभिमान सोडोनी दिधला । नामदेवें केला बोधें पार ॥ २८ ॥ परसाभागवत खरा भक्त जाला । संतें संत केला भीम ह्मणे ॥ २० ॥



# सांवतामाळी

॥ श्रीराम ॥ सांवत्यामाळ्याची भक्ती देवरावें । मळ्यांत खुरपावें येवोनीया ॥ १ ॥ नामदेव येके दिसीं विठोबासी । देतां विडीयासी ऐसें जालें ॥ २ ॥ सांवता सेतांत खातां भाकरीला । टुकडा झुगारीला देवाकडे ॥ ३ ॥ आला तो विड्यांत चावितातीं देव । पाहाती नामदेव आश्चिर्यानें ॥ ४ ॥ देव बोलीयले सांवत्याची भक्ती । मज आहे प्रीति बहु त्याची ॥ ५ ॥ नामदेवा येके दिसीं पांडुरंग । बोलीयले अंगें दडतो मी ॥ ६ ॥ ह्मणोनी चालीले पुढें अकस्मात । मागें मागें येत नामदेव ॥ ७ ॥ सांवत्यामाळ्यासी पांडुरंग ह्मणती । दडवी निश्चीतीं मज पोटीं ॥ ८ ॥ विळ्यानें तात्काळ पोट फाडीयेलें । जावोनी बैसले देव त्यांत ॥ ९ ॥ पिवळा पितांबर तयाचा पदर । किंचीत बाहेर राखीलासे ॥ १० ॥ आले नामदेव पुसताती यासी । देवा देखीलेसी तरी सांग ॥ ११ ॥ सांवता बोलीला देव नाहीं ऐसा । ठाव कोठें कैसा दिसे तुज ॥ १२ ॥ पाहातां पितांबर धरिती हातानें । आले पोटांतून बाहेरची ॥ १३ ॥ नामदेव संता देती आलिंगन । ह्मणती भक्ती धन्य पाहीली हे ॥ १४ ॥ फाडोनीया पोटीं देव सांठवीला । ऐसा भक्त जाला निश्चयाचा ॥ १५ ॥ यशवंतसुत हेचि लीला गात । पोटांत आनंत ठेवोनीया ॥ १६ ॥

---

# गोराकुंभार

॥ श्रीराम ॥ तेरेमध्यें गोराकुंभार जाहाला । देवाजीसी केला निश्चयेंची ॥ १ ॥ मळीतां चिखल देहभान गेलें । बाळ तुडवीलें शुद्धि नाहीं ॥ २ ॥ कातां आली यांसी सावध करोनी । शिव्या दे वचनीं देवाजीसी ॥ ३ ॥ क्रोध आला यांसी मार देतां ह्मणे । विठोबाची आण घालीताहे ॥ ४ ॥ वर्ज केलें तीसी तेव्हां दुजे लग्न । तेथें घाली आण सासू जेव्हां ॥ ५ ॥ दोघी स्त्रिया वर्ज करोनी बाहेरी । निजे वोटीवरी येकटाची ॥ ६ ॥ येके दिसीं कांता येवोनी बाहेरी । निजोनी शेजारी काय केलें ॥ ७ ॥ सव्य हस्त कुच्यावरी ठेवीताहे । जागा जाला पाहे अन्याय हा ॥ ८ ॥ तोडोनी मनगट टाकीलें जेधवां । हाहाकार तेव्हां केला त्यानीं ॥ ९ ॥ नामदेव आले बोलती गोऱ्यासी । अंगीकार स्त्रीसी करी आतां ॥ १० ॥ आण तुझी आह्माकडे आली सत्य । गोरा ह्मणे हात ईल तेव्हां ॥ ११ ॥ कीर्तनांत टाळी वाजवितां हस्त । आला अकस्मात पूर्ववत ॥ १२ ॥ बाळ देवाल्यांत पाहीलें खेळतां । आनंद चित्तांत न समाये ॥ १३ ॥ उठवीलें मूल आणि दिला हात । नामदेव संत धन्य ह्मणे ॥ १४ ॥ स्त्रियांचाही केला अंगीकार मग । भक्ती हे अभंग भीम गाये ॥ १५ ॥

# जसवंत संत

॥ श्रीराम ॥ जसवंत संत मोठे रामभक्त । दारिद्रानें व्याप्त केलें जेव्हां ॥ १ ॥ पाछाहासी प्रीति होती शिपायाची । ह्मणोनी कार्याची

योजना हे ॥ २ ॥ वडिलार्जित परज होता तयाअंत । घालोनीयां त्यांत कांबीटची ॥ ३ ॥ म्यान घालोनीयां चौघा शिपायांत । चाकरी राहात पोटासाठीं ॥ ४ ॥ द्रव्य ईल त्याचा धर्मची करावा । लोभ न धरावा तीळप्राये ॥ ५ ॥ येके दिसीं सारे शिपाई बैसोनी । हत्यारें काढोनी पाहातात ॥ ६ ॥ सर्वांचीं हत्यारें काढोनी पाहाती । हे न दाखवीती काढोनीया ॥ ७ ॥ बहुत आग्रह केला परी यानें । न दाखवी जाण तयालागी ॥ ८ ॥ येके दिसीं गेले होते हे बाहेरी । मागें यांच्या सारी काये केलें ॥ ९ ॥ काढोनी पाहाती तंव तें कांबीट । पाछाहासी स्पष्ट सांगताती ॥ १० ॥ आह्मा बरोबरी घेतो मुशाऱ्यासी । हत्यार हें त्यासी नाहीं जाणा ॥ ११ ॥ कांबीट घालोनी केली तलवार । काढोनी सत्वर पाहा वेगीं ॥ १२ ॥ पाछाहानें धीर धरोनीया ह्मणे । हत्यार पाहाणें समयावरी ॥ १३ ॥ उंसामध्यें वाघ मोठा ढाण्या आला । सांगती रायाला जावोनीया ॥ १४ ॥ लोक समागमें घेवोनी निघाले । व्याघ्रा धुडावीले तये वेळीं ॥ १५ ॥ जाळींमध्यें मग जावोनी बैसला । लोकाचा राहीला थाट उभा ॥ १६ ॥ पाछाहानीं आज्ञा केली जसवंता । पुढें व्हावें आतां या वेळेसी ॥ १७ ॥ उपसा हत्यार मारा वेगीं व्याघ्र । न बोले उत्तर पुढें जाला ॥ १८ ॥ मनीं रामराया आठवोनी ह्मणे । संकट हें कोणें निवारावें ॥ १९ ॥ पतीतपावन ब्रीद आहे तुझें । तरी करी माझें साहे आतां ॥ २० ॥ तुमचें धनुष्य होतें ज्या काष्ठाचें । तयाचे जातीचें हत्यार हें ॥ २१ ॥ तुह्मी गोकुळांत वेणु केला ज्याचा । तुह्मा असो त्याचा अभिमान ॥ २२ ॥ हातीं होती काठी गाई मागें ज्याची । तयाचीच जाती आहे देवा ॥ २३ ॥ पुण्यही पदरीं नाहीं देवा माझें । नाम मात्र तुझें घेतों देवा ॥ २४ ॥ नयन निडारले कंठ सद्गदीत । रामचिंतनांत मग्न सदां ॥ २५ ॥ ह्मणे मागें फिरों तरी अपकीर्ति । मरण व्याघ्राहातीं हेंचि बरें ॥ २६ ॥ व्याघ्रा ह्मणे यावें झांको-

---

१ तल्वारीची मूठ.

नीया नेत्र । श्रीरामें विचित्र केलें तेथें ॥ २७ ॥ उपसीतां कांबीट दिव्य असीलता । व्याघ्र केला येतां दुखंडची ॥ २८ ॥ पाछाह पाहोनी खालीं उतरले । आलिंगन दिलें भक्तराया ॥ २९ ॥ ज्या ज्यानीं रायासी होतें सांगीतलें । तयांसी भासलें मृत्यु आला ॥ ३० ॥ राजाचीये मनीं आला क्रोध यांचा । वध करूं यांचा ह्मणे येथें ॥ ३१ ॥ परी या भक्ताचें आधीं समाधान । करूं मग पूर्ण शिक्षा त्यांसी ॥ ३२ ॥ जसवंता ह्मणे राव माग कांहीं । सांगसी तें देईन मी तुज ॥ ३३ ॥ जसवंत ह्मणे जितुक्यांनीं कांबीट । सांगीतलें स्पष्ट होतें तुह्मा ॥ ३४ ॥ तयावरी दया पहिल्याहुनी व्हावी । इतुकें माझें जीवीं आहे द्यावें ॥ ३५ ॥ असत्य भाषण नाहीं त्यांनीं केलें । कांबीट पहीलें होतें जाणा ॥ ३६ ॥ नवल रामरायें केलें हें अद्भुत । सन्मानेंची येत गृहीं तेव्हां ॥ ३७ ॥ चाकरी सोडोनी रामभजनांत । आसावें निवांत शांती मोठी ॥ ३८ ॥ येके दिसीं मध्यरात्रीं तृषाक्रांत । सुने पाचारीत अटाहास्यें ॥ ३९ ॥ आवडीनें नाम पुत्राचें श्रीराम । ठेवीयलें प्रेमें भक्ती मोठी ॥ ४० ॥ सुनेचेंही नाम जानकी तयेसी । तृषाक्रांत तीसी पाचारीती ॥ ४१ ॥ आदिमाया आली उदक घेवोनी । तयासी पाजोनी गेली पाहा ॥ ४२ ॥ येके दिसीं रायें बुडवी यमुनेंत । तेथें सीताकांत रक्षी जाणा ॥ ४३ ॥ ऐसे रामभक्त राम रक्षी ज्यांसी । भीम गाय त्यासी अहर्निसीं ॥ ४४ ॥

---

## कृष्णाजीपंत

॥ श्रीराम ॥ कृष्णाजीपंत हे संत रामभक्त । सर्वा भूतीं पाहात रामराव ॥ १ ॥ शांतीचा पुतळा ऐसा दुजा नाहीं । सर्वकाळ पाही समाधिस्त ॥ २ ॥ येका ब्राह्मणासी दोन सहस्राचें । ब्रह्मस्वें तयाचें मन

खिन्न ॥ ३ ॥ बहुत विद्वान न फिटेची कर्ज । तों तो आला सहज यांचें गांवीं ॥ ४ ॥ गांवकरीयांसी भेटोनी वृत्तांत । सांगे मी कर्जात बुडतो आतां ॥ ५ ॥ ग्रामस्त बोलती कृष्णाजीपंतासी । क्रोध जरी आणीसी तरी ऐक ॥ ६ ॥ पट्टी सर्वांवरी करोनीया तुझें । वारूं आह्मी सहज कर्ज तुझें ॥ ७ ॥ कागद तयासी लेहोनीया देती । पाहों बरें ह्मणती पराक्रम ॥ ८ ॥ मग विप्र गेला तयांच्या वाड्यांत । न काढी पायांत जोडा असे ॥ ९ ॥ देवार्चनाअंत गेला धटपणें । शिवत जावोन संतराया ॥ १० ॥ बरी केली शिक्षा ह्मणोनी नमन । बोलीले ब्राह्मण राम माझा ॥ ११ ॥ विस्मित जाहाला विप्र मनाअंत । ह्मणे क्रोध येत कैसा यासी ॥ १२ ॥ येके दिसीं होतें सहस्रभोजन । स्वैंपाकही पूर्ण सिद्ध जाले ॥ १३ ॥ पाकशाळेमध्यें जावोनी अन्नासी । करी तो स्पर्शी-सी अकस्मात ॥ १४ ॥ कृष्णाजीपंतासी जावोनी सांगती । ह्मणती गरीबासी द्यावें अन्न ॥ १५ ॥ दुजा पाक करुनी केलें प्रयोजन । तीळ-प्राय जाण क्रोध न ये ॥ १६ ॥ येके दिसीं शुभ्र पोषाक करोनी । ब्राह्मण पाहोनी काये केलें ॥ १७ ॥ विड्यासाजी बरा तंबाखु खावोनी । थुंकी-ला येवोनी अंगावरी ॥ १८ ॥ संतरायें केलें नमन विप्रासी । ह्मणती शुद्ध यासी केले तुह्मी ॥ १९ ॥ न ये क्रोध विप्रा जालें संकट । ह्मणे दोन कष्ट जाले मज ॥ २० ॥ संताचें छळण कर्जही न फीटे । मोठें हें संकट जालें मज ॥ २१ ॥ आतां येक वेळ मोठा अपराध । करूं ह्मणून सिद्ध जाला असे ॥ २२ ॥ भोजनाचे वेळे आला सोवळाची । छळणा संताची मनीं असे ॥ २३ ॥ मुख्य पाटावरी यांचीया बैसला । संतोषेंचि त्याला बैसों दीले ॥ २४ ॥ कृष्णाजीपंतही सन्निध बैसले । वाढणेंही जालें सर्व जेव्हां ॥ २५ ॥ तूप वाढावया यजमानपत्नी । रूप-वंत गुणी पतिव्रता ॥ २६ ॥ वय पूर्व तूप वाढीत वाकोनी । ब्राह्मण उठोनी काय केलें ॥ २७ ॥ उडोनीया तीच्या पाठीवरी बैसे । ते पडे मुर्मांस तये वेळीं ॥ २८ ॥ पतीमुखाकडे जों पाहे सुंदरी । विप्र पाटा-

वरी बैसे मग ॥ २९ ॥ बोलीले कांतेसी ब्राह्मणाची लाथ । सोसी भगवंत उरावरी ॥ ३० ॥ आह्मी त्याचे दास भूषण हें आह्मा । ऊठ विप्रोत्तमा तूप वाढीं ॥ ३१ ॥ पतिव्रता वाढी तूप संतोषांत । भोजनेंही होत तये वेळीं ॥ ३२ ॥ तांबुल भक्षितां विप्रा नेत्रीं धारा । चालील्या झरारा कंठ दाटे ॥ ३३ ॥ कागद दावोनी वर्तमान सांगे । बोलावीले मग सर्व यांनी ॥ ३४ ॥ ह्मणती क्रोध आह्मा आला ब्राह्मणासी । द्या तुह्मी द्रव्यासी पत्रान्वयें ॥ ३५ ॥ आह्मी तुमचें काये केले होतें सांगा । व्यर्थ छळणा कां गा करवीली ॥ ३६ ॥ आमुचे शांतीनें जालें तुह्मा दुःख । क्रोध आला सुख जालें तरी ॥ ३७ ॥ तितुकेंचि द्रव्य दंड द्यावा आतां । आणोनी तत्वता दिलें जाणा ॥ ३८ ॥ आपणही त्यांत घालीती सहस्र । वस्त्रें द्विजवर गौरवीला ॥ ३९ ॥ पांचा सहस्रांसी घरीं पोचवीला । ऐसी शांती ज्याला तोचि धन्य ॥ ४० ॥ यशवंतसुत गात संतलीला । शांतीचा जिव्हाळा यावयासी ॥ ४१ ॥

---

## (दुसरे) कृष्णाजीपंत

**॥ श्रीराम ॥** अष्टावाळ्यांत कृष्णातीरीं संत । वरीं सदा व्रत असे ज्याच्या ॥ १ ॥ तयाचेंही नाम कृष्णाजीपंतची । भूतदया ज्याची काय सांगूं ॥ २ ॥ येकेदिसीं गेले होते साताऱ्यासी । मार्गीं गर्धभासी देखीयले ॥ ३ ॥ न चाले ह्मणोनी पायांसी बांधीलें । लोणारी हे गेले पाडोनीया ॥ ४ ॥ उष्णकाळ मोठा धापा देत असे । पाहातांची यांस दया आली ॥ ५ ॥ सोडोनीया पाय नदीवरी नेलें । उदक पाजीलें तयालागी ॥ ६ ॥ छायेखालीं तृण होतें तेथें त्यासी । सोडोनी तयासी नमन केलें ॥ ७ ॥ ऐसी भूतदया जयाचीये मनीं । तेथें चक्रपाणी भीम ह्मणे ॥ ८ ॥

॥ श्रीराम ॥ कृष्णाजीपंत हे संत घरीं होते । अष्टावाळव्यांत काय जालें ॥१ ॥ रात्र एक प्रहर निद्रेचा समयें । प्रसंगींच तये ऐसें जालें ॥ २ ॥ तीन दिवसांचा उपासी अंतेज । तो आला सहज तया गांवीं ॥ ३ ॥ यातीमध्यें गेला तेथें कांहीं नाहीं । यांचें घर पाही सां-गती त्या ॥ ४ ॥ लघुशंकेसी हे अंगणांत आले । चाकरा बोलीले तये वेळीं ॥ ५ ॥ दरवाज्यासी लावी रात्र जाली आतां । गेला तो तत्वता लावावया ॥ ६ ॥ अंतेजानें हाक दिली ऐसीयांत । ह्मणे मी क्षुधिस्त आहे मोठा ॥ ७ ॥ तीन दिवस जाले न मिळेची अन्न । जाऊं पाहे प्राण मायबापा ॥ ८ ॥ सेवक बोलीला रात्र जाली फार । रागेजला थोर तयालागी ॥ ९ ॥ अंगणांत यांनीं ऐकोनी बोलीलें । घेई त्यासी वहीलें ह्मणती अंत ॥ १० ॥ मग सेवक तो अंत घे तयासी । कृष्णाजीपं-तासी दया मोठी ॥ ११ ॥ मग कांतेलागीं विचारिती पाहे । कांहीं अन्न आहे किंवा नाहीं ॥ १२॥ मग पतिव्रता ह्मणे नाहीं अन्न । सेवया क-रऊन देती त्यासी ॥ १३ ॥ तृप्त ग्रासोग्रासी जाला तो अत्यंत । तांबु-लही देत तयालागी ॥ १४ ॥ ऐसी सदयता जयाचें मानसीं । देव तयापासीं भीम ह्मणे ॥ १५ ॥

॥ श्रीराग ॥ कृष्णाजीपंतांनीं गयावर्जनासी । करोनी यात्रेसी आले घरा ॥ १ ॥ मग भागवतश्रवण यथासांग । केलें भक्तीरंगें संतरायें ॥ २ ॥ सप्तश्रृंगीं येक विप्र गळतकुष्ट । देवीपासीं श्रेष्ठ सेवा करी ॥ ३ ॥ माते माझा कुष्ट बरा करी येक । नाहींतरी देख मृत्य देई ॥ ४ ॥ निग्रह करिती देवी सांगे यासी अष्टावाळव्यासी जाये आतां ॥ ५ ॥ भक्तसंत तेथ कृष्णाजीपंतासी । पुण्यें घडलीं त्यासी चार त्यांत ॥ ६ ॥ येक पुण्य जरी देतील तरी हे । जाण वेथा जाय तेच क्षणीं ॥ ७ ॥ चार पुण्यें कोण ह्मणसी तरी ऐक । भागवत येक श्रवण केलें ॥ ८ ॥ दुजी माहायात्रा तिजे गर्धभासी । पाजीलें पाण्यासी कळवळोनी ॥ ९ ॥ चौथें अंत्येजासी भोजन दिधलें । ऐशा चहूंतील

येक माग ॥ १० ॥ ऐकोनीया विप्र निघाला तेथोनी । संतासी येवोनी नमन केलें ॥ ११ ॥ देवीचा वृत्तांत निवेदीला जेव्हां । आश्चर्यची तेव्हां जाले यांसी ॥ १२ ॥ पुरोहीत कांता बोलाऊनी पुसे । कोणत्या पुण्यास द्यावें सांगा ॥ १३ ॥ पतिव्रता ह्मणे गर्दभ अंत्येज । हें दोन्ही सहज घडलीं तुह्मा ॥ १४ ॥ द्रव्य आहे गयावर्जन होईल । श्रवण घडेल भागवत ॥ १५ ॥ पहिलीं भिन्न करून दोन या दोंहींत । चित्ता येईल ते येक द्यावें ॥ १६ ॥ मग भागवतश्रवणाचें पुण्य । भावयुक्त जाण दिलें तया ॥ १७ ॥ दिव्यदेही जाला कुष्ट सर्व गेला । ऐसी संतलीला भीम गाये ॥ १८ ॥

---

# अर्जुन

॥ श्रीराम ॥ द्वापारीचा संत सख्य भक्ती ज्याची । ऐसी दुजयाची नसे पाहा ॥ १ ॥ देवें थोरपण ज्यासाठीं सोडीलें । नीच काम केलें अर्जुनाचें ॥ २ ॥ भारत ग्रन्थांत आहे हा विस्तार । श्रवणें अपार पुण्य होय ॥ ३ ॥ तयांतील कथा अल्पमती परी । आवडी अंतरीं गावयाची ॥ ४ ॥ येक दोन कथा गातो हेत मनीं । आवडी कीर्तनीं भक्ताचीये ॥ ५ ॥ सुभद्रा माहेरीं होती द्वारकेंत । येके दिनीं तेथ हेही आले ॥ ६ ॥ देवानीं सन्मान केला प्राणापरी । मधुर उत्तरी बोलीयले ॥ ७ ॥ तुह्मी तीर्थयात्रे जातां ह्मणुनी तुह्मा । द्यावे कांहीं आह्मा ऐसें वाटे ॥८॥ आपुल्या हातांतील काढोनीया मुद्रा । दिधली सुभद्रापतीलागी ॥ ९ ॥ बोलीयले देव रत्नांकित मुद्रा । करावी जतन जीवाहूनी ॥ १० ॥ पुन्हा द्वारकेसी याल तंव ईसी । न द्यावी कोणासी भक्तराया ॥ ११ ॥ अर्जुन देवासी ह्मणे या मुद्रेसी । जडली शरीरासी

ऐसें जाणा ॥ १२ ॥ नमन करोनी गेले देवाजीसी । पाहाती तीर्थासी ठाई ठाई ॥ १३ ॥ शिवालय येक गांवाच्या बाहेरी । बाग पुष्पें बरी रम्य जागा ॥ १४ ॥ ऐसी रम्य जागा अर्जुनें पाहीली । सुभद्रा इछीली मनामाजी ॥ १५ ॥ ऐसी इछा होतां देवराव आले । सुभद्रा जाहाले आपणची ॥ १६ ॥ अळंकार दासदासी समागमे । पातली संभ्रमें देवाल्यांत ॥ १७ ॥ अर्जुनें पाहोनी पाचारी जवळी । आले वनमाळी आनंदानें ॥ १८ ॥ पलंग सुपोल्या पडदे सोडीयले । सेजे पहुडले नारायेण ॥ १९ ॥ अर्जुनाच्या गळां घालोनीयां मीठी । बोलीले आंगठी पाहूं द्यावी ॥ २० ॥ आपुलीच कांता ह्मणुन दिधली । हातामध्यें घाली नाटकी हा ॥ २१ ॥ अर्जुनाची निद्रा लागतांची गेला । सर्व संपत्तीला घेवोनीया ॥ २२ ॥ सावध होवोनी नाहीं कांहीं पाहे । ह्मणे स्वप्न काय पडिलें मज ॥ २३ ॥ मुद्रा पाहे हातीं तंव कांहीं नाहीं । पुसल्यावांचून ही गेली कैसी ॥ २४ ॥ विस्मय जाहाला द्वारकेसी आला । मनांत लाजला बहुसाल ॥ २५ ॥ कृष्णें करोनीया सुचना चिरंजीवा । प्रेम मोठें देवा अर्जुनाचें ॥ २६ ॥ ह्मणे मुल देवा मामा ऐसी मज । द्या मुदी आज करोनीया ॥ २७ ॥ सोनारा दावाया देव मागताती । अर्जुनाचें चित्तीं ऐसें आलें ॥ २८ ॥ उठोनी तात्काळ गेला गृहाअंत । सुभद्रे मागत मुदी देई ॥ २९ ॥ ते ह्मणे हो तुह्मी केव्हां मजपासी । दिली ते तुह्मासी देऊं आतां ॥ ३० ॥ ह्मणे शिवाल्यांत तूं आली होतीस । घेतले मुदीस हातांतील ॥ ३१ ॥ मज न पुसतां पळोनीया जावें । असें कां करावें लबाडीसी ॥ ३२ ॥ द्वारका सोडोनी कोठें गेले नाहीं । तुफान हें पाही न घ्यावे जी ॥ ३३ ॥ गलबलाची जाला तेथें देव आले । अर्जुना बोलीले तये वेळीं ॥ ३४ ॥ वृथा कां छळीसी न आलीच तीसी । पाहीले मुदीस देवाहातीं ॥ ३५ ॥ मग पायावरी ठेविला मस्तक । अश्रुपात देख चालीयले ॥ ३६ ॥ देवा कांता कैसा जालासी तूं माझी । प्रीति ऐसी तुझी दीनावरी ॥ ३७ ॥ मग आलिंगन

पार्था दिलें देवें । त्याचा नवलाव तोचि जाणे ॥ ३८ ॥ यशवंतसुत संत आणि भक्त । सांडोनीया द्वैत गाय सदां ॥ ३९ ॥

---

## जगमैत्रनागा

**॥ श्रीराम ॥** जगमैत्रनागा ऐका कथा त्याची । मैत्री ज्याची साची भूतमात्रीं ॥ १ ॥ येके दिसीं हाकीमानें नेले यांसी । ह्मणे देवकासी व्याघ्र आणा ॥ २ ॥ बरें ह्मणोनीया गेले अरण्यांत । व्याघ्रासी भेटत जावोनीया ॥ ३ ॥ मात्र ह्मणोनीया तया पंचानना । धरीताती जाणा शेळी ऐसा ॥ ४ ॥ गळ्यांत धोतर बांधोनी आणीतो । देखतांची भीति लोक सारे ॥ ५ ॥ हाकीमही भ्याला रुमालानें हात । बांधोनीया येत संतापुढें ॥ ६ ॥ धन्य संतराये निर्वैर भूतांसी । महिमा हे ऐसी नेणों आह्मी ॥ ७ ॥ व्याघ्रासी लावोनी द्यावे स्वामी आतां । सोडीला ऐकतां पंचानन ॥ ८ ॥ सत्कार करोनी गृहामाजी नेले । पूजनासी केलें संतजीच्या ॥ ९ ॥ छळक जे होते तेही भक्त केले । भजनासी लावीले देवाजीचे ॥ १० ॥ ऐसीया संतांची लीला हे अद्भुत । गातां होती संत भीम ह्मणे ॥ ११ ॥

---

## नरसी सरस्वती

**॥ श्रीराम ॥** नरसीसरस्वती सिद्ध जाले मोठे । ज्यांची होतां भेट दैन्य जाये ॥ १ ॥ येका विप्रा घरीं आले तो दरिद्री । घेवड्याचा

दारीं वेल होता ॥ २ ॥ खाणोनीया तोची वेल काढीतांना । मालाचाची जाणा हांडा अंत ॥ ३ ॥ देतांची विप्रासी आनंद जाहाला । घालीतो सिद्धाला दंडवत ॥ ४ ॥ ऐसीया अपार लीला केल्या सत्य । गुरुचरित्रांत ऐका भावें ॥ ५ ॥ संकळीत येक त्यांतील जाणा हे । संतालागी गाय भीम सदा ॥ ६ ॥

---

# परमानंदजोगा

॥ श्रीराम ॥ परमानंद जोगा संतशिरोमणी । गुरुभक्त जनीं ऐसा नाहीं ॥ १ ॥ नारायणस्वामी मोठे निष्ठावंत । शिष्यही बहुत होते ज्यासी ॥ २ ॥ प्रारब्ध देहाचें टाळायाचें ज्यास । सामर्थ्येंही असे आंगीं ज्यांचें ॥ ३ ॥ परी त्यासी मान देती जना ऐसा । बोलीयले शिष्या सर्वांलागी ॥ ४ ॥ आह्मी जातो काशी ह्मणोनी निघाले । क्षेत्रांतची आले शिष्यासहीत ॥ ५ ॥ षण्मासाचा भोग अतिसार जाला । येकेक निघाला शिष्य पाहा ॥ ६ ॥ परमानंद मात्र सद्गुरुसेवेसी । राहीला मानसीं हर्षयुक्त ॥ ७ ॥ मळाचींही वस्त्रें धुवोनी आणावी । चीळसही जीवीं न ये ज्याच्या ॥ ८ ॥ सर्व शिष्य गेले येकट राहीला । तत्पर सेवेला हर्षयुक्त ॥ ९ ॥ निजती तेथें वस्त्रें अंग भरताहे । हस्तें धूत आहे भक्तराज ॥ १० ॥ गांवामाजी भिक्षा मागोन आणावी । आज्ञेवरी ठेवी देह जाणा ॥ ११ ॥ चारी प्रहर रात्र निद्रा नाहीं ज्यासी । अंतर सेवेसी पडे ह्मणुनी ॥ १२ ॥ कायावाचामनें सेवेचाची हर्ष । ऐसा गुरुदास निरोपम ॥ १३ ॥ स्वर्गी यमधर्म विचारी दुतासी । सांगा आश्चीर्यासी पाहीलें जें ॥ १४ ॥ ह्मणती काशीमाजी गुरुभक्त येक । ऐसा दुजा देख नाहीं कोठें ॥ १५ ॥ आश्चीर्य मानोनी धर्मराज तेथें ।

पाहाया भक्तातें आले जाणा ॥ १६ ॥ भेटोनीया यासी ह्मणे कांहीं माग । यमधर्म आंगें आलों येथें ॥ १७ ॥ गुरुभक्त ह्मणे गुरुपासीं काय । सांग उणें आहे मागूं तूज ॥ १८ ॥ स्वामीपासी यावे दर्शनही घ्यावें । पवित्र स्वभावें होसील तूं ॥ १९ ॥ धर्म ह्मणे गुरुपासी नाहीं काम । तुझें मात्र प्रेम आहे आह्मा ॥ २० ॥ गुरुपासीं न या तरी जावे तुह्मी। जातो सेवे आह्मी त्वरा आहे ॥ २१ ॥ विश्वेश्वराचीया यम दर्शनासी । जावोनी वृत्तासी सांगे याच्या ॥ २२ ॥ तीनमासां यमधर्मे दिली भेटी । सेवा ज्याची मोठी ह्मणूनीया ॥ २३ ॥ पांच महिने सेवा अधिकाअधीक । होतां सांब देख भेट देती ॥ २४ ॥ मनकर्णीकेच्या घाटीं अस्तमानीं । सांबानीं येवोनी भेटी दिली ॥ २५ ॥ संवाद उभयांसी जाला बहुतची । ह्मणे हे सेवेची महीमा ऐसी ॥ २६ ॥ साडेपांच महिने येकनिष्ठ सेवा । केली ब्रह्मभावा धरोनीया ॥ २७ ॥ ब्रह्मांडनायेक आले भगवान । ह्मणती धन्य धन्य गुरुभक्ता ॥ २८ ॥ प्रसन्न मी जालों पाहिजे तें माग । बोलती श्रीरंग गुरुनिष्ठा ॥ २९ ॥ परमानंदजोगा ह्मणे देवाजींसी । देणें तें गुरुसी द्यावें तुह्मी ॥ ३० ॥ मजची द्यावेंसी इछा जरी मनीं । मज सेवेहूनी प्रिय नाहीं ॥ ३१ ॥ जप तप माझा ब्रह्मसाक्षात्कार । सेवेंतची सार सर्व माझें ॥ ३२ ॥ येक द्यावें गुरुसेवेंत शरीर । लागो तिळमात्र वीट न यो ॥ ३३ ॥ देव बोलीयले गुरु बरा करूं । हा ह्मणे विचारूं नका मज ॥ ३४ ॥ माझ्या कांहीं चित्ता आला नाहीं त्रास । सेवेचा उल्हास मोठा आहे ॥ ३५ ॥ स्वामीसी विचारा सांगती तें करा । जाहालें उशीरा जातो आतां ॥ ३६ ॥ गुरुसी अभाव धरीतां पतन । त्याचें उधरण नव्हे तुह्मा ॥ ३७ ॥ संत दयानिधी मोडीती तुमचें । तुमचे नित्याचें न मोडवे ॥ ३८ ॥ वाल्हाकोळी तुह्मी बुडवायाचा केला । गुरुनीं तारीला लीलामात्रें ॥ ३९ ॥ जप तप केल्यां न भेटा कोणासी । भेटा आपणची गुरुदासां ॥ ४० ॥ ऐकतांची प्रेम आले देवाजीला । आलिंगन त्याला दिलें भावें ॥ ४१ ॥ मग गुरुपासी

आले उभयता । दर्शनेंची वेथा निवारीली ॥ ४२ ॥ गुरुशिष्य दोघे दिव्यदेही केले । वैकुंठासी नेले देवरायें ॥ ४३ ॥ धन्य गुरुभक्त गुरू-सीच तारी । निष्ठा ज्याची पुरी वर्णवेना ॥ ४४ ॥ यशवंतसुत ऐसीयासी गात । तारीतील संत लीला गातां ॥ ४५ ॥

---

# मध्वमुनेश्वर

॥ **श्रीराम** ॥ मध्वमुनेश्वर तयांपासी येक । मूल आला देख दर्शनार्सी ॥ १ ॥ ह्मणे स्वामी मज अनुग्रह द्यावा । सार्थकीं लावावा जन्म माझा ॥ २ ॥ संत बोलीयले बापासी विचारी । मग येसी तरी अंगीकारूं ॥ ३ ॥ बाप सावकार गेला तयापासीं । विचारी तयासी गुरु करूं ॥ ४ ॥ ह्मणे बाप तया गुरु काये करी । शिष्य काये करी सांग मज ॥ ५ ॥ संतापासी आला वर्तमान सांगे । सांगों ह्मणती मग कृपायुक्त ॥ ६ ॥ दिला अनुग्रह कांहीं दिवस जाले । लग्न आरंभीलें पितयानें ॥ ७ ॥ समारंभ मोठा हरिद्रालेपन । पोषाक करोन सिद्ध जाला ॥ ८ ॥ स्मरण जाहालें गुरूसी नमन । करावया जाण आला तथें ॥ ९ ॥ दंडप्राय नमन हात जोडोनीया । ह्मणे गुरुराया लग्न होतें ॥ १० ॥ ह्मणती गुरुराय विचारीलें नाहीं । कैसा लग्न पाही करीतोसी ॥ ११ ॥ उतरी पोषाक अंगा लाव राख । भोपळा हा देख हातीं घ्यावा ॥ १२ ॥ कौपीन घालोनी दोन कोशावरी । जावे ऐसी बरी आज्ञा माझी ॥ १३ ॥ चिठी दिली तेथें होता येक त्यासी । पत्र देखतांचि रुपये द्या ॥ १४ ॥ जैसें सांगीतलें तैसें येणें केलें । पोषाका ठेवीले स्वामीपुढें ॥ १५ ॥ कौपीन घालोनी भोपळा हातांत । पत्र घे-ऊनी येत दुज्या गांवीं ॥ १६ ॥ चिठी देतां हातीं दोनसे रुपये । तेत्र

क्षणीं पाहे दिले त्यानें ॥ १७ ॥ घेवोनी रस्त्यांत जातां वेश्या उभी । पाहातांची लोभी जाला तेथें ॥ १८ ॥ रुपये तयेच्या करोनी स्वाधेन । शय्येवरी जाण पहुडला ॥ १९ ॥ वेश्या सेजे येतां पलंग उलथे । वरीच पडत अकस्मात ॥ २० ॥ ऐसे चारी प्रहर जालीया निघाला । न घेच द्रव्याला वेश्या कांहीं ॥ २१ ॥ घेवोनी खलीती आला स्वामी-पासी । स्वामी तेव्हां त्यासी विचारिती ॥ २२ ॥ शिष्य आणि गुरु काय कारिती हें । जाणसी अनुभवें किंवा नाहीं ॥ २३ ॥ आमुच्या वचनावरी लग्नाचा सोहळा । सोडोनी मोकळा जालासी तूं ॥ २४ ॥ ह्मणोनीया चारी प्रहर जागलो । भ्रष्ट न हो दिलें तुजलागी ॥ २५ ॥ गुरुच्या वचनीं शिष्यानें राहावें । मग त्या तारावे गुरुरायें ॥ २६ ॥ गुरूचा शिष्याचा ऐसा अनुभव । प्रश्नाचा उगव पाहीलीया ॥ २७ ॥ मग दिली आज्ञा लग्न करायाची । गुरुभक्ती साची याचें नांव ॥ २८ ॥ ऐसे गुरुभक्त निश्चयें तरत । यशवंतसुत सदां गाये ॥ २९ ॥

---

# अमृतरावजी

॥ **श्रीराम** ॥ अमृतरावजी सर्व संताअंत । कवन अद्भुत केलें ज्यांनीं ॥ १ ॥ पहिलें बाळपणीं विसोमोरोपासीं । होते शागीर्दीसी मर्जीतची ॥ २ ॥ कथाकीर्तनाचा छंद मोठा मनीं । सर्वकाळ ध्यानीं भक्ती मोठी ॥ ३ ॥ औरंगाबाजेंत येके दिसीं जाण । ऐकाया कीर्तन गेलें होते ॥ ४ ॥ कीर्तनांत मग्न जाले भान नाहीं । जावयाची पाहीं वेळ गेली ॥ ५ ॥ विसोमोरो कोपायुक्त होवोनीयां । चाकरी हे वाया कासयासी ॥ ६ ॥ भजनची करा ह्मणोनी बोलीले । संसार हा फोल कासयासी ॥ ७ ॥ आज्ञा ह्मणोनीया केला नमस्कार । मज हर्ष थोर

हाची आहे ॥ ८ ॥ चाकरी हे पुरे भिक्षा मी मागेन । देवाचा होईन भाट आतां ॥ ९ ॥ मग सर्व संग सोडोनी दिधला । कवनासी केला आरंभची ॥ १० ॥ भक्ती ज्ञान आणि वैराग्यभरीत । रस कवनांत पूर्ण ज्यांच्या ॥ ११ ॥ कीर्तनांत गातां रंग यावा मोठा । बोला ऐसी निष्ठा ह्मणोनीया ॥ १२ ॥ बोले तैसा चाले तो प्रिये देवासी । भीम ऐसी-यासी गाये सदां ॥ १३ ॥

---

## वडवाळनागेश

॥ श्रीराम ॥ वडवाळनागेश सिद्ध जाले श्रेष्ठ । सामर्थ्येही मोठें न वर्णवे ॥ १ ॥ भेंडाचाची रथ माकडे जुंपावे । त्यावरुनी आणावे धोंडे मोठे ॥ २ ॥ बहिरापिसा विप्र भ्रष्ट जाला होता । मारुनी मागुता दिव्य केला ॥ ३ ॥ ऐसे संतराव लीला ज्यांची मोठी । गाती त्याचे भेटी इछी देव ॥ ४ ॥ यशवंतसुत संकळीत गाये । अल्पमती आहे ह्मणोनीया ॥ ५ ॥

---

## शमनामीरपीर

॥ श्रीराम ॥ शमनामीरपीर[1] सिद्ध मार्गावरी । शिळा होती वरी तयेवरी ॥ १ ॥ समाधींत मग्न आनंदें बैसले । तेथें तंडे आले

---

१ शिरगांवाजवळ एका डोंगरावर या पिराचें स्थान आहे.

वाणीयाचे ॥ २ ॥ बैलावरी होती साखर ते वेळे । सिद्धें विचारीलें वैश्यालागी ॥ ३ ॥ तयाचें मानसीं संतसाधु कैचे । सदा चित्तीं वसे विषय त्यांच्या ॥ ४ ॥ कामातुर तया भय लज्जा नाहीं । भ्रमीतची पाहीं बुद्धि त्याची ॥ ५ ॥ चिंतातुर होतां सुखनिद्रा जात । क्षुधा होता जात रुची पक्क ॥ ६ ॥ अर्थातुर माता पिता न वोळखे । सर्वकाळ देखे द्वेष मनें ॥ ७ ॥ तैसेंची हे वैश्य बोलीले सिद्धासी । मीठ ह्मणुनी त्यांसी सांगीतलें ॥ ८ ॥ सिद्ध बोलीयलें मीठ का होईना । पुढें विवंचना ऐका कैसी ॥ ९ ॥ तेथोनीया दोन कोस कृष्णेअंत । उतरोन पाहात पोत्यामध्यें ॥ १० ॥ तंव त्यांत मीठ गोणींतही मीठ । जेथें तेथें मीठ दुजे नाहीं ॥ ११ ॥ मग ह्मणती आह्मी साधूचें छळण । केलें ह्मणऊन ऐसें जालें ॥ १२ ॥ मागे परतले तये स्थानीं आले । सिद्ध होते गेले तेथोनीया ॥ १३ ॥ शिरगांवीच्या मशीदींत निद्रा केली । वैश्य याजवळी आले तेव्हां ॥ १४ ॥ नमन करिती आणि वर्तमान । सर्व निवेदन केलें तेव्हां ॥ १५ ॥ असत्य भाषण तुह्मापासीं केलें । शर्करेचें जालें मीठ आवघें ॥ १६ ॥ सिद्ध दयावंत बोलीलें वचन । शर्कराची होणें कां होईना ॥ १७ ॥ येवोनी पाहातां साखरची जाली । ऐसी लीला जाली भीम ह्मणे ॥ १८ ॥

---

## चोखामेळा

॥ **श्रीराम** ॥ चोखामेळा संत मोठा निष्ठावंत । पांडुरंगीं हेत दिव्य ज्याचा ॥ १ ॥ नित्य देवाजीनीं दर्शनही द्यावें । देव भक्तीभावें वश केला ॥ १ ॥ येकेदिसीं प्रातःकाळीं देवाजीसी । बोले तें विप्रासी श्रुत जालें ॥ ३ ॥ जावोनी हाकीमा बोलती ब्राह्मण । देव भ्रष्ट येणें

केला पाहा ॥ ४ ॥ दूत पाठविले धरोनीया आणा । पारपत्य जाणा करूं त्याचें ॥ ५ ॥ धरोनी आणीला ह्मणती मारा याला । बैलासी जुंपीला अपेटं त्या ॥ ६ ॥ आली कांता तेथें ह्मणे देवराया । संकट कासया केलेंसी बा ॥ ७ ॥ भय दावोनीया रक्षस्वें भक्तांसी । खोडी हे तुह्मासी मुळींहूनी ॥ ८ ॥ देवें येवोनीया धरीयेले बैल । पाऊल न चले पुढें येक ॥ ९ ॥ बैलासी मारीतां न चलती ऐसें । जाहालें हें कैसें ह्मणती सारे ॥ १० ॥ हाकीतची होता बोलीले तयासी । कायेरे पाहासी मधोनीया ॥ ११ ॥ ह्मणे पितांबरें घालोनीया कास । धरोनी बैलास उभा असे ॥ १२ ॥ ऐकतां सर्वांस भक्ती जाली पूर्ण । करोनी सन्मान पाठवीलें ॥ १३ ॥ भक्तसाहे सखा आहे नारायेण । ह्मणोनी हे गुण भीम गाये ॥ १४ ॥

**॥ श्रीराम ॥** चोखामेळा गेला मंगळवेढ्यास । बुरुज पाह्यास आले तेथें ॥ १ ॥ अकस्मात ढांसळोनी तो पडत । हे गेले तयांत अछ्यादुनी ॥ २ ॥ साठ माहार येके ठाईंच निमाले । पांडुरंग बोले नामदेवा ॥ ३ ॥ चोखामेळा मेला त्याच्या अस्ति आण । विठल त्यांतून ध्वनी निघे ॥ ४ ॥ नामदेव तेथें आले अकस्मात । कानासी लावीत अस्ती हातें ॥ ५ ॥ चोख्याचें जें हाड कानासी लावीलें । विठल विठल ध्वनी त्यांत ॥ ६ ॥ अस्ती गोळा केल्या पंढरी आणोनी । स्थापील्या ते स्थानीं पाहाती लोक ॥ ७ ॥ पंढरी जे जाती तेचि हें पाहाती । पांडुरंगा प्रीति भक्ताची हे ॥ ८ ॥ नाम्याचे पायरीपासीं आहे स्थान । कारिती नमन सर्वत्रही ॥ ९ ॥ धन्य ते पंढरी धन्य पुंडलीक । वैकुंठनायक उभा जेथें ॥ १० ॥ धन्य चंद्रभागा धन्य तें पद्माळें । दर्शनेंची जळे पाप सर्व ॥ ११ ॥ धन्य वेणुनाद धन्य साधुसंत । आनंदें नाचत नामघोषें ॥ १२ ॥ धन्य ते भुमीका खळासी पाझर । येती

---

१ अजून गाडीला न जुंपलेला बैल, सांड.

निरंतर नेत्रांतूनी ॥ १३ ॥ पंढरी पंढरी ह्मणतांचि त्रिवार । नासती अपार पापराशी ॥ १४ ॥ काशीयात्रा पांच द्वारकेच्या तीन । पंढरीस जाण येक यात्रा ॥ १५ ॥ क्षेत्रप्रदक्षणा देवाजीची भेट । घेतां तो वैकुंठवासी जाणा ॥ १६ ॥ संतांची हे पेठ ऐसी नाहीं दुजी । सदां भक्ती ताजी जये स्थानीं ॥ १७ ॥ जया व्हावा मोक्ष तेणें पंढरीसी । जावें जी मानसीं भावयुक्त ॥ १८ ॥ पंढरीचे कोणी होती वारकरी । मुक्ती त्यांचे द्वारीं तिष्टे सदां ॥ १९ ॥ देवाची आवड जरी असे मनीं । तरी संत वानी आवडीनें ॥ २० ॥ संतांचीं चरित्रें देवा आवडती । ह्मणोनीया प्रीति गात जावीं ॥ २१ ॥ भांग्याचीच प्रीत तरी भांग खावी । आवडी सांगावी नलगे मग ॥ २२ ॥ जया ज्याची गोडी तें जरी आवडे । तरी त्याची घडे मित्री फार ॥ २३ ॥ आपुल्या लीलेहूनी संतलीला प्रीय । देवाजीसी होये प्राणा ऐसी ॥ २४ ॥ संतां गातां ध्यातां देव मानवती । जिंकीलें ह्मणती मज तेणें ॥ २५ ॥ संतांचे सेवेची देवा प्रीति मोठी । ह्मणोनी हे गोष्टी केली भावें ॥ २६ ॥ संतलीलामृत नाम या ग्रन्थाचें । वर्णीयलें वाचें यथामती ॥ २७ ॥ संतमुखें जैशा ऐकिल्या तैशाची । चाली अभंगाची आहे जाणा ॥२८॥ अभंगींच संतलीला वर्णीयल्या । आवडीनें जाल्या देवाजीचे ॥ २९ ॥ संतांचीं चरित्रें भावें जे गातील । तया देव दील सायोज्यता ॥ ३० ॥ माहा विष्णु ब्रह्मा नारद वशिष्ट । श्रीराम हे श्रेष्ठ मुख्य गुरु ॥ ३१ ॥ तेथोनी मारुती तेचि रामदास । केली कल्याणास कृपा त्यांनीं ॥ ३२ ॥ त्यांचे बंधु येकोदर दत्तात्रेय । त्यांसी अनुग्रह समर्थांचा ॥ ३३ ॥ तेथोनी राघवस्वामी हे जाहाले । पुढें यश जालें यशवंत ॥ ३४ ॥ गुरुबाप तेचि भीम अल्पमती । परंपरारीती सांगीतली ॥ ३५ ॥

॥ **श्रीराम** ॥ अवंती हे मोक्षपुरी क्षिप्रा गंगा । जिच्या स्नानें योगा होय सिद्धि ॥ १ ॥ महांकाळेश्वर ज्योतिर्लिंगसार । महिमा अपार दर्शनाचा ॥ २ ॥ कोतवाल नाग चंद्रेश्वर जाण । आरंभीं दर्शन घ्यावें

श्रीराम

सद्गुरुबापा तूं माहेरा । माते तुझाचि उबारा ।
पार कीजे भवसागरा । पूर्णोदारा स्वामिया ॥ १ ॥
अनन्याच्या प्रतिपालका । दारुण भवभयहारका ।
रक्षा आपुल्या बालका । नका नका उपेक्षूं ॥ २ ॥
भवसर्पें गुंडाळिले । तेणें मन हें व्याकुळ जालें ।
हित अहित विसरलें । सांभाळिले पाहिजे ॥ ३ ॥
मोकलिले तुह्मी जरी । निरयावें स्यां कवणेपरी ।
तुह्माविण गती दुसरी । माते नाहीं दयाळा ॥ ४ ॥
शुद्ध करोनिया मन । पूर्ण निजरूप जाणून ।
रामदासीं लोटांगण । शिवराजानें घातलें ॥ ५ ॥

श्रीराम

# तंजावर मठपति समर्थशिष्य भीमस्वामीकृत
# श्रीसमर्थचरित्र

## ओव्या

बरा नीतिन्यायें संसार करिती ।
लग्नाची आईती जाली तेव्हां ॥ १० ॥
येथासांग सर्व अनकूळ जाहालें ।
वराड निघालें समारंभें ॥ ११ ॥
मुहूर्त पाहूनि हळदी लागल्या ।
देवकांच्या जाल्या प्रतिष्ठाहि ॥ १२ ॥
लग्नाची घटिका समीप उरली ।
मंगळाष्टकें जाली सावधान ॥ १३ ॥
सावधान सावधान ह्मणताती ।
कोणा सांगताती मजवीणें ॥ १४ ॥
बोलिंबे पाईं प्रत्यक्ष पडती ॥
ह्मणोनि ह्मणती सावधान ॥ १५ ॥
संसारांत दुख कांहीं नाहीं सुख ।
गोड मानी मूर्ख सावधान ॥ १६ ॥

---

१ सामुग्री.

## पद

सांगावें कोणें कोण्हा । चिंता आपली आपणा ।
दुखें या संसाराच्या । शरण जावें नारायणा ॥ ध्रु० ॥
आत्महित करीना जो । तरी तो आत्मघातकी ।
पुण्यमार्ग आचरेना । तरी तो पूर्ण पातकी ॥ १ ॥
आपली वर्तणूक । मन आपुलें जाणे ।
पेरीलें उगवतें । लोक जाणती शहाणे ॥ २ ॥
सुखदुख सर्व चिंता । आपली आपण करावी ।
**दास** ह्मणे विवेकानें । वाट सत्याची धरावी ॥ ३ ॥

## ओव्या

दिवसां रात्री होतें देखत देखतां ।
प्रत्यक्ष ह्मणतां सावधान ॥ १७ ॥
सर्वही मिळोनी मज गोविताती ।
परी सांगताती सावधान ॥ १८ ॥
ऐसा हा विचार अंतरीं पाहिला ।
प्रत्यक्ष मजला सांगताती ॥ १९ ॥

## पद

पाहतां हीनवरं जालें । पोर बिजवरा दिधलें ।
पाहतां दिसे जैशी माता । कैसें लग्न लागलें ॥ १ ॥
या जोशाचें तळपट जालें । पोर बिजवरा दिधलें ॥
पथं वर ह्मणोनियां । लटिके आह्मा चाळविलें ॥ ध्रु० ॥
नवरी परवांचें पोर । कां रे ह्मणतां थोर ।

---

१ वधूच्या मानानें लहान वर. २ प्रथम–प्रथ–पथ, पहिला.

पाहतां दिसे लेंकी जैशी । वर पाहतां बागोरें ॥ २ ॥
पांचे तीनी वऱ्हाडी आले । नवरीकरितां मिळाले ।
येकला येकट वर । कांहीं चाले ना बोले ॥ ३ ॥
रामदासस्वामी येना । तया वरपण साजेना ।
येकली नवरी मिरवतसे । नवरा मिरवतां दिसेना ॥ ४ ॥

## कडका

नवरी निधान । पाहोनियां बंधु जन । समारंभें निघोन । मुहूर्तेसी जाऊन । केलें विधिविधान । देवदेवकस्थापन । सप्त घटिकेचें लग्न । ब्रह्मनिष्ठ ब्राह्मण । वरा वदती अनुसंधान । अंत्रपटीं असो नयन । मंगळाष्टकें निवेदन । करितां ह्मणती सावधान । तेव्हां स्वामी अंतःकर्ण । उठे जावें येथून । सारासार विचारून । तेचि संधि साधून । फडकले तेथून । विप्र ह्मणती वोम् पुण्य । वरावीण विलक्षण । सर्व सभा होय म्लान दीन रे ॥ ६ ॥

## ओव्या

बहु दाटी जाली संधी ते पाहिली ।
चुकांडी खादली आकस्मात ॥ २० ॥
नेसलें धोतर उत्तरी दुसरी ।
पडिले बाहेरी येकायेकीं ॥ २१ ॥
उघडे बोडके मनस्वी फिरती ।
अन्नपान चित्तीं चाड नाहीं ॥ २२ ॥
बंदीं बहु दिस आडकले होते ।
सुटे आवचितें तैसें वाटे ॥ २३ ॥

---

१ बापा ऐसा ! २ पंच भूतें व तीन गुण, मिळून अष्टधा प्रकृति, माया.

उदासीन काया उदासीन माया ।
ते लीळा ब्रह्मया न कळेचि ॥ २४ ॥
पंचगंगातीर परिपूर्ण पूर ।
पात्र रुंद फार विशाळ तें ॥ २५ ॥
नावे उपेक्षिलें ते उडी घातली ।
लोकीं हाक दिल्ही बुडाला रे ॥ २६ ॥
भवसिंधुमाजी जनासी तारिता ।
त्यासी काय चिंता मृशा जळ ॥ २७ ॥
पूर्ण अवतार ह्मणतांचि नये ।
पूर्ण ब्रह्म स्वयें हेंचि खरें ॥ २८ ॥

## कडका

स्वामी विरक्त । प्रिये न होतां सक्त । संग सोडूनि पंथ । धरियेला अद्भुत । ब्रह्मारण्य अद्वैत । निःसंगें सेवीत । अहोरात्रीं दीस सात । अन्नपानशयनस्मरण । नाहीं कांहीं चित्तांत । पंचगंगानदीप्रांत । पावोनिया आकस्मात । उडी घाली तीरांत । तीरवासी हाहाभूत । ह्मणती बुडाला निश्चीत । परी स्वामी कल्पातीत । पूर्ण ब्रह्म साक्षात । पैलपारा त्वरीत । येतां भेटी सीताकांत । लक्षुमणसंयुक्त । कोटीसूर्यप्रकाशीत । ऐसा तेजें उद्दीत । सुधापाना त्वरीत । देउनी केला येकांत । स्तवनपूजन घेउनी आपण । अंतर्धामीं जाला स्वयें गुप्त रे ॥ ७ ॥

## ओव्या

निर्गुण हें त्यासी सगुण भेटलें ।
राघोत्रानें दिल्हें दरुशण ॥ २९ ॥

# पद

उंच सिंहासन । मृद मृदासन ।
सुख सुखासनीं । रे देवराव ॥ १ ॥
हाटक मंडप । मोहव्या रत्नदीप ।
कीर्णे फांकती अमूप । वर्णवेना ॥ २ ॥
कोंदणजडीत । नवरत्नखचित ।
प्रभा सुंदर फांकत । भूमंडळीं ॥ ३ ॥
मुक्ताचें चांदिवे । तेज हेलावे धांवे ।
घोंस लोंबती बरवे । शुभ्रवर्ण ॥ ४ ॥
ऐसा उत्तम ठाव । वरी देवाधिदेव ।
कोण गणील वैभव । तुळणा नाहीं ॥ ५ ॥
**दास** तेथें गेला । नमस्कार केला ।
जळ सारिलें स्नानाला । देवरायाला ॥ ६ ॥

---

नाना सुगंध तेलें । आसन घातलें ।
मग आरंभिलें । मर्दन स्वयें ॥ १ ॥
केशर कस्तुरी । उटण्याभीतरी ।
मळी आंगावरी । रे आडळेना ॥ २ ॥
सहिष्ण उष्णोदक । घातलें नेमक ।
वस्त्रें ते आनेक । आणवीलीं ॥ ३ ॥
आंग पुसिलें बरें । मग दिव्यांबरें ।
सुगंध केशरें । नाना गंधें ॥ ४ ॥
केशराचा रंग । आक्षता सुरंग ।
पुष्पमाळा मग । रे बहुविध ॥ ५ ॥
नाना पुष्पमाळा । सुगंधें मुक्तमाळा ।
आळंकारी कीळा । फांकताती ॥ ६ ॥
नाना आळंकार । उत्तम सुंदर ।
**दास** नमस्कार । घालीतसे ॥ ७ ॥

धूपाचा तो वास । दशांगें सुवास ।
दीप सावकाश । रे आणविले ॥ १ ॥
दीप ओवाळिले । नैवेद्यही जाले ।
भोजना बैसवीले । देवराव ॥ २ ॥
शाका कुशिंबीरी । ओदन सुवास ।
क्षीरी पंच भक्ष रे । तूप सायें ॥ ३ ॥
नाना प्रकारींच्या । सिकरणी आणिल्या ।
शर्करा वाढिल्या । सावकाश ॥ ४ ॥
सुगंध कर्थाका । दहि दुध ताक ।
नैवेद्य नेमकरे । सांग जाला ॥ ५ ॥
आंचवले देव । बैसले सुढाळें ।
पुढें विविध फळें । ठेवियेलीं ॥ ६ ॥
सांगोपांग विडे । आणिली दक्षणा ।
मंत्रें पुष्पें ते नाना । समर्पिलीं ॥ ७ ॥
सांगोपांग पूजा । केला नमस्कार ।
दास ह्मणे थोर । भक्ती आहे ॥ ८ ॥

## ओव्या

येकांतीं संवाद परस्परें जाला ।
घोष उमटला जयजयकारें ॥ ३० ॥
श्रीरामदासस्वामी चालिले तेथुनी ।
पाहिली मेदिनी सर्वत्रही ॥ ३१ ॥

## श्लोक

महीमंडळी लोक नाना गुणाचे ।
असंख्यात्यलीळाकळाकूसरीचे ।
कितीयेक साधे कितीयेक बाधे ।
कितीयेक ते देखिले मंदबोधे ॥ १ ॥

कितीयेक लाताड लाबाडवाणे ।
कितीयेक पापी पुराणे पुराणे ।
कितीयेक तोंडाळ वोढाळ ऊणे ।
कुशब्दी कितीयेक वाचाळ सूणे ॥ २ ॥
करंटे कुरूपी विकारी भिकारी ।
कितीयेक ते तामसी दुखकारी ।
कितीयेक ते पातकी पापरूपी ।
कितीयेक ते दक्ष पुण्यस्वरूपी ॥ ३ ॥
भले नष्ट पापी दुरात्मेचि कांहीं ।
जनीं पाहतां सारिखे येक नाहीं ।
बहू लोक हे तों बहूता परीचे ।
भले ते हरीचे तथा दुर्भरीचे ॥ ४ ॥
भल्याचे भले बोलती रम्य वाचा ।
देहे सुकृती चालतो सुकृताचा ।
फिरे **दास** ऊदास लोकांस पाहे ।
मनामाजि थक्कीत होऊनि राहे ॥ ५ ॥

## पद

नवल केलें रे विरंची नवल केलें रे ॥ ध्रु० ॥
देखत लोचन । भावितसे मन ॥
चक्कीत जालें रे ॥ १ ॥
नाना रंगतरंगविकारें । मानस नेलें रे ॥ २ ॥
**दास** उदास फिरे विवरे । मन निवालें रे ॥ ३ ॥

## कडका

दासासवें राम । पावतो विश्राम । फिरत त्वरीत ग्रामेंग्राम । बाळीं भोळीं नि:सीम । मेळउनी सांगे वर्म । तुह्मी ह्मणा राम राम । स्वयें गाये मुखीं नाम । छंद बंद सप्रेम । करीत नमीत । नित्य नेम ।

पाहोनी येती नरोत्तम । ह्मणती वेडें नव्हे सौम्य । याच्या गुणें परंधाम।
पाऊं आह्मी होऊं पूर्ण ब्रह्म ॥ ८ ॥

## ओव्या

पोरें अगणीत फिरावें तयांत ।
नाहींच किंचीत देहेबुधी ॥ ३२ ॥
साता पांचा दीसां अन्न तें भक्षिलें ।
मनें मागितलें तऱ्ही नाहीं ॥ ३३ ॥

## पद

पळा पळा ब्रह्मपिसा येतो जवळी ।
रामनामें हाक देउनी डोई कांडोळी ॥
वृत्ति शेंडी बंधनवीण सदां मोकळी ।
संसाराची धुळी करुनी आंगीं उधळी ॥ ध्रु० ॥
मीपणाचें शाहाणपण जळालें माझें ।
कोण वाहे देहेबुधीवस्त्राचें वोझें ॥
नलगे आह्मा मानअपमानाचें दुजें ।
तुझी सोये घेतां गेलें मीपण माझें ॥ १ ॥
प्रपंचउकरड्यावरी बैसणें त्याचें ।
भोंवता पाळा घालुनी पाहे जन अविवेचें ॥
उठोनि धावे देखोनि पळे दृश्यवाटेचे ।
अदृश्याचें रान घेतां न चले कोण्हाचें ॥ २ ॥
औट हात गजें नवा ठाई वितुळलें ।
दाहवा ठाव देखुनी तेथें ठिगळ दिधलें ॥
ऐसें तेहीं निवृत्तीसी मन विगुंतलें ।
परतोनि आलें ह्मणोनी जीवें मारिलें ॥ ३ ॥
अवघे जन बध देखोनि चार करीतो ।
पिसा आपणाऐसा देखुनी उमंज धरीतो ॥

आतां भेटो येती त्यासी वेड लावीतो ।
रामीं रामदास ऐसें अबध बोलतो ॥ ४ ॥

## कडका

लावी चटक पळे । पाठी कटक मिळे । धरुनि नेति वळें । पूजिती देति फळें । न भक्षितां जातो सळें । येकायेकीं त्याचि काळें । कृष्णेच्या तीरां आले । पिसें जसें तसें बोले । परीक्षितां मना मिळे । ग्रामवासी बाळें मुलें । त्यांत ब्रह्मानंद खेळे । पदांबुजीं देहे गळे । तेचि खूण बरी पूर्ण । पाहोनियां रामध्यान । सतीबाईनें वोळखिलें रे ॥ ९ ॥ स्वामी समर्थ ॥ ७ ॥

## ओव्या

विसाजीपंताची कन्या बाई सती ।
आदिमायामूर्ति मूर्तिवंत ॥ ३५ ॥
तिनें ओळखिलें खेळतां पोरांत ।
जैसें तें केरांत रत्न शोभे ॥ ३६ ॥
लोभ्यानें देखिलें येकाकी धनासी ।
जैसें तें प्राणासी गांठी घाली ॥ ३७ ॥
तयापरी दृढ धरिले चरण ।
तनमनधन सर्वस्वेंसीं ॥ ३८ ॥

## कडका

बाई सौभाग्यवती । संतती संपत्ति । कमळाजिपंत जिचा पती । उदार धर्ममूर्ति । विस्तार करी कीर्ति । गोपाळ स्वयें भक्ती । येउनी पुत्रस्थिति । स्वानंद गाय गीतीं । अनादि मायामूर्ति । उमा रमा अनसूया अशी स्थिति ॥ १० ॥

## ओव्या

नानापरी मन शोधुनी पाहिलें ।
नाहीं डगमगिलें सर्वथाही ॥ ३९ ॥
चित्त वित्त सर्व प्रपंच सांडिला ।
दृढ तो जोडिला स्वामीराव ॥ ४० ॥

## कडका

आणुनी स्वामीस । पूजितां दिसेंदिस । सोसुनी सर्व घीस । पाडी फोडी करणें नास । बहुतापरी दिल्हा त्रास । नाणुनी सुमनास । धरियेली दृढ कास । घेउनी अभयास । सर्व बंधुसुहृदास । अंबाजी मुरारीवास । अनुग्रहो पूर्ण त्यास । *केला शहापुरीं वास । भजनलाभ सर्वांस । तेव्हां धरी भीम चरणास रे ॥ ११ ॥

## पद

येई वो राघवे वोसंगा घेई ।
प्रेमपान्हा आपुला देई ।
येक वेळे जननी तूं कृपादृष्टीं पाही ॥ ध्रु० ॥
ऐशा वियोगें शीण करितां ।
अझुनी नयेसी श्रीरघुनाथा ।
बाळक त्रिविधें तापलों बहु आतां ॥ १ ॥
आतां निष्ठुर माय न व्हावें ।
ब्रीद आपुलें साच करावें ।
विश्वनाथसुत ह्मणे निजधामा न्यावें ॥ २ ॥

---

* आपाजी गोविंदास । असा एक चरण समासांत कोणी लिहिलेला आहे.

## ओव्या

पुढें नाना भक्त मिळाले अपार ।
मोहोत्छाव थोर थोर होती ॥ ४१ ॥
शहापुर स्वामीचें मुख्य अधिष्ठान ।
मोक्षाचें भुवन भूमंडळीं ॥ ४२ ॥

## डफगाणें

केला काशीविश्वेश्वर । श्वेतबंध रामेश्वर । न पाहतां कोल्हापुर । वेर्थ गेलें ॥ १ ॥ पूर्वीं होता कोल्हासुर । ह्मणोनी नामें कोल्हापुर । तेथें लक्ष्मीचा अवतार । तुह्मी पहा ॥ २ ॥ तेथें बहुसाल देउळें । तळें रंकाळें पद्माळें । जळें वाहती निर्मळें । ठाईं ठाईं ॥ ३ ॥ तेथुनी पाहतां उत्तर । पुढें आहे केसापुर । पंचगंगेचें तें तीर । सुंदर नीर ॥४॥ वरतें जळसन्याचें तळें । तया तळ्यामाजी कमळें । तेथुनी दिसते तन्नाळें । सारागड ॥ ५ ॥ पुढें मार्कंड्याचा डोंगर । त्याहुनी थोर रत्नागीर । आला हिमाचळाहुनी केदार । भक्तालागी ॥ ६ ॥ ऐका पुढील प्रसंग । आलितें बाहे रामलिंग । नरसीपुरी देव धिंग । गुप्त आहे ॥७॥ जागा लक्ष्मीचें शिराळें । तेथें निघती नागकुळें । श्रावणमासीं मुलें बाळें । खेळविती ॥ ८ ॥ कऱ्हाडनगर सांगो काई । तेथें सुंदर तुकाबाई । कृष्णासंगम ठाईं ठाईं । देवस्थानें ॥ ९ ॥ मुलेश्वर धारेश्वर । रुद्रेश्वर चांफेश्वर । तेथें महिमा अपार । रघुनाथाचा ॥ १० ॥चंद्रगिरीमाजी गंवी । तेथें वास करी कवी । त्याचा जागा जो पुरवीं । शहापुरें ॥ ११ ॥

---

१ डोंगराची खांक २ पूर्वी ज्या कवीची जागा शहापुरास होती तो आत्तां चंद्रगिरीच्या डोंगरावर गुहेंत रहावयास गेला.

चंद्रगिरीचा डोंगर । त्यांत गुप्त येक शिखर । तेथें राहे योगेश्वर । निरंजन ॥ १ ॥ रे नवल त्या निरंजनाचें । शिखर पाहो आकाशाचें । ऐसें पृथ्वीमध्यें कैचें । पाहों जातां ॥ २ ॥ जागा सुंदर गहन । तेथें सुख पावे मन । वरी पाहातां गगन सांठवलें ॥ ३ ॥ तेथें अखंड नाहीं वात । ह्मणोनि जागा तो निर्वात सीतकाळीं घुमघुमीत । वस्त्र नलगे ॥ ४ ॥ कृष्णा कोन्या दोहींकडे । मध्यें पर्वताचे कडे । मंडळ पाहतां चहुंकडे । समाधान ॥ ५ ॥ तळीं असती शेतभातें । तेथें फिरातातीं अउतें । नानापरीचीं मार्गस्तें । येती जाती ॥ ६ ॥ वरुती सेरडें मेंढरें । गुरेंसीं गुरें वासुरें । ठाई ठाई गुराखी पोरें । क्रीडा करिती ॥ ७ ॥ भोंवती डोंगराचीं थाटें । दिसती कडे आणि कपाटें । सर्वेचि येउनी धुकटें । झांकोळिती ॥ ८ ॥ तळीं पाहातां आकाश । दिसे दुसरें कैलास । तेथें जावया संतोष । वाटतसे ॥ ९ ॥ तया खालतीं आहे माण । वरतें आहे तळकोंकण । कऱ्हाड दंतागिरी पट्टण । पंचक्रोशी ॥ १० ॥ राया रघुनाथाचें देणें । जालें हनुमंताकारणें । देव पाहावया पारणें । लोचनाचें ॥ ११ ॥ रामादासाचा विसावा । रुद्र जाहला आक्रावा । भक्तजन वेगीं धांवा । दर्शनासी ॥ १२ ॥

## ओव्या

रामउपासना आधार या जना ।
विश्रांती सज्जना चंपावती ॥ ४३ ॥
भक्तसमुदाव मध्यें स्वामीराज ।
त्याचा पदरज गोपाळ हा ॥ ४४ ॥

---

मुख्य भक्तराज मुळारंभ बाई ।
तिचेनि सर्वही परमार्थ ॥ १ ॥
देह पडो झडो आणि मोडो बुडो ।

परी दास्य घडो अखंडीत ॥ २ ॥
काया वाचा मन अनन्यशरण ।
सद्गुरुवचन नुलंघेच ॥ ३ ॥
ब्रह्मांड पालथें होय कदाचित ।
बाईचा भावार्थ पालटेना ॥ ४ ॥
धन्य वंश तुझा धन्य धन्य बाई ।
मन रामपाईं निरंतर ॥ ५ ॥
तिचा वंशवृक्ष देवा विस्तारावा ।
परमार्थ घडावा तिजऐसा ॥ ६ ॥
थोर मोहोछाव चांफळीं यात्रेचा ।
नांदतो देवाचा देव तेथें ॥ ७ ॥
शाहापुरकराचें पहिलें सिंहासन ।
यात्रेसी तेथून मुळारंभ ॥ ८ ॥
छत्रें सूर्यापानें पताका निशाणें ।
येतो देवा ज्यानें बाजीराव ॥ ९ ॥
दमामे धमामे कर्णे शंख भेरी ।
वाद्यें नानापरी गर्जताती ॥ १० ॥
दुरुनी दिसतें देवाचें शिखर ।
घाली नमस्कार बाजीराव ॥ ११ ॥
आली आली काठी शाहापुरकरांची ।
सामोरें यायाचि लगबग ॥ १२ ॥
येक होतां भक्त मिरवत आले ।
विश्रांती पावले निजपदीं ॥ १३ ॥
भक्तसमुदाव अगणीत फौजा ।
तेथें मान तुझा भक्तराया ॥ १४ ॥
ढाळ घोळ विणे मृदांग वाजती ।

मनोरम्य गाती हरिदास ॥ १५ ॥
हरिदास मिळाले असंख्य देवाचे ।
मध्यें रंगीं नाचे भक्तराज ॥ १६ ॥
भक्ति ज्ञान आणि वैराग्यसहीत ।
गातो सप्रचित भक्तराज ॥ ॥ १७ ॥
अहं ब्रह्मास्मि हेंचि अंतर्यामीं ।
मुखीं राम नामीं संकीर्तन ॥ १८ ॥
अहंभाव नासे शुध ज्ञान भासे ।
ऐसें गात असे भक्तराज ॥ १९ ॥
कथेचा गजर होतो निरंतर ।
येती सुरवर पाहावया ॥ २० ॥
विमानाच्या कोटी अंतराळीं दाटी ।
होते पुष्पवृष्टी अगणीत ॥ २१ ॥
सर्व करताळीका नामाचा गजर ।
सुगंध धुशर गर्द जालें ॥ २२ ॥
समस्तांचें मन रामरूप जालें ।
आपणा पडिलें विस्मरण ॥ २३ ॥
भद्रासनीं देव भक्तसमुदाव ।
पुढें भीमराव कर जोडी ॥ २४ ॥
सुकृताच्या कोटी पूर्ण असतील ।
तरीच जोडेल रामदास्य ॥ २५ ॥
चारी देह कुरवंडी मी करीन ।
अभेद लाधेन भक्ती कैसी ॥ २६ ॥
मुळारंभ केला देव प्रगटला ।
निवेदनें जाला निरावेव ॥ २७ ॥

## पद

मन माझें उन्मन जालें ॥ ध्रु० ॥
जन्मोजन्मीचें सुकृत तें मज नरदेहीं कामा आलें ।
सद्गुरुश्रीस्वामीसमर्थचरणीं तनमनधन अर्पिलें ॥ १ ॥
जिकडे पाहे तिकडे स्वरूप निश्चळ । हें भीमद्दर्दई बिंबलें ॥
बोलणें हें सर्व समूळ वाव । वाच्यपण कोण उरलें ॥ २॥

## श्लोक

जेणें राजसतात्विकादिक तिन्ही आत्मास्थिती आटिले ।
वेदांता बुधिचे प्रभाव अवघे जेणें निराकर्णिलें ।
विज्ञानें भवसिंधुपार तरला जिंकोनि साही धुरा ।
ऐसा सद्गुरु तो अनंतकविचा जो निःस्पृहाचा तुरा ॥ १ ॥
निर्माणस्थळ गौतमीतटिं पहा कृष्णातिरीं जो वसे ।
कांतासंग नसे प्रपंचहि नसे आशा दुराशा नसे ।
ज्याला उत्तम रामदास ह्मणती त्रैलोक्य वंदीतसे ।
ऐसा सद्गुरु तो अनंतकविचा बध्धासि तारीतसे ॥ २ ॥
वस्त्रें हुर्मुज भर्जरी पटकुळें माथां चिराही वसे ।
काया सुंदर गौरवर्ण लवुसें भाळीं अवाळें असे ।
जेणें पै निजदासबोध वरदी हें काव्य केलें असे ।
ऐसा सद्गुरु तो अनंतकविचा बध्धासि तारीतसे ॥ ३ ॥

## पद

मानसिं हा मुनि मानसमोहन । मानवकांत नितांत भजे जो ।
मानव श्रेष्ठचि मानवला मज । मानगुमान त्यजी अजि जो ॥ १ ॥
मनीं वंदूं जनीं दीनबंधु ॥ ध्रु० ॥ सद्गुण आलय निर्गुणकारक । बोधक साधक वर्धक जो । संशयछेदकवेधक सित्वा । बाधक षडरिपु संहर जो ॥ २ ॥ लाघवि हा जग जागवि जागत पावन जागा जागवी

माजवि श्रीरंग अद्भुत दुंदुभि भूतदयाघन वाजवी ॥ ३ ॥ वृत्ति उदासिन स्थीति पुरातन नीति सनातन दाखवी । भ्रांतिविसर्जन संचितनाशन शांतिसुखासन वागवी ॥ ४ ॥ दीन जया सुखदायक करणी । दिनकर कुळमणि ध्यानिं मनीं । दिननिशिं श्रवणीं मननीं निजस्वरूप धरी भीम धरणी ॥ ५ ॥

## श्लोक

सह्याद्रीगिरिचा विभाग विलसे मंदारशृंगापरी ।
नामें सज्जन जो नृपें वसविला श्रीउर्वशीचे तिरीं ।
साकेताधिपती कपी भगवती हे देव ज्याचे शिरीं ।
तेथें जाग्रत रामदास विलसे जो या जना उत्धरी ॥ ४ ॥

## पद

मना पाहे पाहे पाहे स्वामीपाये रे ॥ ध्रु० ॥
रूप जयाचें ध्यान शिवाचें ।
नाम दासाचें साह्यरे साह्यरे साह्यरे ॥ १ ॥
भक्तजनाचें प्रेम सुखाचें ।
कारि भीमाचें साह्यरे साह्यरे साह्यरे ॥ २ ॥

---

कै मी पाहेन आतां सद्गुरु समर्था । निशिदिन चिंतन करितां धणी न पुरे या चित्ता । तळमळ तळमळ जीव करित अती । न धरत धीर पळ विकळ अवस्था ॥ ध्रु० ॥ तन मन धन गेहे ठावो कारण भावाभावो । स्वरूपीं सकळहि वावो भेटल्यां सद्गुरुरावो । चरणकमळीं मस्तक वाहिन । विलया जाइल जन्मकथा ॥ १ ॥ सज्जनगड जो वासी । केव्हां जाइन त्यापासीं । दुर्लभ पादुका दृष्टीसी । अवलोकिन अहिर्निशीं । निश्चय हा

---

१ तृप्ती.

मज अंतरिचा परी । प्रारब्ध कैसें न कळे पाहतां ॥ २ ॥ समर्थसमाधी जेथें । सुकृति जन बहु तेथें । सर्वस्व चित्तें वित्तें । पूजिती पूर्ण ब्रह्मातें । धन्य धन्य भाग्यवंत सहवास घडला । दुर्लभ जाला मज असतां ॥ ३ ॥ श्रवणीं सद्गुण परिसे । नयनीं निजरूप पैसे[1] । सुमनीं तन्मयसरिसें । वदनीं कीर्तन विलसे । मुनिमनमोहन माझेंहि जीवन करुणार्णवघन भीमवरदाता ॥ ४ ॥

---

समर्थसमाधी जो वर्णी मुक्ती त्याला पर्णी ॥ ध्रु० ॥
कर्णीं ऐके करणी न पडे जननमरणभ्रमणीं ॥ १ ॥
धरितां निजरूप धरणीं मान्य तरणी[2] वंशाभरणी[3] ॥ २ ॥
धन्य त्याची जननी । भीम तन्मय जाला चरणीं ॥ ३ ॥

## डफगाणें

समाधी समर्थाची पूर्ण । वर्णून जाले भक्त संपूर्ण । श्रवण करितां सर्व जन । पावन होती ॥ १ ॥ राजा शिवछत्रपती । समर्थासी अति प्रीति । सज्जनगडीं तेहीं वस्ती । करविली ॥ २ ॥ बहुत दिवस करुनी सेवा । आला कर्नाटकीं यावा । विजई होउनि आपुल्या गावा । प्रवेशले ॥ ३ ॥ शंभुराज प्रतिष्ठिला । समर्थदरुशणाला आला । समारंभ तेहीं केला । अपरांपर ॥ ४ ॥

---

वर्तमानीं येकांतीं स्वामीस न साह्य दुजी व्यक्ती । लोक येउनी जपती टपती दरुशणां लागी ॥ १ ॥ ऐका सभाग्य हो । समर्थभाग्य हो । पवित्र श्रवणायोग्य । समाधीभोग्य घडो ॥ ध्रु० ॥ ब्रह्मादिक आले जऱ्ही । येणें नाहीं बाहेरी । कोण गुहा प्रवेश करी । अंधकारीं

---

१ विस्तारे. २ नौका. ३ कुलावतंस.

त्या ॥ २ ॥ दरुशणासी भक्तजन । करिती करुणाकीर्तन । पक्षा येका करुणावन । वोळे तया ॥ ३ ॥ दुरी देशीहुनी भक्त । येती त्यांचें मोठें आर्त । गुह्येमाजी त्वरीत भेटी घेती ॥ ४ ॥ विचार पुसती सर्व । सांगती येकांतभाव । विदेहेता अभिनव । आंगीं बाणे ॥ ५ ॥ मनोगत असे ज्याचें । तितुकें राहाणें तयाचें । प्रेम देउनी साचें । बोळविती ॥ ६ ॥ पत्र लिहिलें सकळाला । कर्नाटकी लोका आपुल्यां । भावार्थ जो ऐके सगळा । भीम होये ॥ ७ ॥

## निरूपणपत्रार्थ

**चित्रकला नाना नाटक । ह्मणोनि नामें कर्नाटक ॥**
**तेथें जे रामउपासक । पत्र त्यांसी ॥ १ ॥**
**तुह्मी पत्र पाठविलें । वाचुनी आश्चीर्य वाटलें ॥**
**परम समाधान जालें । देव जाणे ॥ २ ॥**

## येथुनी समर्थासी पत्र गेलें तो भाव वर्णिला

समर्था नमस्कार साष्टांग आधीं ।
अपत्यें सुखें घातलें हो त्रिशुधी ।
विनंती बहू ऐकिजे जी स्वभावें ।
असे मी दुरात्माचि नाना स्वभावें ॥ १ ॥
दयासागरें हो मला थोर केलें ।
बहू सेवकांमाजि तें मेळवीलें ।
कृपेनें दिल्हें सौख्य तें अंतरींचें ।
परी भोगणें लागलें या देह्याचें ॥ २ ॥
कसें दुर्भरें आणिलें या स्थळाला ।
पदीं स्वामिच्या थोर वीयोग जाला ।

---

१ चारित्रकार भीमस्वामीचें नांव.

जगीं धन्य त्या लाधली पायसेवा ।
नसे ते मला पूर्व माझाचि ठेवा ॥ ३ ॥
मनोभावना स्वामिच्या पादपद्मीं ।
असे लागली वृत्ति हे पूर्णसद्मीं ।
परी देहप्रारब्ध माझें झडेना ।
समर्था प्रभू योग तूझा घडेना ॥ ४ ॥
अखंडीत हे वासना भेटि व्हावी ।
प्रभूपाइची धूळि माथां पडावी ।
मनींचे मनीं जाणसी स्वामिराया ।
किती वाडऊं हा सविस्तार वाया ॥ ५ ॥
महाभक्तभावार्थ हा रामचंद्रें ।
मुखें माजिया बोलवीला नरेंद्रें ।
यथातथ्य वीचार हा साभिमानें ।
प्रभूश्रोतया जाणवीला भिमानें ॥ ६ ॥

## या श्लोकांचें उत्तर

**तुह्मी पत्र पाठविलें । वाचुनी आश्चीर्य वाटलें । परम समाधान जालें । देव जाणे ॥ २ ॥ प्रवृत्तीसी पाहिजे राजकारण । निवृत्तीसी पाहिजे विवरण । जेथें अखंड श्रवण मनन । धन्य तो काळ ॥ ३ ॥ आयुष्यासी माप लागलें । ऐसें प्रचीतीसी आलें । तरी सार्थक पाहिजे केलें । सारासार विचारें* ॥ ४ ॥ हें बहुत सुकृतें घडे । पर-**

* आह्मांस मिळालेल्या या चारित्राच्या बाडाचीं कांहीं आरंभीचीं व कांहीं शेवटचीं पानें गेलेलीं आहेत. आरंभीचीं पानें ५।७ व शेवटचीं २।३ गहाळ झालीं असावीत असें वाटतें. आरंभींचा मजकूर मिळेल तेव्हां खरा. श्रीसरस्वती मंदिराच्या १८२६ च्या माघ महिन्याच्या अंकांत रा. राजवाडे यांनीं वरील पत्र व त्यास उत्तर अशीं तंजावरास मिळविलेलीं छापलीं आहेत. त्यावरून येथून पुढच्या १४ ओव्या उतरून घेतल्या आहेत.

लोक विवेकें जोडे । समजतां मूळ खंडे । जन्ममृत्याचें ॥ ५ ॥ नवविधा भक्तिचे अंतीं । होत आहे भगवत्प्राप्ती । सत्यस्वरूपीं सद्गती । तात्काळ होते ॥ ६ ॥ हें उमजल्यावीण कायकळे । समजल्यावीण तें न कळे । श्रवणमननें निवळे । सकळ कांहीं ॥ ७ ॥ सकळ कांहीं जाणोनि केलें । ह्मणिजे सार्थकचि जालें । नेणतां अनुमान[1] गेलें । ते निरर्थक ॥ ८ ॥ धन्य आत्मज्ञानी नर । सार्थक केला संसार । त्यासी आह्मांसी अंतर । कांहींच नाहीं ॥ ९ ॥ तत्वनिदर्शनाउपरी[2] । राया रंका येकिच सरी । पुरता विचार चतुरीं । पाहिला पाहिजे ॥ १० ॥ शद्बद्वारा अर्थ घेणें । विवेकें अर्थरूप होणें । सार्थकाचीं हें लक्षणें । जाणती ज्ञानी ॥ ११ ॥ विवेकाचें येक सूत्र । सकळांसी मिळोनि येकचि पत्र । देहभावना विचित्र । स्मरण होत ॥ १२ ॥ स्मरणाउपरी अवस्था । ते लिहितां नव्हे व्यवस्था । बहुत निकट असतां । वियोग जाला ॥ १३ ॥ हें ऋणानुबंधानें केलें । तें ऋणानुबंधावरी गेलें । आतां घडेल तें भलें । ऋणानुबंध ॥ १४ ॥ येकी अवस्था दोहींकडे । अनृत्य लिहिणें न घडे । निमिष्यनिमिष्याचे निडे । स्मरण होतें ॥ १५ ॥ तुह्मांसी प्रपंच आहे कांहीं । आह्मांसी तुह्मांवेगळें नाहीं । पत्र दरुशण सर्वहि । स्मरणें होतें ॥ १६ ॥ ते सारिखे परस्परें । अंतरा होडती अंतरें । रघुनाथभक्ताचेनि उपकारें । उपकारी आहे ॥ १७ ॥ आतां बहुत काय लिहावें । अंतरा अंतर जाणावें । तालीक करुनि पाठवावें । समस्तांसी ॥ १८ ॥



---

१ अनुमानें केलें । असें मुळांत असेल काय? २ तत्वनिर्शना उपरी असा चरण मुळांत असावा असें वाटतें. दासबोध $६\frac{३}{३०}$ व $७\frac{२}{२४}$ पहा.